तिच्यावर आतांपर्यंत झाला होता व गजराबाईलाही एव्हांच अधिक लक्ष्य पुरवण्याइतका हा प्रश्न महत्वाचा भासला नाहीं.

अशा रीतीनें तीन चार वर्षे जातांच, जाई गायन व नृत्य यांत इतकी तरबेज झाली, कीं त्याबद्दलची तिची ख्याति आजूबाजूच्या सर्व गांवांत पसरली ! खेड्यांतील निरोगी हवापाणी व निश्चिंत व सुखपूर्ण आयुष्य, यांमुळें तिच्या शरीराचा व निसर्गदत्त सौंदर्याचाही आतां असा कांहीं मनोहर विकास झाला होता, कीं तिच्या जातींतील अत्यंत सुंदर म्हणून नांवाजलेल्या स्त्रियांनाही आपल्या व्यवसायक्षेत्रांत लवकरच एक प्रबळ प्रतिस्पर्धी उतरून आपल्याला नामोहरम करणार, अशी तिची भीति वाटूं लागली होती !

अर्थात् लवकरच, अमक्या तमक्या जमीनदाराच्या, व्यापाऱ्याच्या किंवा सरकारी कामदाराच्या औदार्याचा व श्रीमंतीचा स्तुतिपाठ गाण्यासाठीं, अनेक दलालांची ये–जा गजराबाईच्या घरीं सुरू झाली ! पण त्या सर्वांना तिनें धुडकावून लाविलें ! बऱ्याच मोठ्या देणग्या देऊं करून नाचण्याच्या बैठकींना जाईला येणारीं आमंत्रणेंही, तिचें महत्व वाढविण्यासाठीं, तिनें साफ नाकारण्यास सुरवात केली.

"पिकतें तेथें विकत नाहीं" या व्यापारी तत्त्वाला आपल्या मुलीच्या सौंदर्यविक्रीच्या बाबतींतही केवढें महत्त्व आहे, हें गजराबाईला पूर्णपणें अवगत होतें. शिवाय, जाईसंबंधीची तिची आकांक्षा व अपेक्षा हीं इतकीं मोठीं होतीं, कीं स्वप्रांतांतील कितीही श्रेष्ठ लक्ष्मीपुत्र तिच्या खिसगणतींत नव्हता ! आपल्या मुलीनें मुंबईतील एखादा लक्षाधीश भाटिया अगर बनिया किंवा एखादा जहागिरदार अथवा संस्थानिक कायमचा आपल्या जाळ्यांत पकडलेला पाहिल्याशिवाय, आपल्या या म्हातारपणांत तिनें कधींही सुखानें डोळे मिटले नसते !

आज कित्येक दिवसांपासून जाईसह मुंबईस जाण्याचा विचार तिच्या मनांत घोळत असून, त्या बाबतींत तेथील आपल्या एका मावसभावाशीं पत्रद्वारें तिनें वाटाघाट चालवली होती. शेवटीं एक दिवस मुंबईहून तिचा हा मावसभाऊ—रघूदादाच–तिच्या गांवीं येऊन दाखल झाला! रघूदादानें अलीकडे बरींच वर्षें जाईला पाहिलें नव्हतें, पण आतां तिचें अप्रतिम सौंदर्य आणि गायन, वादन व नृत्य, यांत तिनें मिळविलेलें प्राविण्य दिसून आल्यावर तो इतका खूष झाला, कीं एकदां मुंबई गांठण्याचा अवसर! तत्काळ गजराबाईच्या मनांतील हेतू सोळा आणे पार पाडून दाखवतों असें त्यानें तिला आश्वासन दिलें!

रघूदादाची उद्यमप्रियता दांडगी! आपल्या मावसबहिणीला दिलेलें वचन केव्हां एकदां पुरें करून दाखवितों असें त्याला झालें! गजराबाईही इतका काळ मनांत रंगवलेलीं आपलीं सुखस्वप्नें प्रत्यक्ष खरीं झालेलीं पहाण्यास अत्यंत अधीर झालेली! अर्थात् दोनचार दिवसांच्या आंतच घर सोडून मुंबईस जाण्याची त्यांनीं तयारी चालविली. निघण्यापूर्वी एक दिवस त्यांनीं घरीं थाटाचें सत्यनारायणपूजन केलें व रामभटजींनीं सांगितलेल्या एका शुभमुहूर्तावर आपला नागेशी गांव सोडला. निघतेवेळीं श्रीनागेशाचें अत्यंत भक्तिपूर्वक दर्शन घेऊन, त्याचा तीर्थप्रसाद व जवळ बाळगण्यासाटीं अंगारादोरा ग्रहण करण्यास आणि मनोवांच्छित पूर्ण केल्यास पुनः दर्शनासाठीं आल्यावर सोन्याचा मुकुट वाहण्याचा मनांतल्या मनांत त्याला नवस करण्यास गजराबाई विसरली नाहीं!

( ५ )

मुंबईस आल्यावर पहिले कांहीं दिवस जाईचे पूर्ण आनंदांत गेले, कारण, एखादें प्रेक्षणीय स्थळ किंवा नाटक, सिनेमा पहाण्यासाठीं

रघूदादा तिला बाहेर घेऊन गेल्याशिवाय एकही दिवस सुना जात नसे ! पण नंतर, हळु हळू गजराबाईनें व रघूदादानें तिला तिच्या जातीच्या व्यवसायाचें ज्ञान करून देण्यास सुरवात करतांच, दिवसेंदिवस तिच्या मनांत चिंतेचें व अस्वस्थतेचें काहूर माजूं लागलें !

पापपुण्याचे, धर्माचे, नीतीचे पाठ आजपर्यंत कोणाकडूनही तिनें ऐकले नव्हते ! शिक्षणामुळें प्राप्त होणारी स्वतंत्र विचारशक्तीही अजून तिच्यांत फारशी आलेली नव्हती ! तरी पण, निसर्गतःच "सत्यं, शिवं, सुंदरं !" कडे प्रवृत्ती असणारीं माणसें या जगांत आपल्याला अनेक आढळून येतात ! त्यांच्या या सत्प्रवृत्तीची उपपत्ति सांपडणें कठीण असलें तरी, तिचें अस्तित्व मात्र कोणालाही नाकारतां येणार नाहीं ! सुदैवानें जाई या भाग्यशाली वर्गापैकीं एक होती.

जरी आपल्या आयुष्याच्या भवितव्याविषयीं गंभीरपणें विचार आजपर्यंत तिनें कधींही केला नव्हता, तरी जेव्हां जेव्हां बाल्यावस्थेंत जुईच्या सहवासांत घालवलेल्या आपल्या गतकाळाकडे ती दृष्टी फेंकी, तेव्हां, इतर अनेक सौख्यदायक गोष्टींबरोबरच जुईचें लग्न ठरल्यानंतरचे ते खेदयुक्त दिवस व विशेषतः माईशीं घडलेल्या त्या भीतीदायक प्रसंगाचें स्पष्ट चित्र तिच्या डोळ्यांपुढें येऊन उभें राही व "जुईला तुझ्याप्रमाणें शेस घालून आजन्म घरींच ठेवायची काय ?" या पराकाष्ठेच्या तिरस्कारानें भरलेल्या माईच्या शब्दांची घनगर्जना, जणूं पुनः प्रत्यक्ष ऐकत असल्याप्रमाणें, तिच्या कानांवर येऊन आदळे व अशा या प्रत्येक वेळीं तिच्या सद्भावनांना चालन मिळून प्रसंगोपात्त गजराबाईच्या विचारोच्चारांच्या दूषित संसर्गामुळें, तिला नकळत तिच्या मनावर सांचल्या गेलेल्या मलिन रजःकणांना त्या झाडून टाकीत !

अशा रीतीनें आजपर्यंत दूषित वातावरणांत वाढूनही, सुदैवानें अंतःकरणानें निष्पाप राहिलेल्या जाईस गजराबाईची व रघूदादाची

नवीन सुरू झालेली ही भुणभुण रुचेनाशी झाली हें साहजिकच आहे; तरीपण या बाबतीत तिच्या प्रवृत्तीचा ओढा योग्य दिशेला असला, तरी त्यांत दृढता व जोरकसपणा हीं आलीं नव्हती; तीं मुंबईला आल्यानंतर कांहीं दिवसांनीं अवचित घडून आलेल्या एक दोन साध्या गोष्टींमुळें तिला प्राप्त झालीं.

एक दिवस सकाळीं आपल्या चाळीच्या गॅलरीत उभी राहून, रस्त्यावरील लोकांची व वाहनांची ये—जा पाहण्यांत गर्क होऊन गेलेल्या जाईला, खालील फूटपाथवर उभा असलेल्या एका फेरीवाल्याची 'पन्नास रुपयांचीं पुस्तकें पांच रुपयांस!' अशी कर्कश आरोळी ऐकूं आली. जाईला पद्यवाचन व पत्रलेखन या आवश्यक गोष्टींपुरतें लिहिणेंवाचणें गजराबाईनें शिकविलें होतें व पुस्तकवाचनाची आवड तिच्यामध्यें उत्पन्न करण्यास तें कारण झालें होतें. पण नागेशीसारख्या लहानशा खेड्यांत तिला आपली ही वाचनाची हौस 'गुलबकावली,' सिंहासनबत्तिशी 'सारख्या, कधींकाळीं आपोआप हातीं येणाऱ्या लहानसहान पुस्तकांवर भागवून घ्यावी लागे. अर्थात या फेरीवाल्याचे शब्द कानीं येतांच, अशा सवंग सवद्याचा फायदा घेण्याचा मोह अनावर होऊन तिनें त्याला वर बोलावलें. एवढी मोठी रक्कम एकदम पुस्तकांसाठीं खर्च करण्याची कल्पना गजराबाईला प्रथम फारशी आवडली नाहीं; पण फेरीवाल्यानें पुस्तकांचें केलेलें सफाइदार वर्णन, त्यांसाठीं जाईनें धरलेला हट्ट व मुंबईत तिच्या नजरेस आलेल्या पुस्तकें वाचण्याच्या तरुण स्त्रियांमधील फॅशनमुळें जाईसाठीं अशा कांहीं पुस्तकांची तिलाही वाटणारी आवश्यकता, इतक्या गोष्टी कारण होऊन तिनें शेवटीं या खरेदीस अनुमती दिली व फेरीवाल्याचे पैसे चुकते केले.

सुंदर बाइंडिंगचीं व छपाईचीं तीं तीसपस्तीस पुस्तकें म्हणजे एखाद्या सुशिक्षित व सदभिरुचीच्या कुटुंबांतील अनेक वर्षें उत्कृष्ट

निवड करून जमवलेला, पण कोणत्याही आपत्कारणानें तेथून विक्रीसाठीं जुन्या बाजारांत आलेला, एक लहानसा मौल्यवान पुस्तकसंग्रह होता. त्यांत बराच भरणा मराठींतील कित्येक सुप्रसिद्ध लेखकांच्या नाटकांकादबऱ्यांचा असून बाकीचीं पुस्तकें थोर स्त्रीपुरुषांच्या चरित्रपर व उपदेशपर अशीं होतीं. हीं इतकी पुस्तकें हातीं येतांच जाईला अत्यानंद झाला ! सांजसकाळ, दिवसरात्र त्यांतील एकामागून एक पुस्तक वाचून संपवण्यापलीकडे तिला आतां कांहींही सुचेनासें झालें ! इतकीं सुंदर पुस्तकें अस्तित्वांत असतील, अशी तिला यापूर्वी कल्पनाही नव्हती ! सर्व दिवस वाचनांत खर्चकरावा व रात्रीं झोंपण्यासाठीं बिछान्यावर पडल्यावर, एखाद्या नाटकांतील किंवा कादंबरींतील सद्गुणी नायकनायिकेचीं धीरोदात्त कृत्यें किंवा चरित्रविषयक पुस्तकांतील थोर सच्छील स्त्रीपुरुषांच्या आयुष्यांतील स्फूर्तिदायक प्रसंग पुनः पुनः मनश्चक्षूंपुढें आणून, त्यांमुळें प्राप्त झालेल्या एक प्रकारच्या गोड अस्वस्थतेचा अनुभव घेत तासचे तास घालवावे, हा यापुढें तिचा नित्यक्रम होऊन बसला ! विशेषतः, अशा पुस्तकांतील काल्पनिक किंवा खऱ्याखुऱ्या आदर्श व्यक्तींच्या वैवाहिक स्थितीचीं दिलेलीं हृदयंगम चित्रें व त्यांतील पावित्र्ययुक्त वातावरण, यांचा तिच्या संस्कारक्षम मनावर इतका कल्पनातीत सुपरिणाम होत चालला, कीं त्यामुळें, पूर्वीच तिच्यामध्यें बीजरूपानें वसत असलेल्या अनेक उन्नत भावनांचा व तिच्या विचारशक्तीचा आश्चर्यकारक विकास होऊं लागून, तिच्या दृष्टीपुढें आपल्या आयुष्यविषयक एक नवीन उज्ज्वल ध्येय स्पष्टपणें दिसून येऊं लागलें ! लवकरच पूर्वीप्रमाणें आपल्या आईचे व मामांचे उपदेशपाठ मुकाट्यानें ऐकून घेणें तिला असह्य होऊं लागलें ! त्यांच्या विचाराविरुद्ध प्रथम नापसंती, नंतर तिरस्कार व शेवटीं शेवटीं तर उघडपणें बंडखोरपणा व्यक्त करण्यास तिनें सुरवात केली ! ध्यानीं-

मनींही नसलेलें एवढें मोठें मानसिक परिवर्तन आपल्या मुलीमध्यें घडून आलेलें दिसतांच, गजराबाईला अत्यंत काळजी वाटूं लागली व तिचें हें वेड विशेष वाढण्याच्या आधींच, तिच्या ठराविक भावी आयुष्यक्रमामध्यें तिला लवकर गुंतवून टाकावें व त्याची गोडी लावावी, असें तिनें ठरवलें आणि तदनुसार हातीं घेतलेलें काम लवकर तडीस नेण्याबद्दल रघूदादामागें एकसारखें टुमणें लावलें !

( ६ )

सकाळचे दहा वाजले असतील ! एक दोन तासांपूर्वी बाहेर गेलेला रघूदादा आपल्या बिऱ्हाडीं परत येऊन कपडे उतरत होता. कपडे काढित असतांच, त्यानें आपलें नेहमींचें आवडतें पद " स्वकुलतार-कसुता० " आज विशेष उच्च कंठानें म्हणण्यास सुरवात केली. नेहमीं-हून तो लवकर परत आलेला पाहून व त्याच्या गाण्यामध्येंही जादा आवेश भरलेला दिसतांच, गजराबाईनें ताडलें कीं आज कांहीं तरीं विशेष प्रकार घडलेला असावा ! तो काय आहे हें जाणून घेण्यासाठीं ती लगबगीनें बाहेर आली. रघुदादाही ती बाहेर येण्याचीच वाट पहात होता ! तिला पहातांक्षणींच तो उद्गारला, " सुटलों बुवा एकदां तुझ्या कचाट्यां-तून ! आज एक नामी संधि साधून एकंदर घाट बरोबर जुळवून आणला आहे ! त्यांत आतां यश येणं न येणं तुझ्या नशिबावर अवलंबून ! "

" म्हणजे ? असा पुरुषार्थ केलास तरी काय ? सांग ना नीट ! "

" अग, नेहमींप्रमाणें त्यांच्या बंगल्याशेजारीं आज बराच वेळ मी घिरट्या घालीत होतों. शेवटीं, स्वारी मोटारींतून बाहेर फिरायला गेलेली परत आली. त्यांस पहातांच बंगल्यांत शिरत असल्याचा मी आविर्भाव आणला. नंतर मोटारींतून उतरून 'संध्याकाळीं सहाला ठाकूरद्वारला काळ्यारामाच्या मंदिरांत कीर्तनाला जायचं आहे, वेळेवर मोटार घेऊन ये !' असं ते ड्रायव्हरला म्हणाले व फाटक ओलांडूं लागले,

तोंच मी माझा झोंकदार नमस्कार ठोकतांच गृहस्थ थांबले व 'कोण? काय काम आहे?' वगैरे विचारपूस करूं लागले. मला तेवढंच पाहिजे होतं! अत्यंत सलगीच्या स्वरानें अण्णासाहेबांचं, त्यांच्या वडिलांचं नांव घेऊन, त्यांना भेटायला आल्याचं सांगितलं. तें ऐकतांच खेदयुक्त शब्दांनीं ते म्हणाले, "माझे वडील सहा महिन्यामागेंच निवर्तले!" तें ऐकतांच मी दुःखाच असं कांहीं सोंग आणलं, कीं कांहीं विचारूं नकोस! बिचारे पक्के फसले! म्हणाले, 'चला, आंत या! तुम्ही माझ्या वडिलांचे कोणी जुने स्नेही दिसतां!' मी आंत गेलों. पुढल्या गोष्टी काय तुला सांगायला हव्यात? अण्णासाहेबाच्या व माझ्या निकट स्नेहाच्या अशा कांहीं लोणकढया दिल्या कीं, स्वारी गार झाली! नंतर चहा, फराळ यथास्थित झाल्यावर निरोप घेऊ परत आलों!"

"मग आतां पुढं काय करायचा विचार आहे तुझा?" गजराबाईनें अधीरतेनें प्रश्न केला.

"संध्याकाळीं जाईला घेऊन ठाकुरद्वारला कीर्तनाला जाण्याचा!"

"तेवढयानं काय साधणार?"

"काय साधणार? अतिपरिचयामुळें जाईच्या सौंदर्यात काय जादू भरली आहे याची तुला कल्पना नाहीं! एकदां तिच्यावर त्यांची नुसती नजर पडूं दे, मग ते आलेच माझ्या मुठींत!"

हें ऐकून गजराबाईला मनांत अभिमानाच्या व आनंदाच्या गुदगुल्या झाल्या! किंचित् विचार करून ती म्हणाली,

"पण खरोखरच का ते इतके श्रीमंत आहेत?"

"हें काय विचारतेस? अग मी आज एक महिना त्यांची एकंदर माहिती मिळविण्यांत गुंतलों आहें, तो उगीच? याचा बाप खरोखरच एक मोठा कर्तबगार माणूस होता. त्यानें आपल्या हयातींत पंधरावीस लाखांची इस्टेट मिळविली आहे, तिला हे एकुलते एक चिरंजीव वारस!

दावणगिरी, हुबळी, बेळगांव, पुणें व मुंबई अशा पांच ठिकाणीं त्यांच्या आज पेढया चालू आहेत! आतां थोडे दिवस एक अडचण आहे, ती यांच्या चुलत्याची! म्हातारा फार खाष्ट व खमंग आहे! इस्टेटीवर सर्व देखरेख डोळ्यांत तेल घालून स्वतः पहातो. पुतण्याच्या हातांत काडीचाही अधिकार ठेवलेला नाहीं! पण म्हाताऱ्याच्या गोंवऱ्या केव्हांच मसणांत गेल्या आहेत! त्यानें एकदां डोळे मिटले, कीं मग आम्ही आहोंत व यजमानसाहेब आहेत, पाहून घेऊं! बरं, आतां एक गोष्ट बरीक लक्षांत ठेव; या एकंदर प्रकरणाचा जाईला एव्हां कांहींही थांग लागूं द्यायचा नाहीं! नाहीं तर, ती बिथरून जाईल! नुसतं रामाच्या मंदिरांत कीर्तनाला जायचं आहे, एवढंच तिला कळवायचं!"

पलीकडल्या खोलींत 'आमच्या आयुष्यांतील आठवणी'च्या वाचनांत तन्मय होऊन गेलेल्या जाईला आपली आई व मामा यांचा काय खल चालला आहे याची कल्पनाही नव्हती!

संध्याकाळीं तास दोनतास आपलें सर्व कौशल्य खर्च करून गजराबाईनें जाईची चित्ताकर्षक रीतीनें वेणीफणी केली व उत्तमोत्तम वस्त्रालंकारांनीं तिला नटवलें! आपल्याला सजवण्यांत आज आई इतकी कां काळजी घेत आहे हें माहित नसल्यामुळें, जाई प्रथम बुचकळ्यांत पडली, पण कीर्तनाला जाण्याच्या उत्सुकतेच्या भरांत तिला त्या गोष्टीचा विसर पडला व शेवटीं साडेपांच वाजतां रघुदादा तिला घेऊन ठाकुरद्वारकडे जायला निघाला.

पंधरा वीस मिनिटांच्या आंत तीं दोघेंही देवळांत जाऊन पोहोंचलीं. त्या दिवशींचे कीर्तनकार फार प्रख्यात व लोकप्रिय असल्यामुळें, श्रोत्यांची बरीच गर्दी होण्याचा संभव होता, पण अजून कीर्तनाला बराच अवकाश असून, सभामंडप मोकळाच होता. जाईला बसण्या-

साठीं अशा एका जागेची धूर्त रघुदादानें निवड केली, की देवळांत कोठेंही असलेल्या एखाद्या इसमास ती स्पष्टपणें दिसावी !

थोड्या वेळानें सभामंडपांत गर्दी व्हायला सुरवात झाली व योग्य वेळेवर कीर्तनालाही आरंभ झाला. बुवांनीं स्कंदपुराणांतील कथेच्या आधारें महानदेचें आख्यान आज लावलें होतें. समाजसेवेचें ध्येय पुढें ठेवून, त्यासाठीं कीर्तनसंस्थेचा उपयोग करून घेणाऱ्या व महाराष्ट्रांत नवीन उदय पावूं पाहणाऱ्या कीर्तनकारांच्या वर्गात या बुवांना बरेंच वरचें स्थान देणें योग्य होतें. जुन्या पौराणिक व ऐतिहासिक कथांच्या आधारें, सध्यांच्या सामाजिक व राजकीय प्रश्नांवरील आपले प्रगमनशील विचार परिणामकारक रीतीनें श्रोत्यांच्या मनावर बिंबवण्यांत त्यांचा हातखंडा होता ! म्हणजे रघूदादाचा आजचा नीच डाव म्हणजे जाईच्या बाबतींत तिच्यावर झालेला देवाचा प्रच्छन्न प्रसादच होता ! लहानपणापासून आपल्या गांवीं श्रीनागेश देवालयांत होणारीं अनेक कथाकीर्तनें तिनें ऐकलेलीं होतीं. पण तीं सर्व 'ताकापुरतें रामायण' या वर्गातलीं ! ठराविक तिथीच्या दिवशीं एखाद्या ठराविक सोमाजीगोमाजीनें येऊन, भक्तिरसाच्या नांवाखालीं देवांच्या शृंगारचेष्टा वर्णन करून थोडा वेळ श्रोत्यांमध्यें हास्यरस पिकवावा व शेवटीं हरिनामाचा गजर करून, ठरलेलें वर्षासन कनवटीला लावून चालायला लागावें, हा तेथला प्रघात ! अर्थात्, जसजसे उत्कट जिव्हाळ्यानें भरलेले व सुविचारपरिपूर्ण असे आजच्या कीर्तनकारांचे हृदयस्पर्शी बोल जाईच्या कानीं पडूं लागले, तसतशी ती बाह्य जगाला पूर्णपणें विसरून जाऊन त्यांशीं समरस होऊं लागली ! गेल्या महिन्या दीड महिन्यांमध्यें घडून आलेल्या तिच्यामधील मानसिक परिवर्तनामुळें, अशा प्रकारच्या मार्गदर्शक व अधिकारयुक्त उपदेशास तिचें मन पूर्वीच तहानलेलें होतें ! तृषार्तभूमी ज्याप्रमाणें वर्षाकालांतील आरं-

भींच्या जलधारा त्यांतील एकही बिंदु वांया जाऊं न देतां तत्काल शोषून घेते, तद्वत बुवांच्या तोंडून बाहेर पडणारा शब्दन् शब्द जाई आपल्या हृदयसंपुटांत सांठवूं लागली !

पण याच वेळीं रघूदादाच्या मनाची कोण तळमळ चालली होती ! क्षणोक्षणीं बाहेर रस्त्यावर दृष्टी फेंकीत बिचारा देवळाच्या दाराशीं चिंताक्रांत मुद्रेनें एकसारखा येरझारा घालीत होता ! कीर्तन सुरू होऊन जवळ जवळ तास होत आला तरी, त्याच्या मनांतील अपेक्षित गोष्ट घडून येत नव्हती ! आपला सगळा डाव फुकट जातो कीं काय या भीतीनें त्याच्या चेहऱ्यावर निराशेची छाया अधिकाधिक पसरत चालली ! इतक्यांत बरोबर साडेसात वाजतां बाहेर रस्त्यावर एक मोटार येऊन थांबलेली पहातांच रघूदादाची चर्या एकदम प्रफुल्लित झाली ! ती मोटार व त्यांत बसलेले गृहस्थ यांची पाहिल्याबरोबर त्याला ओळख पटली ? मोटारींतून उतरून रामराव आंत आल्यावर दोघांची दृष्टादृष्ट होतांच, सहास्य मुद्रेनें व मोठ्या अदबीनें रघूदादानें त्यांना नमस्कार केला !

“ तुम्हांलाही कथाकीर्तनाचा शोक दिसतो ?” नमस्कार परत करीत असतां, शिष्टाचारार्थ कांहीं बोलणें आवश्यक भासल्यामुळें रामराव म्हणाले.

पण लगेच स्पष्टवक्तेपणाचा आव आणून रघूदादा उत्तरला, “ छे, छे ! खरं सांगायचं म्हणजे मला या गोष्टींचा तितकासा नाद नाहीं, तरीपण, आज यावंच लागलं. गोव्याहून भाची चार दिवस इथं राहायला आली आहे. कीर्तनाला न्या म्हणून फारच हट्ट घेऊन बसली !” हे शब्द बोलतां बोलतां सहज पण नेमकें जाईकडेच रामरावाचें लक्ष्य जाईल, अशा अचूक रीतीनें, त्यानें तिच्याकडे अंगुलीनिर्देश केला !

या गोष्टीचा रामरावांवर, रघूदादाला इष्ट असाच परिणाम घडून आला. त्यांची जाईकडे वळलेली दृष्टि बराच वेळ तेथून हलेना! जाईचें आधींच अनुपम सौंदर्य! त्यांत तिनें सुमनोहर रीतीनें परिधान केलेल्या सुंदर वस्त्रालंकारांची व बुवांच्या रसाळ वाणीशीं झालेल्या तन्मयतेमुळें तिच्या वदनावर पसरलेल्या एक प्रकारच्या गोड मार्दवाची भर पडलेली! अशा प्रकारचें विद्युत्प्रकाशामध्यें विशेषच खुलून दिसणारें तिचें हें चारुचित्र दृष्टीस पडतांच, आजपर्यंत कधींही संयमाची संवय नसलेला रामरावांचा मोकाट मनोवारु किती भडकला असेल याची कल्पनाच केलेली बरी! त्यांच्या दृष्टींतील उन्मादयुक्त आशाळभूतपणा लक्ष्यांत येण्यास धूर्त रघूदादाला एकदोन क्षणच पुरे झाले! आणि आपण योजिलेला एकंदर व्यूह पार पडणार असल्याबद्दलचा हा शुभशकूनच अशी त्यानें स्वतःच्या मनाशीं तत्काळ खूणगांठ बांधली! थोड्या वेळानें रामराव भानावर आले व सभामंडपांत जाऊन एका सोयीस्कर जागीं बसले. रघुदादा आतां त्यांच्यापासून थोडाच दूर रहातो! त्यांच्या शेजारींच त्यानें आपलें आसन ठोकलें. मधून मधून हलक्या आवाजांत त्यांचें संभाषण चालू झालें व त्यांतील परस्परांसंबंधींच्या सलगीचा स्वर क्षणोक्षणीं वाढत चालला!

तासा दीड तासानें कीर्तन आटोपलें. शेवटीं शेवटीं बुवांनीं आपल्या कीर्तनाचा समारोप अशा कांहीं उद्बोधक व स्फुर्तिदायक शब्दांनीं केला, कीं, जाईच्या डोळयांतूनही, इतर कित्येक श्रोत्यांप्रमाणें, सद्गदित स्थितीमुळें घळघळां अश्रु वाहूं लागले! आपापल्या जागा सोडून बाहेर जाण्याची लोकांमध्यें लगबग सुरू झाली, पण जाई मात्र समोरच्या श्रीरामाच्या मूर्तीवर दृष्टि लावून किती तरी वेळ आपल्याच विचारांच्या तंद्रींत गुंग होती! शेवटीं, रघूदादाची हांक ऐकून ती भानावर आली.

पाण्यानें भरलेल्या तिच्या डोळ्यांकडे नजर जातांच तो उपहासपूर्वक हंसून बोलला, "किती ग खुळी तूं जाई ? अग, या पुराणांतल्या गोष्टींवर इतकी का कोणी श्रद्धा ठेवतात ? सहज करमणुकीसाठीं एका कानानं ऐकायच्या व दुसऱ्यानं सोडून द्यायच्या ! चल, पूस आपले डोळे व निघ माझ्याबरोबर !"

आपली ही स्थिति त्याच्या लक्ष्यांत आल्याबद्दल जाई थोडीशी खजिल झाली ! तिनें झटकन् आपले डोळे पुसले व त्याच्याबरोबर चालायला सुरवात केली. तिच्यासह रघूदादा बाहेर रस्त्यावर येतो, तों रामराव अजून आपल्या मोटारीशेजारीं उभे असल्याचें त्यास दिसलें. किंचित् जवळ जाऊन रघूदादानें निरोपादाखल पुनः एकदां त्यांस नमस्कार केला, पण तो परत करण्याऐवजीं रामराव म्हणाले, "तुम्ही कुठं रहातां ? खेतवाडीला ना ? मग चला मोटारींतूनच–तुमची कांहीं हरकत नसली तर ! मलाही त्याच बाजूला जायचं आहे." रामरावांच्या या अनपेक्षित मेहेरबानीनें किंचित् घोंटाळयांत पडल्याचें दर्शवून, शेवटीं कृतज्ञतापूर्वक रघूदादानें त्यांची सूचना मान्य केली व जाईसह तो त्यांच्या शेजारीं मोटारींत जाऊन बसला.

या नवीन प्रकारानें जाई थोडा वेळ बावरल्यावांचून राहिली नाहीं ! पण मोटार सुरू होतांच, महानंदेचें कथानक व तदनुरोधानें बुवांनीं प्रगट केलेले परिणामकारक विचार, यांत तिचें मन पुनः गर्क होऊन गेलें. रघूदादा व रामराव यांच्या गप्पा चालल्या होत्या, पण रामरावाच्या शब्दांतील असंबद्धतेवरून, त्यांच्या डोळयांप्रमाणेंच त्यांचें चित्तही जाईवर स्थिर झालें होतें, हें कोणीही ताडलें असतें ! शेवटीं खेतवाडीला मोटार येतांच, रघूदादा जाईसह खालीं उतरला व अघळपघळ शब्दांनीं रामरावांचे आभार मानून त्यानें त्यांचा निरोप घेतला.

(७)

जाईच्या आयुष्यांतील अत्यंत आणीबाणीची वेळ येऊन आतां ठेपली होती ! ठाकूरद्वारच्या राममंदिरांत ऐकलेल्या कीर्तनाच्या दिवसापासून तिच्या वृत्तीमध्यें महदंतर घडून आलें होतें! पूर्वी ती अष्टौप्रहर वाचनांत गढून गेलेली दिसे, पण आतां तिचा तो नाद कमी होऊन तिचा बहुतेक वेळ आपल्या खोलींत बसून अस्वस्थ चित्तानें विचार करण्यांतच जाऊं लागला. कांहींही झालें तरी, यावज्जन्म वेश्याव्यवसाय स्वीकारायचा नाही, हें आपलें आयुष्यविषयक ध्येय तिनें अलीकडे निश्चित केलें होतें, पण तें साध्य करून घेण्याच्या मार्गात तिला दिसून येणाऱ्या अनेक अडचणी कशा नाहीशा कराव्या हा मोठाच प्रश्न तिच्यापुढें होता !

"आपल्या जातींत शिक्षण मिळवून समाजांत उच्च पदवीस चढलेले पुरुष फारच थोडे आहेत आणि जे आहेत त्यांना स्वकुलाची लाज वाटत असते व ते आपली खरी जात लपवून इतर जातीत शिरण्याचा प्रयत्न करीत असतात, अशा प्रकारची खरींखुरीं अनेक उदाहरणें आई दाखवून देते; मग असा कोणता सुशिक्षित व सच्छील पुरुष माझ्याशीं विवाह लावायला तयार होईल ? राहिलेल्या अशिक्षित व ऐतखाऊ वर्गातील एखाद्या पुरुषाशीं जन्माची गांठ पडली, तर तो विवाह मला कितपत सुखाचा होईल ? मग आजन्म अविवाहितच रहावें काय ?— पण अविवाहित राहून गायन, वादन, नृत्य या कलांचा उपयोग उपजीविकेसाठीं केला तर माझ्या कुळदोषामुळें, समाजाच्या संशयी दृष्टीला मी नेहमीं एक लबाड वेश्याच नाहीं का दिसणार ?—या गोष्टी बाजूस ठेवल्या तरी आज अनेक वर्षें मनांत बाळगलेली महत्त्वाकांक्षा व आशा सोडून देण्याबद्दल, जुन्या विचारांच्या आईची समजूत कशी पाडतां येईल ?" असे अनेक बिकट विचार गेले सात आठ दिवस तिच्या मनांत घोळत असून, त्यांना योग्य उत्तर तिला सांपडत नव्हतें !

दोन चार दिवसांपूर्वी वाचायला घेतलेलें पुस्तक पुरें करावें असें ठरवून ती आपल्या खोलींत येऊन बसली असतां, वाचन बाजूला राहून आजही ती अशाच विचारांच्या तावडींत सांपडली होती ! त्या स्थितींत तिची सर्व संध्याकाळ निघून गेली, तरी मनांत माजलेल्या अनेक शंकाकुशंकांच्या जाळ्यांतून तिची सुटका होईना ! इतक्यांत गजराबाई आंत आली.

खोलींत काळोख असून जाई खिडकीशीं स्वस्थ बसलेली पाहातांच, " असला कसला ग विचार तुझ्यामागं लागला आहे ? बत्ती पेटवण्याचं सुद्धां तुला भान नाहीं ! " असें म्हणून तिनें विजेचा बटन दाबला व खोली प्रकाशित केली. नंतर ती जाईजवळ येऊन बसली व बऱ्याच लाडिकपणानें तिला म्हणाली, " बाळ, मुंबईला आल्यापासून कोठून हा विलक्षण वेडेपणा तुझ्यांत आला आहे ? बिचारा रघूदादाचा व माझा जीव तुझ्या सुखासाठीं तिळतिळ तुटतो आहे ! पण तुला त्याचं कांहीं आहे का ? तूं आपल्याच तंद्रींत दिवसभर गुंग ! गांवीं असतांना गायनवादनावाचून तुला दुसरें कांहींहि रुचत नव्हतें, पण इथं आल्यापासून मी पाहतें आहें, तुझ्या हातांत नेहमीं आपलीं तीं मेलीं पुस्तकं आणि मनांत खंत व विचार ! तो दिलरुबा व सतार पेटींत पडून आहे, त्यांना तूं एकदांही हात लावला असशील तर शपथ ! गाण्यासाठींही एक दिवसही तूं तोंड उघडलेलं मला माहित नाहीं ! अग, ही विद्या सरावानं वाढत जाते व त्याविना असलेली नाहींशी होते ! जें थोडंबहुत तूं कांहीं शिकली आहेस, त्यासाठीं माझ्याकडे असलेलं किडूकमिडूक विकून दरमहा गवयांपुढं मला कसे रुपये मोजावे लागत हें तुला माहित आहे ! मग अशा रीतीनें महत्प्रयासानें मिळविलेलीं कला अशी कां वांयां जाऊं द्यायची ? अग, तिच्यावर तर आमचं सगळं जीवन ! चल, उचल आपला दिलरुबा ! आजपासून नेमानें दररोज तास दोन तास या

गोष्टींत घालवायचे ! आज ते रघूदादांचे स्नेही रामरावही बाहेर आले आहेत, त्यांना गाण्याबजावण्याचा भारी शोक ! स्वतःही त्यांना त्यांत गती बरीच आहे. चल, बाहेर येऊन थोडा वेळ दिलरुबा वाजव व आपल्या आवडीच्या एकदोन चिजाही म्हणून दाखव !"

एवढा वेळ शांतपणें आपल्या आईचें भाषण ऐकत असलेली जाई, रामरावांचें नांव काढतांच एकदम खवळून गेली ! अत्यंत तिरस्कार-पूर्वक व निर्धारपूर्वक ती म्हणाली, " आई, तुझा व रघूदादांचा सर्व कावा मला माहित आहे ! मी, प्राण गेला तरी, त्यांना खुष करायला कधीं गाणार नाहीं व वाजवणारही नाहीं !"

गजराबाईनें पुनः आपला युक्तिवाद सुरू केला, " झालं, भडकलं तुझं पित्त ! या अशा अविचारी स्वभावामुळं माझ्या मागं तुझं या जगांत कसं काय निभावेल, याचीच मला अलीकडे काळजी वाटू लागली आहे ! अग, देवानं आपल्याला जी थोडीबहुत विद्या दिली आहे ती क्षणभर इतरांच्या मनाला आल्हाद देण्यासाठीं नव्हे तर कशासाठीं ? रघूदादानं इतक्या अभिमानानं आपल्या भाचीच्या गायनवादनांतील नैपुण्याबद्दल सहज त्यांच्याशीं स्तुती केली व तें स्वतः प्रत्यक्ष पहाण्यासाठीं ते एवढे बडे गृहस्थ पण रघूदादाच्या स्नेहाखातर थोर मनानं आम्हां गरिबांच्या घरीं आले, तर आतां त्यांचा असा अपमान का करायचा ? अग, तुला ही कोठली अवदसा आठवली आहे ? आमच्या जातीला हा असला ताठा शोभत नाहीं बरं ! हे तुझे सगळे भिकेचे डोहाळे आहेत ! "

अशा प्रकारें आपलें सर्व वाक्चातुर्य खर्च करून जाईची समजूत पाडण्याची गजराबाईनें आपली शिकस्त केली ! पण त्यांत मुळींच यश न आल्यामुळें शेवटीं तिच्यावर जळफळत व संतापत ती बाहेर निघून गेली.

“ काय करावें ? जाईचं आजच नेमकं कपाळ ठणकत आहे ! थोडा तापही आला आहे ! ” असें रघूदादाला उद्देशून बाहेर गजराबाईनें उच्चारलेले शब्द लगेच आंत जाईच्या कानांवर आले !

ठाकुरद्वारच्या राममंदिरांतील कीर्तनाच्या दिवसापासून, गेल्या पंध-रवड्यांत रामराव व रघूदादा यांच्यामधील स्नेह इतक्या झपाट्यानें वाढत चालला होता कीं, ती एक कोणालाही आश्चर्य वाटण्यासारखीच गोष्ट होती ! एक दोन दिवसांआड रामरावांची मोटर रघूदादांच्या ‘गोपाळ बिल्डिंग’ पुढें येऊन थांबली नाहीं व कांहीं ‘जरूरीच्या कामासाठीं’ रघूदादाला भेटण्यासाठीं ते त्याच्या बिऱ्हाडीं आले नाहींत व नंतर रघूदादानें थाटाच्या चहानें त्यांचें स्वागत केलें नाही, असें सहसा अलीकडे घडत नसे !

रघूदादाही प्रत्यहीं बाहेरून घरीं आला कीं, “ आज रामरावांबरो-बर अमक्या जवाहिरवाल्याच्या दुकानीं गेलों होतों ! अमक्या कुळाब-रोबर अमुक हजारांचा त्यांचा वांधा पडला होता, तो आज माझ्या-समक्ष मिटला ! उद्यां नाटकाला यायला गृहस्थ मनस्वी आग्रह करतो आहे ! काय करावं, गेलंच पाहिजे !” अशा त्याच्या गोष्टी जाईच्या कानावर जातील अशा रीतीनें, आपल्या अक्काशी सुरू झाल्याच !

प्रथम प्रथम, रामरावांसंबंधीं चाललेल्या या गोष्टी ऐकून जाई कांहीं तरी कुतूहलबुद्धि दाखवील असे त्यांस वाटत होतें; पण तिचें त्या बाबतींत पूर्णपणें दुर्लक्ष दिसून येतें, इतकेंच नव्हे, तर रघूदादांना भेटण्यासाठीं ते घरीं आल्यावर चहा देण्याच्या किंवा अशाच दुसऱ्या निमित्तानें तिला त्यांच्या समोर पाठवण्याचे आपले प्रयत्न ती मुद्दाम धुडकावून लावते, हें लक्षांत आल्यावर, आतांशा त्या दोघांनींही राम-वांशीं तिचें आपल्या कुलाचाराप्रमाणें योग्य वर्तन घडत नसल्याबद्दल तिची वारंवार कानउघाडणी करण्याचा व त्यांचें तिजवर प्रेम जडल्यास

त्यामुळें तिचें जन्माचें कर्म कोटकल्याण घडून येईल, हें तिच्या मनावर ठसवण्याचा क्रम सुरू केला होता. पण त्याचा जाईवर इष्ट परिणाम झालेला मुळींच दिसेना! इतकेंच नव्हे, तर त्यांजकडून सुचवण्यांत येणाऱ्या मार्गाबद्दल आपला तीव्र तिरस्कार व सदाचारापासून आपल्या आयुष्यांत तिळभरही न ढळण्याचा आपला निर्धार, शेवटीं एकदोनदां तिनें इतक्या सडेतोडपणें व्यक्त केला, कीं जणूं कोणीतरी तिच्यामध्यें संचरल्यामुळेंच असें हें भयंकर परिवर्तन तिच्यांत घडून आलें आहे, असे गजराबाईस व रघूदादास वाटल्यावांचून राहिलें नाहीं!

जरी मागील एकदोन महिन्यामध्यें जाईच्या मनाचा कल भलतीकडे वाहूं लागल्याची गजराबाईस व रघूदादास जाणीव होती व ती बहकून जाण्याचीही त्यांना भीती वाटत होती, तरी पोरवयांत कित्येकदां पुष्कळांच्या मनांत तात्पुरतें ठाणें देणाऱ्या अशा विचित्र कल्पना कायम टिकणाऱ्या नसतात हें त्यांना पक्कें माहित असल्यामुळें, योग्य प्रयत्नाअंतीं लवकरच तिला ताळ्यावर आणतां येईल याबद्दल त्यांना खात्री होती; पण जाईचें गाणें बजावणें ऐकण्याची रामरावांची इच्छा पुरी करतां न येऊन त्यांचा अपमान होण्याचा आजचा प्रकार घडण्याइतका जाईचा हटवादीपणा भलत्याच थराला जाऊन पोंहोंचलेला पाहातांच, त्यास आळा घालण्याचा कांहींतरी जालीम उपाय लगेच योजल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें त्यांनीं ठरवलें!

( ८ )

दुसऱ्या दिवसापासून जाईशीं रुसण्याफुगण्याचे प्रकार गजराबाईनें सुरू केले! त्यांचा व्हावा तितका उपयोग होत नाहींसा पाहून, कांहीं दिवसांनीं अश्रुमोचन, अन्नत्याग इ० अधिक वरच्या पायरीचें त्राग्याचें धोरण तिनें स्वीकारलें! या गोष्टी पाहून मात्र जाईचें कोमल अंतःक-

त्यानें फर्माविलें! बाहेर जाऊन मधून मधून कानावर येत असलेले आपल्या आईचें कण्हणें विव्हळणें व रघूदादाच्या तिला उद्देशून होत असलेल्या करुण प्रार्थना ऐकत दुःखानें मुळुमुळु रडत बसण्यापलीकडे, जाई आतां काय करणार होती? बिचारी भावडी पोर! जगांतील स्वार्थवृत्ती नीचपणाच्या किती खालच्या पायरीपर्यंत उतरूं शकते याची तिला कल्पनाही नव्हती! आईवरील प्रेमामुळें तिच्या अंतःकरणांतील वेदनांची तीव्रता क्षणोक्षणीं वाढत चालली होती! पण तिच्या दृष्टीआड आंतल्या खोलींत गजराबाईच्या पोटांत मधून मधून दुधाच्या वाट्यांना ठाव मिळत आहे, दुःखानें मोठमोठ्यानें हुंदके देणाऱ्या रघूदादाच्या तोंडावर कित्येकदां दुष्ट हास्य चमकत आहे व उपोषणामुळें गलितगात्र होऊन निश्चेष्ट पडलेली गजराबाई व शोकाकुल रघूदादा यांची मधून मधून कुजबुजही चालली आहे, असें तिला कोणी सांगितलें असतें, तर तें स्वप्नांतही तिला खरें वाटलें नसतें!

गजराबाई, रघूदादा व जाई यांचा सबंध दिवस अशा रीतीनें गेल्यावर, रात्रीं आठ वाजतां "अक्का!!" अशी मोठ्यानें हांक मारून रघूदादानें उच्चारलेली एक हृदयद्रावक किंकाळी बाहेर जाईच्या कानांवर आली! ती ऐकतांच तिच्या उरांत धडकी भरली व धांवत धांवतच ती आंत गेली, पण तेथला सर्व प्रकार पाहिल्यावर, तिची कंबरच खचून गेल्याशिवाय राहिली नाहीं! दुःखावेगानें तिच्या डोळ्यांतून घळघळां अश्रुधारा वाहूं लागल्या!

गजराबाई मूर्च्छित होऊन निश्चेष्ट पडली होती! तिचे डोळे पांढरे झाले होते! दांतखिळ्या बसल्या होत्या! अंग अस्ताव्यस्त जमिनीवर पडलें होतें व तिला शुद्धीवर आणण्यासाठीं, दुःखानें हुदके देत व एकसारखा तोंडानें श्रीनागेशाचा धांवा करीत, डोक्यावर पाणी शिंप-

डवणें, कांदा हुंगवणें इ० अनेक उपचार रघूदादा एका मागून एक करीत होता !

जाईनें जवळ जाऊन ओक्साबोक्शीं रडत "आई, आई !" अशा करुणस्वरानें तिला हांका मारायला सुरवात केली ! पण "प्रत्यक्ष आपल्या जन्मदात्या आईस मृत्यूच्या जबड्यांत ढकलून दिल्यावर आतां कशाला हें प्रेमाचें ढोंग ?" असे संतापयुक्त शब्द उच्चारून रघूदादानें तिला दूर ढकललें !

गजराबाईला शुद्धीवर आणण्याचे बराच वेळ आपण केलेले सर्व प्रयत्न व्यर्थ झालेले पाहून, निराशेनें उठून त्यानें कोटटोपी चढविली व "ईश्वरकृपेनें या वेळीं ते डॉक्टर तरी घरीं असोत !" असें स्वतः-शींच पुटपुटून बाहेर धांव घेतली !

त्याच्यामागें, जाईनें त्यानें केलेले सर्व उपचार पुनः आपण करून पाहिले ! पण ते सर्व निष्फळ ठरतांच, आपल्या आईच्या अंगावर अंग टाकून बिचारीनें धाय मोकलून रडण्यास सुरवात केली !

पांच दहा मिनिटांच्या आंत रघूदादा डॉक्टरला घेऊन परत आला ! डॉक्टर फार काळजीपूर्वक गजराबाईला तपासूं लागला ! छाती तपास-तांना यकृताच्या जागेवरच त्यानें आपला स्टेथास्कोप लावला ! त्या स्टेथास्कोपच्या रबरी नळीला कांहीं ठिकाणीं भोंकेंही होतीं ! सारांश, हा डॉक्टर व रोग्याला तपासण्याची त्याची पद्धत, हीं सरसहा कोणा-च्याही दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या सर्वसाधारण वर्गापैकीं नव्हतीं !

शेवटीं, बऱ्याच वेळानें तपासणी संपल्यावर त्यानें चिंतायुक्त मुद्रेनें आपला अभिप्राय व्यक्त केला !

"अंतःकरणावर कसला तरी भयंकर आघात झाल्यामुळें, या बाईची अशी स्थिति झालेली दिसते ! योग्य उपचार केल्यावर त्या थोड्या वेळानें शुद्धीवर येतील—पण, पुनः दुसऱ्यांदा त्यांना फिट

येण्याचा फार संभव आहे व ती आली, तर मग मात्र माझा कांहींही इलाज चालणार नाहीं! तुम्हांला त्यांची कायमचीच आशा सोडावी लागेल!" असें म्हणून त्यांनीं तिला शुद्धीवर आणण्याचे डॉक्टरी उपचार सुरू केले व अर्धा पाऊण तासानें ते यशस्वी होऊन गजराबाईची हळहळ हालचाल दिसूं लागली. ती पहातांच, रघुदादाच्या जीवांत जीव आला! अत्यंत हर्षानें जवळ जाऊन मोठ्या प्रेमानें त्यानें आपल्या अक्काला हांक मारली व तिनेंही क्षीण स्वरानें 'ओ' दिली!

उपवासामुळें आलेली अशक्तता हेंही गजराबाईची अशी अवस्था होण्याचें कारण असल्यामुळें तिनें आतां लवकर अन्नग्रहण करणें किती आवश्यक आहे व तसे न केल्यास तिला पुनः मूर्च्छा येऊन त्याचा किती वाईट परिणाम होईल हें डॉक्टरनें नंतर रघूदादास बजावून सांगितलें व तो निघून गेला.

डॉक्टर निघून गेल्यावर जेवण घेण्याबद्दल रघुदादादानें गजराबाईच्या पुनः पुनः विनवण्या सुरू केल्या! पण, त्यांचा यत्किंचितही परिणाम तिच्यावर होईना! जें ऐकल्यावर जाईचें हृदय पिळवटून निघेल, असें मोजक्या शब्दांनीं एखादें दुसरें उत्तर देऊन, कांहींही झालें तरी अन्न-ग्रहण करणार नाहीं असा आपला निश्चय ती व्यक्त करी! थोड्या वेळानें तिला पुनः ग्लानी येत असल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. तीं पाहून, रघूदादानें आपल्यावर दुःखाचा डोंगर कोसळत असल्याचा आविर्भाव आणून गळा काढून मोठमोठ्यानें रडत जाईजवळ धांव घेतली व तिच्या पायांवर आपलें डोकें ठेवून तो म्हणाला, "जाई, जाई, शेवटीं तुझ्या पायांवर डोकें ठेवून तुझी प्रार्थना करतों, आतां यापुढें तरी आपला निर्दयपणा सोडून दे! अक्काला पुनः ग्लानी येऊं लागली आहे! आतां ती पुनः दुसऱ्यांदा मूर्छित पडली, कीं मग आटो-पला सर्व कारभार! मग जन्मभर पश्चात्तापानें कितीही रडत बसलीस

तरी, तुझी आई पुनः तुला दिसावयाची नाहीं! पहा, आतां एका क्षणाचाही विलंब नको! तिचें समाधान होईल अशा रीतीनें वागलीस, तर, त्यांत तुझं अकल्याण थोडंच होणार आहे! इतका अनर्थ ओढवल्यावर तरी, आतां आपला हेका सोडून दे, तिचें शांतवन कर व तिला अन्न घ्यायला लाव! पहा, आतां तिचें जगणें किंवा मरणें तुझ्या हातीं आहे!"

गजराबाईला आलेली मूर्च्छा, डॉक्टरांनीं तिच्या प्रकृतीसंबंधीं व्यक्त केलेली भीति व त्यानंतरही अन्न न घेण्याचा तिचा कायम असलेला हेका, या गोष्टींमुळें गेल्या सतत दोन महिन्यांमागें यत्किंचितही न ढळलेला तिच्या निश्चयाचा पाया मातृप्रेमाच्या मोहानें, गेल्या एक दोन तासांमध्यें थोडाबहुत डळमळला होताच! तो गजराबाईला पुनः येत असलेली ग्लानी व त्यानंतर रघूदादानें आपल्या शोकाची केलेली बेमालूम बतावणी, या गोष्टींमुळें कायमचा ढांसळून गेला! रघूदादाचे वरील शब्द बोलून संपले न संपले, तोंच पुढें होऊन दुःखानें आक्रंदत आपल्या आईला तिनें घट्ट मिठी मारली!

"आई! आई, सांग! मी काय केल्यानें तुझं समाधान होईल! यापुढं यत्किंचितही तुझ्या आज्ञेबाहेर मी वागणार नाहीं! आतां तरी माझ्यावरील रुसवा सोडून दे! तूं सोडून गेलीस तर या जगांत मला दुसरा कोणता आधार राहिला?" भावनेच्या भरांत हे केविलवाणे शब्द जाईच्या तोंडून निघाले!

"अक्का! जाई काय म्हणते तें ऐक! कितीही झालं, तरी ती तुझ्या पोटची पोर! तिची तुझ्यावर माया नाहीं असं कसं होईल? ती यापुढं एक केंसभरही तुझ्या शब्दाबाहेर जाणार नाहीं! आणि तूं तरी काय तिचं अकल्याण थोडंच करणार आहेस!" रघूदादानें लगेच त्यावर आपली मल्लीनाथी केली!

थोड्या वेळानें गजराबाईनें आपले डोळे उघडले व अडखळणाऱ्या स्वरानें ती म्हणाली, "मी आतां तुमची थोड्या तासांचीच सोबतीण! पण मी सुखानें प्राण सोडावा असें तुम्हांला वाटत असेल, तर तेवढी एक गोष्ट करा! रामरावांना ताबडतोब इथं बोलावून आण व त्यांनीं तिला पदरांत घेतलेली मला पाहूं दे!"

"अक्का, जाई व मी तुझ्या इच्छेबाहेर नाहीं. हा पहा, रामरावांना बोलवायला मी आतांच्या आतां निघालों! पण आपल्या जिवाविषयीं मात्र असें कांहींतरी अमंगळ बोलूं नकोस! ईश्वरकृपेनें तूं यांतून बचावून आपल्या मुलीचं सुख पहायला पुष्कळ वर्षे जगशील!" घाईघाईनें आपले कपडे चढवीत रघूदादानें ही वाक्यें कशींबशीं उच्चारलीं व आपलें बिऱ्हाड सोडलें!

दुर्दैवी जाई! रघूदादानें बाहेर पाऊल टाकतांच, त्या दीन गाईनें दुःखानें हंबरडा फोडला! थोड्या वेळानें केवढा दुर्धर प्रसंग आपल्यावर येणार आहे याची तिला नीट कल्पना होती व ती तिच्या हृदयाला शतशः विदीर्ण करीत होती! पण त्या प्रसंगाशीं झगडण्याचा मनाचा खंबीरपणा मात्र आतां तिच्यांत राहिला नव्हता!

अर्ध्या तासाच्या आंत रघूदादा रामरावांना घेऊन परत आला!

आजवर मनांत बाळगलेलीं जाईचीं आपल्या जीवितासंबंधींचीं पावित्र्याचीं व सौख्याचीं गोड स्वप्नें शेवटीं त्या दिवशीं लयाला गेलीं! वेश्यावृत्तीच्या पापकर्दमांत त्या निष्कलंक व निरागस कुमारिकेस त्या रात्रीं बळजबरीनें ढकलण्यांत आलें व अशा रीतीनें आपला नीच हेतू सिद्धीस गेल्याबद्दल गजराबाई व रघूदादा यांनीं श्रीनागेशास शतशः धन्यवाद दिले!

( ९ )

मनुष्य हा निसर्गतः आशावादी आहे व जाई या नियमाला अपवाद नव्हती !

" आपल्या जन्माचं मातेरं झालं ! आयुष्यासंबंधीं मनांत बाळगलेली आपली एक श्रेष्ठ आशा नष्ट झाली ! आतां यापुढं सुखाचा एक क्षणही आपल्याला लाभणार नसून दुःखामध्यें पिचत राहून मृत्यूची मार्गप्रतिक्षा करीत रहाण्यापलीकडे जीवितामध्यें दुसरा कोणताही मार्ग आपल्याला मोकळा नाहीं ! " अशा प्रकारच्या विचारांनीं कांहीं दिवसांमागे तिच्या मनांत कायमचें ठाणें दिल्यामुळें, तिचा सर्वकाळ शोकव्याकुळ स्थितींत जात असे, पण दुःखाचा पहिला भर ओसरल्यावर, आशेचा अंधुक प्रकाश तिला दूर दिसून येऊं लागला व तो अधिकाधिक स्पष्ट होत जाऊन शेवटीं तिला वाटूं लागलें, कीं एका दृष्टीनें आपण पतित ठरलें असलें, तरी तशा स्थितींतही सदाचाराची कांस न सोडतां, बऱ्याच अंशीं आपलें ध्येय गांठून, तदनुसार सुखप्राप्ति करून घेणें आपल्याला अशक्य नाहीं. मंगल वैवाहिक सुख आपल्या नशिबीं नाहीं, पण ज्या पुरुषास देह विकण्यास दैवानें आपल्याला भाग पाडलें आहे, त्याच्याच चरणीं आपलें मनही कायमचें वाहून, आजन्म त्याच्याशीं निष्ठापूर्वक पत्नीधर्मानें वागल्यास, लौकिक दृष्ट्या नसला तरी तत्त्वदृष्ट्या आपला श्रेष्ठ जीवितहेतू साध्य करून घेतल्याचें उच्च समाधान व सात्विक सुख हीं आपल्याला लाभतील !

थोड्या दिवसांनीं हे तिचे विचार इतके निश्चित झाले, कीं तत्काळ तदनुसार वागण्यास तिनें आरंभ केला. एखाद्या आदर्श कुलवधूप्रमाणें गोड, प्रेमळ व निष्ठायुक्त असें रामरावाशीं तिचें यापुढें वर्तन होऊं लागलें ! गजराबाई, रघूदादा व रामराव या सर्वांस त्यामुळें अपरिमित

आनंद होणें साहजिक आहे. पण अल्पसंतुष्टपणा स्वीकारून, आपल्या भावी आयुष्यासाठीं जाईनें आंखलेला हा सुखाचा गौणमार्ग सुद्धां तिला नीट चोखाळूं देण्याचा गजराबाईचा व रघूदादाचा विचार नव्हता !

रामरावांशीं होणाऱ्या तिच्या वर्तनांत नवीन घडून आलेलें हें महदंतर दिसून येतांच, इतक्या दिवसांचें तिच्या डोक्यांतल वेड जाऊन ती वळणावर आल्याचेंच तें चिन्ह, असें त्या दोघांनीं ठरवलें व वेश्याव्यवसायामध्यें तिचा प्रवेश करवून बरेच दिवस लोटले असतांही, त्यांतील मुख्य मख्खी जी द्रव्यशोषणकला, त्या कलेचे आजवर धूर्तपणानें त्यांनीं लांबणीवर टाकलेले पाठ आतां यापुढें तिला द्यायला हरकत नाहीं, असें त्यांस वाटू लागलें !

गतकाळांतील आपले उच्च मनोरथ व एकाएकीं ते भग्न होऊन झालेला दुःखाघात, हीं विसरून जाण्याचा व रामरावांवर निरपेक्ष प्रेम करून आशायुक्त अंतःकरणानें त्यांच्या सहवासापासून सुखी बनण्याचा जाई जों नुकताच प्रयत्न करते आहे, तोंच तिला गजराबाई व रघूदादा यांजकडून दुःखाच्या नवीन टोंचण्या द्यायला सुरवात झाली !

रघूदादा इतके दिवस स्वस्थ बसला नव्हता. हरएक युक्त्याप्रयुक्त्या लढवून व रामरावांच्या नोकरांचाकरांशीं संधान बांधून रामरावांकडून द्रव्य उकळण्याचा योग्य मार्ग कोणता याचा त्यानें नीट कयास लावला होता ! वृद्ध चुलत्याच्या व्यवहारचातुर्यामुळें व त्यानें इस्टेटीवर ठेवलेल्या कडक देखरेखीमुळें, त्याच्या हयातींत रामरावाच्या हातीं रोख रकमा येण्याचा कधींही संभव नाहीं; तरीपण, त्याच्या पत्नीच्या अंगावर सध्यां वीस पंचवीस हजारांचे दागिने असून ती बिचारी इतकी सालस व गरीब स्वभावाची आहे, कीं तोंडांतून ब्रही न काढतां, नवऱ्यानें इच्छा दाखवतांच ते सर्व उतरून द्यायला ती केव्हांही तयार होईल, एवढी खात्रीलायक बातमी त्यानें मिळविली होती.

हळुहळू रामरावांकडे लडिवाळ हट्ट धरून, हे दागिने एकामागून एक कसे मिळवावे याबद्दलचे अहोरात्र तिला गजराबाईकडून धडे मिळूं लागले व त्यांकडे तिचें दुर्लक्ष होत असल्याबद्दल दुःशब्दांचा माराही तिजवर सुरू झाला !

आपल्या आईच्या उपदेशाप्रमाणें वागून, रामरावांशीं असलेल्या आपल्या संबंधास प्रेमाच्या विक्रयाचें अमंगल स्वरूप द्यावें, ही कल्पना जाईला दुःसह झाली ! एकदां फसलेल्या गाळांत अधिक खोल जावयाचें नाहीं, असा तिनें आपल्या मनाचा निश्चय केला व बरेच दिवस दृढतापूर्वक तो पाळला, पण पुढें गजराबाईनें आपलें अखेरचें अस्त्र काढलें ! दर दिवशीं तिचें रुसणेंफुगणें, अश्रुमोचन, उपवास इ० पूर्वीचेच प्रकार पुनः सुरू झाले व जाईच्या हळव्या व साध्याभोळ्या मनावर त्यांचा व्हावयाचा तो परिणाम झालाच ! हळुहळू तिचा निश्चय विरघळूं लागला व शेवटीं आईच्या समाधानाखातर, रामरावांकडे आपली दागिन्यांची हौस व्यक्त करून, ते एकामागून एक त्यांजकडून मिळवण्यास तिनें सुरवात केली. लवकरच दर आठ पंधरा दिवसांनीं होणाऱ्या एका एका ठसठशीत दागिन्याच्या दर्शनानें गजराबाई व रघूदादा सौख्यसागरांत पोहूं लागलीं ! जाईला मात्र हा वाढता बहुमोल लाभ यत्किंचितही सुख देऊं शकला नाहीं ! उलट वेश्यावृत्तीच्या गर्तेत आपलें दुर्दैव आपल्याला अधिकाधिक चेपीत आहे व आपल्या आयुष्यांतील सदाशा अंशतःही पुऱ्या होऊं न देतां, आपल्या जातींतील इतर अनेक अभागिनींप्रमाणेंच त्यांतच आपल्याला तें जन्मभर गाडून टाकणार, अशा प्रकारची मनोदेवतेची जाचणी अहोरात्र तिला सुखाचा एक क्षणही लाभूं देईना !

अशा स्थितींत सहा महिने गेले ! या अवधींत पंधरा वीस हजारांचे

दागिने गजराबाईच्या हातीं आले ! पण तितक्यानें तिचें कसचें समाधान होतें ?

एक दिवस रघूदादानें अशी एक नवीन बातमी आणली, कीं आजपर्यंत मिळालेल्या सर्व दागिन्यांहून अधिक मौल्यवान् असा एक दागिना अजून रामरावांच्या बायकोच्या अंगावर आहे ! हा दागिना म्हणजे, रामरावांच्या वडिलांनीं आपल्या हयातींत आपल्या आवडत्या सुनेला दिलेली एक भारी किमतीची गळसरी असून त्यांत तिचें मंगळसूत्र गुंफलेलें आहे, त्याचप्रमाणें, तिचा प्रत्येक सर कांचेच्या पोतांऐवजीं उंची मोत्यांनीं भरलेला असल्यामुळें, अशा या दागिन्याची किंमत सात आठ हजारांपेक्षांही अधिक भरल्यावांचून राहाणार नाहीं !

हें ऐकतांच गजराबाईच्या तोंडास पाणी सुटलें ! दुसऱ्या दिवसापासून रामरावांकडे त्या गळसरीबद्दल हट्ट धरण्याबद्दल तिचें जाईमागें टुमणें सुरू झालें. जाईनें प्रथम तसें करण्याचें साफ नाकारलें ! आपलें मंगळसूत्र गरती स्त्रिया किती जिवापलीकडे जतन करतात व तें हिरावून घेतल्यास कोणाही कुलस्त्रीस किती दुःख होईल, याची तिला नीट कल्पना होती. अर्थात्, एखाद्या स्त्रीच्या मनोभावना इतक्या अघोर रीतीनें दुखवण्यास कारण होण्याइतकी ती पाषाणहृदयी खास नव्हती ! तिनें आजपर्यंत कधींहि दाखवला नव्हता एवढा निग्रह सतत एक दोन आठवडे आपल्या आईची ही इच्छा धुडकावून लावण्याच्या बाबतींत दाखवला, पण गजराबाईनें तिला वठणीवर आणण्यासाठीं आत्मघाताचें बुजगावणें पूर्वींहून किती तरी पटीनें अधिक अशा भेसूर रीतीनें तिच्यापुढें उभें करतांच, मातृप्रेमामुळें उत्पन्न झालेल्या मनोदौर्बल्यानें पुनः तिला फशीं पाडलें !

तीन चार दिवसांच्या अन्नत्यागानतर गजराबाईला पूर्वींप्रमाणेंच आलेली मूर्च्छा, ती पाहून रघुदादानें पुनः एकदां शोकविव्हल होऊन

केलेला आकांत, पूर्वीच्याच डॉक्टरनें काळजीपूर्वक तपासणीनंतर दिलेला अत्यंत चिंताजनक असा अभिप्राय इ० सर्व गोष्टींची पुनरावृत्ती होतांच, रघुदादाच्या सांगण्यावरून, मृत्यूच्या दारांतून तिला ओढून काढण्याचा एकच यशस्वी उपाय म्हणून यापुढें कधींही तिच्या आज्ञेबाहेर वर्तन करणार नाहीं, असें श्रीनागेशाच्या शपथेवर वचन देऊन, जाईनें शेवटीं तिला अन्नग्रहण करायला लावलें !

( १० )

रात्रीं नवाच्या सुमारास जाई आपल्या खोलींत एकटीच बसलेली असून, तिच्या डोळयांतून अविरत अश्रुपात चालला होता ! कांहीं वेळापूर्वी कोणतें तरी अत्यंत गर्ह्य कृत्य तिच्याकडून झालें असावें व आतां अनुतापदाह तिच्या अंतःकरणाला व्यथित करीत असावा, हें तिच्या मुद्रेवरून ताडणें कोणालाही कठीण गेलें नसतें !

अर्ध्या तासापूर्वी दररोजच्या परिपाठाप्रमाणें रामराव जाईला भेटायला आल्यावर, त्यांच्याजवळ मोत्यांच्या गळसरीची गोष्ट काढून ती आजच्या आज ताबडतोब मिळाली पाहिजे असा तिनें हट्ट धरला ! यापूर्वी तिनें त्यांच्याकडून अनेक दागिने मिळवले होते, पण त्यांची मागणी करतांना आजच्या सारखा बेगुमानपणा व दुराग्रह तिनें कधींही दाखवला नव्हता ! आजपर्यंत आपणांशीं अत्यंत सालस व सुजाण वर्तणूक ठेवलेल्या जाईमध्यें एका दिवसांत असा फरक घडून यावा, याबद्दल रामरावांना सखेदाश्चर्य वाटलें ! आपल्या पत्नीला सदहू दागिना—तिचें तें एक सौभाग्यचिन्ह व प्रेमळ सासऱ्याचें स्मृतिचिन्ह—या दुहेरी कारणामुळें किती जीव कीं प्राण वाटतो, आजपर्यंत आपल्या गळ्यांतून तिनें तो एक क्षणभरही कसा दूर केलेला नाहीं, व सध्यां ती आजारानें कशी मृत्युशय्येवर पडून आहे, या गोष्टी समजावून सांगून त्या दुराग्रहा-

पासून तिला परावृत्त करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, पण त्याचा कांहींच उपयोग होईना! अंगांत वारें भरल्याप्रमाणें तिची आजची एकदर वर्तणूक होत होती!

शेवटीं दागिना मिळवण्याचा प्रयत्न करतों व एका तासाच्या आंत परत येतों असें रामरावांनीं मोठ्या कष्टानें तिच्याशीं कबूल केलें व ते आपल्या बंगल्यावर निघून गेले.

आपल्या पत्नीचें आवडतें सौभाग्यचिन्ह हिरावून घेतल्यास, त्यामुळें तिच्या हृदयावर केवढा आघात होईल व अनर्थ घडेल, याची त्यांना कल्पना नव्हती असें नाहीं. पण जाईच्या सौंदर्यानें गेल्या सहा महिन्यांत त्यांना इतकें भारून टाकलें होतें, कीं तिच्या सहवासांत कांहीं तास घालविल्यावांचून एखादा दिवस सुना जाऊं देण्याऐवजीं, त्यांनीं कोणतेंही घोर कृत्य करण्यास मागेंपुढें पाहिलें नसतें!

"कालच्या प्रसंगानें आपल्या दुःस्थितीची परिसीमा झाली आहे! आपल्या आयुष्याला एक प्रकारचें शुद्ध वळण लावण्याची आपली आकांक्षा आजवर सफळ झाली नाहीं, पण यापुढें तर ती आशा कायमचीच सोडून देणें भाग आहे! आपल्याला आतां स्वतंत्र विचारशक्ति, आयुष्यांतील सुखासंबंधींच्या स्वतःच्या अशा आवडीनिवडी, हीं कांहींच राहिलेलीं नाहींत! यापुढें आपली आई व मामा यांचें, त्यांच्या दुष्ट वासना तृप्त करून घेण्याचें आपण एक जीवन्मृत असें साधन बनून रहाणार! मग त्यांना तरी या साधनाचा पूर्ण उपयोग करून घेऊन आपण कां सुखी होऊं देऊं नये?" अशा प्रकारच्या हताश विचारांनीं कावून जाऊन, मनाला आलेल्या वैतागाच्या व क्षुब्धतेच्या भरांत जाईनें आज रामरावांशीं अत्यंत भावनाशून्य व कठोर वर्तन केलें होतें! पण ते निघून गेल्यानंतर, सहा महिन्यांमागील आपल्या शुद्ध व कोमल मनोवृत्ती व त्यांना आज प्राप्त झालेलें हें भेसूर व अवनत

स्वरूप हीं दोन्ही चित्रें तिच्या डोळ्यांसमोर स्पष्टपणें उभीं राहिलीं आणि अनुताप व शोक यांनीं हृदय भरून येऊन तिच्या डोळ्यांतून घळघळां अश्रु वाहूं लागले !

( ११ )

रामराव घरीं आले व थेट आपल्या पत्नीच्या खोलीकडे जायला वळले.

आंत शिरतांना त्यांचे पाय अडखळले ! मन चरकलें ! तोंड काळें ठिक्कर पडलें ! स्वतःच्या हातून लवकरच घडणार असलेल्या भेसूर कृतीच्या कल्पनेनें त्यांना दरदरून घाम सुटला !

पण जाईच्या घरून निघतेवेळीं ज्या दुर्दम्य उन्मादावस्थेनें त्यांच्या दुबळ्या मनावर आपला पगडा बसवला होता, त्याच्यापासून मुक्त होणें, प्रवाहपतित काष्ठाप्रमाणें अधःपाताची सीमा गांठल्याखेरीज त्यांना आतां शक्य नव्हतें !

ते आलेले पाहतांच, त्यांच्या पत्नीचीशुश्रूषा करीत बसलेल्या नोकरमंडळीच्या खिन्न तोंडांवर एकाएकीं समाधानाची मुद्रा व्यक्त झाली ! बरेच दिवस रामरावांच्या भेटीसाठीं तळमळणाऱ्या सुशिलेस आज लाभलेल्या या संधीमुळें किती परमावधीचें सुख वाटेल याची त्यांना कल्पना होती ! या प्रसंगीं तिला पूर्णपणें मनमोकळेपणा वाटावा म्हणून तीं सारीं जणें तेथून दुसरीकडे निघून गेलीं.

रामरावांना पाहातांच दीर्घकालीन आजारामुळें निस्तेज बनलेल्या त्यांच्या पत्नीच्या डोळ्यांमध्यें लगेच आनंदाची छटा चमकली ! गाल खोल गेल्यामुळें त्यांवरील लपून गेलेल्या सुंदर खळ्या, तिचा चेहरा खुलल्यामुळें थोडावेळ पुनः दृश्यमान् झाल्या ! यत्किंचितही हालचाल करण्यास त्राण नसलेलें तिचें शरीर जणूंकाय विजेच्या झटक्यासरसें झद्दिशीं ते असलेल्या बाजूच्या कुशीवर वळलें !

" ईश्वराला माझी दया आल्यामुळ इकडे आज माझी आठवण झाली ! " तिच्या हृदयांत एकाच वेळीं दाटून आलेल्या निष्ठा, प्रेम व करुणा या तिन्ही भावनांनीं ओथंबलेले हे शब्द जड आवाजांत तिच्या तोंडून निघाले !

सुशिलेचे हे शब्द, रामरावांच्या मनाचा ताबा घेतलेल्या जाई-संबंधींच्या मोहाचें अभेद्य पटल भेदूनही त्यांच्या हृदयाला जाऊन भिडल्यावांचून राहिले नाहींत ! पण त्या शब्दांचा त्यांच्यावर झालेला परिणाम क्षणमात्रच टिकला !

तिच्या बिछान्यावर जाऊन बसून व हलकेच तिचे हात आपले हातीं घेऊन कृत्रिम प्रेमळपणानें ते तिला म्हणाले, " म्हणजे तुझी मला आठवण होत नाहीं असा का तुझा समज आहे ? अलीकडे काकांनीं पेढीवरच्या कामाची बहुतेक सर्व जबाबदारी माझ्यावरच टाकल्यामुळें मला फुरसत कशी ती मुळींच नसते, हें तुला माहित नाही का ? "

' 'हो, मला माहित आहे ! एकदां नित्याच्या व्यवहारांत दंग झालां, म्हणजे तुम्हां पुरुषांना इतर कोणत्याही गोष्टीचें कसें भान राहात नाहीं, हें मी जाणतें ! पण निदान एकदोन दिवसांनीं तरी वेळांतवेळ काढून मला भेटल्यावांचून राहूं नये गडे ! स्त्रियांच्या हृद-याची इकडे कल्पना असती तर एवढी साधी गोष्ट करणं इकडे जड गेलं नसतं !..........

" खरं सांगू का ? अलीकडे कित्येक महिने, माझ्यासंबंधींच्या इक-डच्या पूर्वीच्या वृत्तींत कितीतरी अंतर पडल्याचं स्पष्ट दिसून येत आहे ! दिवसांचे दिवस मला दर्शन घडत नाहीं ! कधीं गोड शब्द कानांवर पडत नाहीं ! मजकडून असा काय अपराध घडला आहे ? या गोष्टीमुळें माझ्या अंतःकरणाला अहोरात्र होणाऱ्या वेदनांची इकडे

जाणीव आहे का ? माझी एक गोष्ट सोडा ! मजकडून तीची चुकून आगळीक घडली असेल ! पण बाळ '—पहिले वहिलें मूल—त्याच्यासबंधांही एवढा निष्ठुरपणा कसा घडला ?........ ..."

आपल्या मृत तान्ह्या मुलाच्या आठवणानें सुशिलेचा गळा या वेळीं दाटून आला व तिच्या डोळ्यांतून टपटपा अश्रु गळूं लागले रामरावांनींही आपली अपराधी मुद्रा लपवण्यासाठी नीट बाजूं फिरवले !

किंचित थांबून स्फुदत ती पुढें म्हणाली " त्याचं हसतमुख, बाळसेदार अंग व गोरापान रंग अजून माझ्या डोळ्यांसमोरून हलत नाहीं ! जणुं नुसतं नक्षत्र ! तो झाला व लगेच मी अभागिनी आजारी पडून अंथरुणाला खिळले ! मला वाटलं होतं, इकडून बाळाचा काळजी वाहण होईल, पण जन्मापासून एकदांही त्याला कडेवर घेणं किंवा प्रेमानें पाहाणं झालं नाहीं ! आईबापाच्या काळजीशुश्रूषेला पारखे झालेल्या तान्ह्या मुलाची दुसरी काय अवस्था होणार ? त्या गोष्टी मोलाच्या नोकराचाकराकडून का नीट होतात ? बाळाची आबाळ झाली व दुष्ट काळानें माझं रत्न हिरावून नेलं ! मी अभागिनी इकडच्या प्रेमाला मुकल्यामुळं त्याचं फळ माझ्या तान्हुल्याला भोगावं लागलं ! हें खरं ना ? "

यानंतर सुशिलेला आपला शोकावेग आवरून धरवेना ! एकामागून एक हुंदके देत ती घळघळा अश्रुविमोचन करूं लागली !

तिची ही स्थिति पाहून रामरावांच्या मनास चरका बसला ! जो बेत पार पाडण्यासाठीं ते तेथें आले होते, तो तडीला न्यावा की नाहीं, या बाबतींत त्यांचें चित्त आंदोलन खाऊं लागलें ! तोंच बाहेरच्या घड्याळांत दहाचे ठोके वाजतांना त्यांना ऐकूं आले. शेवटचा

त्यांनीं निष्ठुरपणें सुशिलेच्या गळ्यांत हात घातला ! तिनें दुःखानें एक हृदयद्रावक किंकाळी फोडली ! दुसऱ्या क्षणीं गळसरी तिच्या गळ्यांतून तोडून घेऊन चुलते आंत येण्यापूर्वी मागच्या दारानें रामराव पसार झाले !

( १२ )

रामरावांचीं परिचित पावलें जाईला पुनः जिन्यावर ऐकूं येतांच झटदिशीं तिनें आपले अश्रु पुसून टाकले. लगेच रामराव आंत आले ! त्यांच्या हातांत भरदार मोत्यांचे अनेक सर गुंफलेला व मध्यें सोन्याचा सुंदर मंगलमणी असलेला तो बहुमोल अलंकार होता. तो पाहातांच जाईचें हृदय कांपूं लागलें ! वर नजर करून रामरावांकडे पाहाण्याचें तिला धैर्य होईना !

" राक्षसिणी ! "—

भरून आलेल्या कंठानें रामरावांनीं तिला उद्देशून उच्चारलेला हा शब्द तिच्या कानीं पडला ! खुषामतीच्या स्वरांत उच्चारलेल्या नेहमींच्या अनेक गोड नांवांऐवजीं त्यांनीं तिला आजच नवीन लावलेलें हें संबोधन व त्यांत भरलेला पराकाष्ठेचा तिरस्कार व निष्ठुरपणा हीं तिच्या कानाला तापलेल्या सळईप्रमाणें वाटलीं !

" माझ्या साध्वी पत्नीच्या गळ्यांतून बळजबरीनें तोडून आणलेला हा तिचा सौभाग्यालंकार घे व सुखी हो ! हा दागिना मिळवण्यासाठीं माझ्या हातून थोड्या वेळापूर्वी घडलेल्या कसाबकरणीमुळें तिच्या आयुष्याचा इतक्यांत शेवट झाला असावा ! हें ऐकून तुझ्या मांग हृदयाला खात्रीनें अधिक समाधान वाटेल ! "

इतकें बोलून रामरावांनीं हातांतली गळसरी जाईच्या अंगावर फेंकली व दुःखानें धाडकन् कोचावर आपलें अंग टाकून दिलें

एकदोन क्षण गेले असतील नसतील इतक्यांत जिन्यावर कोणाचा गलबला चाललेला त्यांच्या कानीं आला. "रावसाहेब! रावसाहेब!" अशा घाईघाईनें मारलेल्या हांका ऐकतांच रामरावांनीं आपल्या घरच्या नोकरांचा आवाज ओळखला व लगेच ते बाहेर आले! त्यांना पाहून चिंताक्रान्त मुद्रेनें बाहेर उभे असलेले दोघे नोकर उतावीळपणानें म्हणाले, "थोरल्या धनीसाहेबांनीं ताबडतोब आपल्याला घरीं येण्याबद्दल निरोप पाठवला आहे. वहिनीसाहेब बेशुद्ध होऊन पडल्या आहेत व त्यांची शेवटची घटका जवळ आली आहे असें डॉक्टर म्हणताहेत!"

हें ऐकतांच तोंडांतून एक अक्षरही न काढतां रघूदादाचें बिऱ्हाड सोडून नोकरांमागोमाग रामरावांनीं त्वरेनें चालायला सुरवात केली.

थोड्या वेळापूर्वी रामरामरावांनीं उच्चारलेले कठोर शब्द व आतां नोकरांनीं आणलेला हा निरोप या दोन्ही गोष्टींचा जाईच्या मनावर विलक्षण परिणाम झाला! अनेक शोकयुक्त विचारांची तिच्या मनांत खळबळ माजली! आपल्या खोलीपुढील गच्चीवरून रामराव जात असलेल्या दिशेकडे डोळ्यांतून टिपें गाळीत, शून्य दृष्टीनें पहात भ्रमिष्टाप्रमाणें ती उभी होती! अशा स्थितींत एक दोन मिनिटें गेल्यावर रामरावांमागोमाग स्वतःही जाण्याची एक प्रबळ इच्छा एकाएकीं तिच्या मनांत उत्पन्न झाली. कोणती तरी अदृश्य शक्ति त्या दिशेला तिला ओढीत असल्याचा तिला भास झाला! मोहिनीविद्येनें भारलेल्या माणसाप्रमाणें, तत्काळ आपलें घर सोडून झपाट्यानें त्यांच्या पाठोपाठ ती चालूं लागली. त्या दोघांमध्यें अंतर बरेंच होतें व तें शेवटपर्यंत कायम राहिलें; पण रामरावांनीं आपला बंगला गांठीपर्यंत ते तिच्यां दृष्टीआड झाले नाहींत.

जगांत कित्येकदां अशा कांहीं गोष्टी घडून येतात कीं त्यांची कार्य-कारणपरंपरा शोधून काढणें कठीण जातें! रामरावांमागोमाग जाण्याची इच्छा जाईच्या मनांत कां उत्पन्न झाली व तिचा काय परिणाम घडून येईल—या प्रश्नांचीं उत्तरें स्वतः जाईलाच देतां आलीं नसतीं!

रामरावांनीं जेथें प्रवेश केला होता त्या बंगल्याची खूण लक्षांत ठेऊन तो गांठतांच ती आंत शिरली. आंत जातांच बंगल्याच्या ज्या भागांत विशेष गडबड चालली होती तिकडे तिचे पाय आपोआप तिला नेऊं लागले! एका खोलीशीं पोंहोचतांच, तेथें बऱ्याच माणसांची गर्दी झालेली तिला दिसून आली. बावरून जाऊन ती बाहेरच एका कोपऱ्यांत उभी राहिली. बराच वेळ आंत डॉक्टर रामरावांच्या पत्नीला निरनिराळे उपचार करून पहाण्यांत दंग असून, त्यांना लागणाऱ्या वस्तु आणून देण्यांत कित्येक नोकरांची आंत बाहेर धांवपळ चाललेली तिला दिसून आली.

थोड्या वेळानें डॉक्टरनीं आपले उपचार बंद केले व ते जायला निघाले. जातां जातां ते खोलींत उभ्या असलेल्या रामरावांच्या चुलत्यांना उद्देशून म्हणाले, "एकाएकीं मनावर झालेला कोणतातरी जबरदस्त आघात—हेंच माझ्या मतें तिची प्रकृति एकाएकीं इतकी विकोपाला जाण्याचें कारण असावें. कसेंही असो. ईश्वराच्या मनांत तुमचा व तिचा ऋणानुबंध इथंच संपावा असं असल्याचं दिसतं! आणखी एक दोन तास एवढंच तिचं आतां आयुष्य! मधूनमधून असंच भ्रमिष्ट स्थितींत शेवटपर्यंत तिचं बरळणं चालेल! तुम्ही आतां पुढील व्यवस्थेला लागलेलं बरं?"

हें ऐकतांच रामरावांच्या चुलत्यांनीं दुःखाचा एक लांब सुस्कारा टाकला व डॉक्टर गेल्यावर खोलींतल्या प्रत्येक नोकराला एक ना

दुसऱ्या तांतडीच्या कामासाठीं त्यांनीं बाहेर दवडलें व शेवटीं राहिलेल्या एकास तेथें बसून रहाण्यास सांगून ते स्वतःही तेथून निघून गेले. कांहीं वेळानें मागे राहिलेला तो नोकरही कांहीं कामानिमित्त बाहेर गेला.

खोलीबाहेर जाई अजून एका कोंपऱ्यांत उभी होती ! रामरावांच्या पत्नीच्या चाललेल्या बरळण्याचा आवाज मधून मधून तिच्या कानांवर येत होता ! इतक्यांत तिला कोणीतरी आपल्याला हांक मारीत असल्याचा भास झाला !

"जाई, जाई"—

कोणीतरी उच्चारीत असलेले हे शब्द स्पष्टपणें तिच्या कानावर येऊं लागले ! आवाज त्या खोलीच्याच दिशेनें ऐकूं येत होता. ती किंचित् जवळ गेली, तों तिला तीच हांक अधिक स्पष्टपणें ऐकूं येऊन, तो केवळ भास नसल्याची खात्री झाली !

आपल्याला कोण हांक मारीत असेल याचा, तिला तिच्या त्या वेळच्या आश्चर्यमूढ स्थितींत, कांहींच तर्क होईना ! रामरावांशिवाय इथ आपल्याला ओळखणारं दुसरं कोण आहे ? कदाचित् ही हांक त्यांचीच नसेलना ? असा विचार मनांत येतां क्षणींच ती झटदिशीं खोलीचें दार ओलांडून आंत गेली ! पण तेथें तिला, खोलीच्या एका टोंकाला खाटेवर झोंपलेल्या एका आजारी स्त्रीशिवाय दुसरें कोणीही दिसेना. पुनः तिला तीच हांक ऐकूं आली !

"जाई ! जाई !"—आतांमात्र तिची खात्री झाली कीं त्या आजारी स्त्रीच्या तोंडूनच ते शब्द येत आहेत ! तिचें आश्चर्य द्विगुणित झालें ! "ती मलाच उद्देशून हांक मारीत असेल काय ? कीं माझ्याच नांवाच्या

आपल्या ओळखीच्या दुसऱ्या कोणा स्त्रीची ती आठवण काढीत असेल?" असा विचार तिच्या मनांत येऊन उत्कंठितपणें पुढील शब्दांची ती वाट पहात राहिली!

पांच दहा मिनिटें रामरावांची पत्नी मधून मधून त्याच हांकेशिवाय दुसरा कोणताही शब्द उच्चारीत नव्हती! पण त्यानंतर, अडखळणाऱ्या शब्दांनीं ती कांहीं बोलूं लागली! जाईनें लक्षपूर्वक ऐकण्यास सुरवात केली! त्यांतील प्रत्येक शब्द तिच्या काळजाला घरें पाडूं लागला!

"जाई जाई! किती वर्षांनीं ग भेटतेस?......

इतका काळ कुठं होतीस? ......

तुझं मला कधींही विस्मरण झालं नाहीं हो!.......

तूं इतक्या मायाळूपणानें पुसतेस!...... पण काय सांगूं...... माझ्या दुर्दैवाची कर्मकथा!......

मामंजी वारले!.........बेळगांवचं घर सोडलं.........इकडे आलों!......

ईश्वर जाणे!......माझं कोणतं पूर्व जन्मींचं पातक......... तिकडचं प्रेम उडालं!.......माझं सोन्यासारखं बाळ!......त्याची आबाळ झाली!......मला सोडून गेलं!......

तिकडच्या हातून एक किती अमंगल......! तुझ्या अंगावर शहारे येतील!......गळसरी कीं ग गळ्यांतून तोडून नेली!!......

पण जाई! हें ग काय?...... तूं रडायला कां लागलीस?......

तुझा तो लहानपणांतील वेडेपणा अजून......पक्कं आठवतं!...... माईनीं मारल्यामुळें......नागेशीच्या तलावावर मी रडत बसलें होतें! ......तूंही रडायला लागलीस!......'तुझं दुःख पाहून मलाहि दुःख होतं!'......

तुझे ते शब्द कसे विसरेन ?......

तुझं कोमल मन अजून तसंच आहे......किती ग तूं प्रेमळ !"

शोकविव्हळ होऊन मधून मधून दुःखानें हुंदके देत येथवर बोलून झाल्यावर रामरावांच्या पत्नीचें बरळणें एकाएकीं बंद पडलें! आतां-पर्यंत तिची थोडीबहुत चाललेली हालचाल यानंतर कायमची थांबली ! मोठ्या कष्टानें होत असल्यामुळें एवढा वेळ ऐकूं येणारा तिचा श्वासोच्छ्वास आतां यत्किंचितही ऐकूं येईनासा झाला !

"जुई! जुई!" भरून आलेल्या कंठांतून अस्पष्टपणें उच्चारली गेलेली व आंतडीं पिळवटून निघालेली ही किंकाळी जाईच्या तोंडांतून आतां बाहेर पडली !

वेगानें धांवत जाऊन एका क्षणापूर्वीच प्राणोत्क्रमण झालेल्या आपल्या बालमैत्रिणीला तिनें घट्ट कवटाळलें व तिच्यावर आपला अश्रुधारांचा अभिषेक सुरू केला !

बऱ्याच वेळानें तिचा दुःखोद्रेक शब्दांच्या रूपानें व्यक्त होऊं लागला !

"जुई, गडे, तुझ्या संसारसुखाची राखरांगोळी करण्यास मींच चांडाळीण कारण झालें! तुझा प्राणप्रिय पति तुझ्यापासून दुरावण्याचं दुष्ट कृत्य मीच केलं ! पितृप्रेमाला पारख करून तुझ्या सुकुमार बालकाचा बळी मीच घेतला ! शेवटीं अखेरच्या जबरदस्त आघातानें तुझं हृदय दुभंग करून तुला मृत्यूच्या जबड्यांतही मीच लोटून दिलं !......

सांग, कोणतं प्रायश्चित्त भोगल्यानं या पापिणीच्या घोर अपराधाची तूं क्षमा करशील ! देहांत प्रायश्चित्त माझ्या पापाचं परिमार्जन करील काय ?......

तेवढं शासन माझ्याकडून घडलेल्या घोर कृतीला खात्रीनं पुरेसं नाहीं ! पण कोण जाणे, आणखी किती सुवासिनींच्या सौभाग्यसुखांत माझ्या-कडून यापुढं विष कालवलं जाईल ? माझ्या हतभागी आयुष्याचा आजच शेवट केल्यास, निदान तेवढा तरी अनर्थ टळेल ! "

इतकें बोलून जाईनें समोरच्या कोनाड्यांत असलेल्या औषधाच्या अनेक बाटल्यांपैकीं एक उचलली व घटघटां पिवून टाकली !

त्या बाटलीवर " विष–पोटांत न घेण्याचं औषध " अशीं अक्षरें स्पष्ट व ठळक अक्षरांत लिहिलेलीं होतीं !

जाईजुईचीं दोन उमलतीं फुलें दुष्ट काळानें कुस्करून टाकलीं ! !





# कटु कर्तव्य



शेंकडों वर्षांपूर्वीची गोष्ट ! अघनाशिनी नदीच्या डाव्या तीरावर वसलेल्या लोष्ठावली गांवांत त्या संध्याकाळीं आनंदाची लयलूट चालली होती ! मौर्य राजवटीच्या शीतल छायेखालीं गोमंतक प्रांताच्या धुरीणत्वाचा मान उपभोगलेल्या लोष्ठावली गांवानें आजवर अनेक आनंदोत्सव साजरे केले होते, पण त्यांतील एकालाही आजच्या प्रसंगाची सर आली नसती !

वेशीवरच्या महालक्ष्मी देवालयाला लागून असलेल्या नदीतीरा-वरील आंवळीच्या बनांत त्या दिवशीं सबंध लोष्ठावली गांव लोटलें होतें ! शेजारच्या तीन चार गांवांतून आलेल्या पाहुणे मंडळीचीही त्यांत भर पडली होती ! सर्वांच्या चेहऱ्यांवर, वाणीवर व डोळ्यांवर प्रत्यक्ष हर्षच थयथय नाचत होता !

लोष्ठावली गांवावर आलेलें एक घोर संकट ईश्वरकृपेनें आज निस्त-रलें होतें ! गांवकऱ्यांच्या प्राणांचा व वित्ताचा होणारा भयंकर नाश एका अकल्पित दैवघटनेनें टळला होता ! व याच प्रसंगीं शेजारच्या कर्दली गांवांतील लोकांशीं असलेलें दहा वर्षांचें त्यांचें हाडवैर नाहींसें होऊन, त्यांजबरोबर बंधुभावानें एकत्र आंवळभोजन करण्याचा गोड योगायोग त्यांस आज लाभला होता !

गोमंतकाच्या पलीकडे सह्याद्रीच्या पूर्वेच्या पायथ्याशीं त्या काळीं अर्धवट रानटी स्थितींतील अनार्य जातींची वस्ती होती. अनावर्षणामुळें

दर दहा बारा वर्षांत एकदोनदां तरी दुष्काळाची आपत्ति त्या लोकांना भोगावी लागे. असाच एक विशेष मोठा दुष्काळ यंदा त्या बाजूस पडल्यामुळें त्या भुकेकंगाल लोकांची एक भयंकर टोळधाड सह्याद्री ओलांडून लुटालूट करण्याच्या इराद्यानें गोमंतकच्या सुपीक प्रदेशांत शिरली होती ! एक दोन गांव लुटून व जाळून पोळून फस्त केल्यावर लोष्टावलीवर त्यांची धाड आतां येत होती ! त्यांच्या क्रूरपणाच्या व त्यांनीं यापूर्वी केलेल्या प्राणहानीच्या अंगावर शहारे आणणाऱ्या बातम्या लोष्टावलीला आधींच येऊन पोंचल्या होत्या व सगळे गांव-करी चिंतातुर होऊन गेले होते ! त्या काळच्या परिस्थितीप्रमाणें असें कांहीं आकस्मिक संकट आल्यास स्वसंरक्षणासाठीं राजावर अवलंबून न राहातां शत्रूंना तोंड देऊन स्वतःच आपापल्या गांवाचा बचाव करून घ्यावा लागे व त्याप्रमाणें लोष्टावलींतील लोकांनीं शेजारच्या एकदोन गांवांच्या मदतीनें या लुटारूंविरुद्ध स्वसंरक्षणाची शक्य तेवढी तयारी केली असली, तरी ती त्या कणखर रानटी लोकांच्या एवढ्या मोठ्या संख्येपुढें टिकाव धरण्यास पुरेशी नव्हती. लोष्टावली-पासून सात आठ कोसांच्या अंतरावर लुटारू येऊन पोंहोंचल्यामुळें अधिक तयारी करण्यास गांवकऱ्यांस सवडही नव्हती. याप्रसंगीं फक्त शेजारच्या कर्दली गांवांतील लोकच त्यांना उत्कृष्ट मदत करण्यास समर्थ होते. ते लढाऊ पेशाबद्दल प्रख्यात असून त्यांच्या गांवांत उत्कृष्ट शस्त्रास्त्रांचाही भरपूर संग्रह होता. पण कर्दलीकरांशीं अनेक वर्षे कट्टया वैरभावानें वागल्यावर आतां त्यांच्या सहाय्याची याचना करणें लोष्टावलीकरांच्या मानी स्वभावास कसें रुचणार ! शिवाय दहा वर्षांपूर्वी लोष्टावलीकरांकडून कर्दलीकरांविरुद्ध अशी एक भयकर दुष्टपणाची गोष्ट घडली होती, कीं ती विसरून जाऊन त्यांस यावेळीं सहाय्य करण्याइतकी औदार्यबुद्धि कर्दलीकर दाखवतील, असें त्यांस

वाटेना! शेवटीं केलेल्या तयारीवरच अवलंबून राहून लुटारूंना प्रतिकार करण्याची शिकस्त करण्याचें त्यांनी ठरविलें!

लुटारूंचा गांवावर हल्ला येई तों वाट न पाहातां, ते गांवापासून दूर अंतरावर असतांनाच चढाई करून जाऊन त्यांच्याशीं दोन हात करावयाचे, म्हणजे पराभव झालाच, तर मागें राहिलेल्या गांवांतील लोकांना पळून जाऊन बायकामुलांचा व शक्य तितक्या मौल्यवान् मालमत्तेचा बचाव करतां येईल, असा विचार करून लोष्टावलींतील व शेजारच्या गांवांतील त्यांच्या मदतीसाठीं आलेले मिळून एकंदर चारशें पांचशें सशस्त्र लोक लुटारूंना वाटेंत गांठून त्यांच्याशीं सामना देण्यासाठीं निघाले!

लोष्टावलीपासून दोन तीन कोसांवर दोघांचीही गांठ पडली! गांवकऱ्यांपाशीं शस्त्रास्त्रें चांगलीं होतीं, पण लुटारूंची संख्या त्यांच्याहून बरीच मोठी असून दुष्काळानें कावून गेलेले ते बुभुक्षित व कणखर रानटी लोक जिवावर उदार होऊन लढत होते! कांहीं वेळानें गांवकरी मागें हटूं लागले! लुटारूंच्या झुंडीच्या झुंडी चोहोंबाजूंनीं येऊन त्यांच्यावर आदळूं लागल्या! लुटारूंना पळवून लावण्याऐवजीं त्यांनीं चालवलेल्या लांडगेतोडींतून स्वतःचा बचाव कसा करतां येईल, हें प्रत्येकजण पाहूं लागला! पण तें आतां शक्य नव्हतें. चोहोंबाजूनें त्यांना शत्रूंचा गराडा पडला व त्या क्रूर लोकांच्या तरवारीला एकंदर गांवकरी बळी पडण्याची वेळ येऊन ठेपली! आपले प्राण वांचण्याची यत्किंचितही आशा आतां त्यांना राहिली नाहीं! पण ईश्वरेच्छा निराळी होती!

याच अत्यंत आणीबाणीच्या वेळीं पलीकडच्या एका टेंकडीमागून तीनशें चारशें सशस्त्र लोक वेगानें खालीं उतरू लागले! लुटारूंवर हल्ला करण्याच्या रोंखानें ते जवळ येऊं लागतांच लोष्टावलीकरांना

त्यांची ओळख पटली व लुटारूंच्या तावडींतून आपण आतां खात्रीनें सुटूं अशी आशा त्यांच्या मनांत उद्भवली, व त्यांस अपरिमित आनंद झाला ! पण थोड्या वेळानें लज्जा व अनुताप यांनीं त्यांचीं तोंडें काळवंडून गेल्याशिवाय राहिलीं नाहींत ! त्यांच्या मदतीसाठीं धांवून आलेले हे लोक दुसरे तिसरे कोणी नसून त्यांचे अनेक वर्षांचे कट्टे शत्रु कर्दलीकरच होते ! परक्यांचा घाला येतांच आपसांतील दुही विसरून जाण्याचा शहाणपणा त्यांनीं या प्रसंगीं दाखवला होता !

एकाएकीं आलेल्या कर्दलीकरांच्या ताज्या दमाच्या जोराच्या हल्ल्यापुढें लुटारूंना टिकाव धरवला नाहीं. बराच वेळ ते आवेशानें लढत होते, पण शेवटीं त्यांच्यापैकीं बरेच लोक मारले जाऊन राहिलेल्यांना आपला जीव बचावण्याकरितां मागता पाय घ्यावा लागला ! कर्दलीकरांनीं व लोष्ठावलीकरांनीं बराच दूरवर त्यांचा पाठलाग करून त्यांना पिटाळून लावलें !

आपसांतील कलह विसरून अत्यंत बिकट प्रसंगीं आपल्या शेजाऱ्यांस आपण होऊन अमोलिक सहाय्य देण्यांत कर्दलीकरांनीं जो मनाचा थोरपणा व क्षमाशीलता दाखविली, त्याचा योग्य तो सुपरिणाम लोष्ठावलीकरांवर झाल्याशिवाय राहिला नाहीं. अनेक वर्षांचें त्यांचें वैर त्या दिवशीं कायमचें नाहींसें झालें ! रक्तानें न्हालेल्या स्थितींत स्नेहभावानें व आनंदातिशयानें त्यांनीं एकमेकांना आलिंगनें दिलीं !

हर्षोन्मादानें फुललेलीं शेंकडों हंसतमुखें आज लोष्ठावलीच्या आंवळवनांत दिसत होतीं, त्याचें कारण हेंच ! शत्रूंविरुद्ध मिळालेल्या यशाच्या व आपसांत घडून आलेल्या ऐक्याच्या स्मरणार्थ तेथें कर्दलीकरांबरोबर थाटाचें सहभोजन घडवून आणण्याचा लोष्ठावलीकरांनीं बेत केला होता ! या आनंदाच्या समारंभांत भाग घेण्यासाठीं शेजारच्या इतर गांवांतील लोकही आले होते !

दुपारीं आंवळभोजन सुरू झालें व संध्याकाळच्या सुमारास तें संपत आलें. ठिकठिकाणीं झाडांखालीं पसरलेल्या गवतविणीच्या बैठकांवर आतां हळुहळु मंडळी येऊन बसूं लागली. थोड्या वेळानें मध्यभागीं बसलेल्या तिघांचौघां इसमांनीं आपापल्या घुमटांवर मधून मधून प्रास्ताविक थापा देण्यास सुरवात करतांच, रांगणाऱ्या मुलांपासून तों वांकलेल्या वृद्धांपर्यंतच्या निरनिराळ्या वयाच्या स्त्रीपुरुष श्रोतृसमुदायाची त्यांच्याभोंवतीं गर्दी झाली व सर्वांच्या चेहऱ्यांवर क्षणोक्षणीं वाढती अधीरता व उत्सुकता दिसून येऊं लागली!

अखेरीस एकामागून एक अनेक गायकांकडून खड्या सुरांत गीतें म्हटलीं जाऊं लागलीं! घुमटांचा नाद त्यांस साथ करूं लागला! व या संगीताशीं श्रोत्यांचीं उचंबळून आलेलीं हृदयें समरस झालीं! सबंध आंवळवन घुमूं लागलें! व श्रोतृसमुदाय डोलूं लागला!

रात्र पडली! गर्द झाडांच्या जाळ्यांतून कसाबसा मार्ग काढीत पौर्णिमेची चंद्रिका आपल्या सुधास्पर्शानें गांवकऱ्यांना त्यांच्या तन्मयावस्थेंतून भानावर आणण्याचा प्रयत्न करूं लागली! शेवटीं त्या निष्फळ प्रयत्नापासून तिला परावृत्त करून, तिचा वल्लभ तिच्यासह पश्चिम क्षितिजाकडे वळला!

देवदेवतांच्या, पूर्वजांच्या, देवचारसमंधांच्या, पाळींव व वन्य पशुपक्ष्यांच्या व वृक्षवेलींच्या, पिढ्यानुपिढ्या गायकांच्या वाणीवर कायमचें स्थान मिळवलेल्या रोमहर्षक लोकगीतांनीं स्थळकाळाचीं अनेक कुंपणें ओलांडून, गांवकऱ्यांचीं चित्तें कितीतरी दूरच्या मोहक क्षेत्रांत नेऊन सोडलीं होतीं! तेथून तीं आतां परत फिरणें मुष्किल होतें!

मध्यरात्र उलटली! गायकांचे घसे बसले! घुमटकारांचे हात

थकले ! व शेवटीं एकसारखा दोनअडीच प्रहर चाललेला गीतध्वनी विराम पावला !

पण त्यामुळें श्रोत्यांच्या आनंदोत्साहाचा भंग झाला ! जिकडे तिकडे अस्वस्थता व्यक्त होऊं लागली ! गांवकऱ्यांचीं व त्यांच्या पाहुण्यांचीं मनें अतृप्त ठेवून आजच्या या महत्वाच्या समारंभाचा शेवट होतां कामा नये, अशी सर्वांकडून आग्रहाची मागणी होऊं लागली ! पण त्यांची ती इच्छा पुरी होण्याचीं चिन्हें दिसेनात ! गायनवादनपटु-मंडळीला अमर्याद थकवा आला होता ! थबकलेला गीतप्रवाह पुढें चालू करण्यास त्यांच्यापैकीं कोणीच पुढें येणें शक्य नव्हतें !

श्रोत्यांची निराशा झाली ! समारंभ बरखास्त करून परत गांवाकडे फिरण्याचा ते विचार करूं लागले, तोंच महालक्ष्मी देवालयांतील वृद्ध पुजारी पुढें सरसावला व गायकांच्या जागीं येऊन बसला !

जिकडे तिकडे आनंदाचे शब्द निघाले ! सर्वांचीं मनें व डोळे पुजाऱ्यावर स्थिर झाले ! पुजाऱ्याच्या गीतांत श्रोत्यांचीं मनें लुब्ध करण्याचें केवढें मोठें सामर्थ्य होतें, हें ते जाणत होते. आपल्या तरुणपणांत लोट्टावलींतील व आसमंतांतील अनेक गांवच्या लोकांच्या झुंडीच्या झुंडी त्यानें आपल्या गीतांनीं डुलवल्या होत्या.

अलीकडे मात्र ईश्वरभक्तीकडे विशेष लक्ष लागल्यामुळें जागराच्या समारंभांत भाग घेण्याचें त्यानें अजिबात वर्ज्य केलें होतें ! अर्थात् त्याचें आजचें गायन म्हणजे गांवकऱ्यांना एक अलभ्य लाभच होता ! इतक्या वर्षांनंतर स्वयंस्फूर्तीनें गीतसमारंभांत भाग घेण्यास पुढें आलेल्या पुजाऱ्याच्या तोंडून आतां कोणत्या कवनास सुरवात होते, याची सर्वजण आश्चर्यानें व उत्सुकतेनें वाट पाहूं लागले !

थोड्या वेळानें पुजाऱ्यानें श्रीजगदंबेचें त्याचें ठरींव नमन म्हटलें व नंतर एक जोत गाण्यास त्यानें आरंभ केला ! पुजाऱ्याची साथ करण्याचा दुर्मिळ मान मिळाल्याबद्दल आनंदून गेलेले घुमटकार मोठ्या उत्साहानें त्यास साथ करूं लागले !

" किरँण उदेलें ! कमँळ फुललें ! कमळांतलें म्होंवमुसक सुटलें ॥
हो कमळांतलें म्होंवमुसक सुटलें ॥
नशीब उदेलें ! अंतस्कँर्ण फुललें ! धा वर्साचें गुपीत फुटलें ॥
रावजि धा वर्साचें गुपीत फुटलें !" ॥ ध्रु० ॥

पुजाऱ्यानें या ध्रुपदानें आपल्या कवनास आरंभ केला ! त्याच्या तोंडून तें निघतांच नेहमींच्या प्रघाताप्रमाणें त्याच्या साथीदारांकडून तेंच कडवें दोनतीनदां घोळघोळून एकस्वरानें गायलें गेलें !

या एकाच कडव्यानें श्रोत्यांची उत्सुकता दसपट वाढली ! ही जोत पुजाऱ्याकडून किंवा दुसऱ्या कोणाही गायकाकडून आजपर्यंत त्यांनीं कधींही ऐकली नव्हती ! त्यांची खात्री झाली कीं, खास आजच्या समारंभासाठीं पुजाऱ्याच्या तोंडून स्फूर्तीनें बाहेर पडणारें हें एक नवीन कवन असावें !

दहा वर्षाचें कोणतें गुपित तो आपल्या कवनांत उघड करणार आहे, हें जाणण्यासाठीं अधीर झालेल्या श्रोत्यांचीं मनें पुजाऱ्याकडून एकामागून एक म्हटल्या जाणाऱ्या कडव्यांमध्यें रंगून गेलीं !

अत्यंत आश्चर्याची गोष्ट ही कीं, आपल्या कवनांतून त्यानें सांगायला सुरवात केलेल्या गोष्टीचा संबंध लोष्टावली गांवाशीं व आज घडून आलेल्या महत्वाच्या प्रसंगाशींच होता !

" तीन बाजूंनीं आंब्याफणसांच्या व नारळीपोफळींच्या नयनरम्य वृक्षांनीं ज्यावर छत्र धरलें आहे व चौथ्या बाजूस अहोरात्र ज्यास

अघनाशिनी नदी बिलगून राहिली आहे, तो पलीकडचा प्रभूंचा सुंदर प्रासाद—आपल्या लोष्टावलीचें अनेक शतकांचें भूषण—तुम्ही पाहात आहांना?'' लोष्टावलीचें पुढारीपण पिढ्यानुपिढ्या ज्यांच्याकडे चालत आलें होतें, त्या प्रभु घराण्याच्या, गांवाच्या मध्यभागीं नदी-तीराला अगदीं लागून असलेल्या भव्य प्रासादाकडे बोट दाखवून पहिल्या दोन कडव्यांतून पुजाऱ्यानें श्रोत्यांस हा प्रश्न केला व नंतर त्याच्या कवनाचा ओघ एकसारखा चालू झाला ! व त्यांतून आपली गोष्ट कथन करण्यास त्यानें सुरवात केली—

* * *

—अशा या प्रासादाच्या नदीच्या बाजूच्या एका महालांत दहा वर्षांमागें एक दिवस सूर्यास्ताच्या वेळीं, यौवनपुष्पांनीं बहरलेली ही कोण सौंदर्यलतिका खिडकीशीं बसली होती ? आणि तिच्या वदना-वरील पावित्र्याच्या व सौंदर्याच्या संगमाचें तें कमनीय तेज दुःखाच्या व चिंतेच्या छायेनें असें कां झांकळलेलें दिसावें ? खालीं भिंतीवर आटपणाऱ्या नदीच्या लाटांकडे पाहात ती दीर्घनिश्वास कां सोडीत होती ? हे पहा ! कांहीं वेळानें तिच्या डोळ्यांतून टप्‌टप् अश्रूही गळूं लागले !

दररोज सकाळीं देवदर्शनाच्या वेळीं मुकुंदरायांच्या प्रासादांतून निघून वेशीबाहेरील देवालयाकडे चाललेल्या सुंदर मेण्याच्या झालरी-मागें विलसतांना दिसणारा व मार्गांत भेटणाऱ्या लोष्टावलींतील प्रत्येक आबालवृद्ध स्त्रीपुरुषाच्या हृदयांत आदरयुक्त आनंदाच्या लहरी उत्पन्न करणारा तो इंदिरादेवीचा मुखचंद्रमा कोणाच्या परिचयाचा नव्हता ?

क्षितिजाकडे वेगानें धांव घेणारें आरक्त सूर्यबिंब शेवटीं नदीपली-कडील डोंगरांच्या ओळीआड दिसेनासें झालें ! रजनी आपला काळा बुरखा हळुहळु सर्व चराचरावर ओढूं लागली ! महालांत पूर्ण अंधार पसरून तेथील एकही वस्तु स्पष्ट दिसेनाशी झाली. इतक्यांत एक

दासी आंत येऊन महालांतील समया पेटवून निघून गेली. पण इंदिरादेवीला त्याचें भानही नव्हतें! ती अजून दुःखव्याकुल चित्तानें पाण्याकडे दृष्टि लावून बसली होती!

कोण जाणें, ती अशाच स्थितींत आणखी किती वेळ राहिली असती! पण एकाएकीं मागून तिच्या खांद्याला झालेल्या एका परिचित हस्तस्पर्शानें दुःखतंद्रींतून तिला जागें केले!

तिनें मागें वळून पाहिलें व अधोवदन होऊन ती उभी राहिली! सशस्त्र पोशाखांत तिचे पति मुकुंदराय तेथ उभे असलेले तिला दिसले!

थोडा वेळ दोघांपैकीं कोणीच बोलेना! पण इतका वेळ मधून मधून गळणारे इंदिरादेवीच्या नेत्रांतील अश्रुबिंदु आतां अधिक जोरानें वाहूं लागलेले पाहून किंचित् पुढें सरकून प्रेमानें त्यांनीं तिला जवळ ओढिलें!

अत्यंत मृदुल पण निश्चयपूर्ण आवाजानें ते तिला म्हणाले, " अशा प्रसंगीं तुझी ही अनपेक्षित वृत्ति पाहून माझें मन विषण्ण झालें आहे! इतर सर्वसाधारण स्त्रियांपेक्षां तुझ्यांत कांहींतरी विशेष सुज्ञपणा आहे, अशी माझी समजूत होती, पण ती आज खोटी ठरली! आपल्या गोड शब्दांनीं माझा उत्साह द्विगुणित करण्याऐवजीं, तुझा हा अबोला, दुःखी चेहरा व अश्रूंचा ओघ त्याचा विरस करीत आहे, हें माझें केवढें दुर्दैव! मानहानीपेक्षां मृत्यु बरा! ही आपल्या शहाण्या वाडवडिलांची शिकवण बाजूला ठेवून कर्दलीपक्षाचें राजदरबारांत होत असलेलें वर्चस्व व त्यामुळें त्यांच्याकडून हरघडीं होणारा आमचा उपमर्द हीं मुकाट्यानें सहन करूं लागलों, तर अशा शेळपट पतीची तुला लाज नाहीं का वाटणार! आमच्या लोछावली गांवानें व आमच्या घराण्यानें संपादन केलेली कीर्ती या करंव्या मुकुंदरायानें गमावली, असा माझा झालेला बदलौकिक तुला आवडेल का?

सर्व गोमंतकांत प्रसिद्ध असलेल्या आमच्या प्रभु घराण्यांतील तुझ्या सारख्या स्त्रीला, आपल्या समाजाची व कुलाची इभ्रत व हित दृष्टीआड करून, आपल्या कट्टया शत्रूबद्दल माहेरच्या नात्यामुळें, मनांत एवढें प्रेम बाळगण्यास लावणारी ही स्वाभिमानशून्यता खात्रीनें शोभत नाहीं! मी आजच्या बेतापासून परावृत्त व्हावें, म्हणून सबंध दिवस तूं हट्ट धरून बसलेली आहेस, हा तुझा केवढा वेडेपणा? तुझें दुःख मला पाहवत नाहीं! पण तूं इतका दुराग्रह धरल्यावर तुझें समाधान तरी मी कसें करूं?" इतकें बोलून मुकुंदराय थांबले, व त्यांनीं आपली सांत्वनकारक सदय दृष्टी आपल्या पत्नीच्या शोकाकुल चेहऱ्याकडे लावली!

थोड्या वेळानें इंदिरादेवीचे पुनः पुनः स्फुरणारे ओंठ बोलण्याची तिची उत्कट इच्छा व्यक्त करूं लागले! पण तिच्या हृदयांत दाटून आलेल्या निरनिराळया तीव्र भावनांच्या ओघाला योग्य रीतीनें बाहेर वाव देण्यास तिची वाणी असमर्थ होती!

शेवटीं मोठ्या कष्टानें अडखळणाऱ्या करुण स्वरानें ती म्हणाली, "केवळ माहेरच्या आप्तांच्या प्रेमामुळेंच आजचा भयंकर बेत सोडून देण्याबद्दल मी आपली विनवणी करीत आहें का? स्वकुलाचा व स्वसमाजाचा अभिमान व त्यांच्या उत्कर्षाची इच्छा मला असूं नये, इतका का माझा स्वभाव हिणकस आहे! इतक्या वर्षांच्या सहवासानंतर माझ्या हृदयाची आपण हीच का पारख केलीत? क्रोधाच्या झपाट्यांत पतीनें पापमार्गाचा अवलंब केल्यास, त्यापासून त्यास परावृत्त करणें हें त्याच्या सहधर्मचारिणीचें श्रेष्ठ कर्तव्य नाहीं का? नाथ! आज हें केवढें घोर पापकृत्य आपल्या हातून घडणार आहे याचा विचार करा! मानापमानासारख्या क्षुल्लक कारणावरून आपल्याच रक्ताच्या शेंकडों भाईबंदांचा प्राणघात करण्यास आज आपण प्रवृत्त झालां आहां! ईश्वराच्या घरीं हें कृत्य कितपत न्याय्य ठरेल? अजून हा दुष्ट बेत सोडून

द्या ! निदान अधिक विचारासाठीं तो कालावधीवर लोटा ! मी पदर पसरून आपल्या चरणांशी प्रार्थना करतें, ती अव्हेरूं नका !" तिच्या रुद्ध कंठांतून यापुढें आणखी जास्त शब्द निघेनात ! शब्दांचें राहिलेलें कार्य करण्यासाठीं तिच्या अश्रुधारा जास्ती वेगानें तिच्या गालांवरून खालीं धांव घेऊं लागल्या !

पण समोर प्रत्यक्ष कारुण्यमूर्ती दिसत असतांही मुकुंदरायांचें मन अविचल राहिलें !

"प्रसंगीं भयंकर दिसणाऱ्या मार्गाचा अवलंब करूनसुद्धां राजकारणांतले डावपेंच सिद्धीस नेणें व्यवहारांत कसें अवश्य आहे, याची तुम्हां अप्रबुद्ध स्त्रियांना जाणीव असणें शक्य नाहीं ! एका महिन्यापूर्वी कदंलीपक्षानें राजदरबारांत केलेला आम्हां लोष्टावलीकरांचा उपमर्द आठवतांच अजून माझें रक्त गरम होतें ! बाईलबुद्धीनें वागून स्वपक्षाच्या कार्यात ऐनवेळीं माघार घेतली व त्याचा बिघाड केला, अशी माझी दुष्कीर्ती मी कालत्रयींही होऊं देणार नाहीं !" क्रोधानें आपले ओंठ चावीत मुकुंदराय इतकें बोलले व लगेच त्यांची दृष्टी व पाय मागें वळले ! महाल सोडून ते जाण्यासाठीं निघाले !

तोंच इंदिरादेवीच्या हृदयांतील तेजाचे स्फुलिंग एकाएकीं बाहेर उडाले ! तिच्या सौम्य व करुण मुद्रेनें निर्धार व धैर्ययुक्त स्वरूप धारण केलें ! झटकन् आपल्या डोळ्यांतले अश्रु पदरानें पुसून टाकून त्यांना उद्देशून दृढ व निश्चयी स्वरानें ती म्हणाली, "ऐका ! माझे हे शेवटचे शब्द ऐका ! श्रीजगदंबामातेचे पवित्र चरण स्मरून सांगतें, कीं हरप्रयत्नानें आपला दुष्ट व भयंकर बेत मी आज सिद्धीस जाऊं देणार नाहीं ! आतांच्या आतां कर्दलीस जासूद रवाना करून व त्यांच्यावर येणाऱ्या संकटाची सूचना देऊन त्यांना मी सावध करतें !

या कृत्याबद्दल आपल्याकडून प्राणदंडाची सुद्धां शिक्षा झाल्यास मी ती आनंदानें भोगीन! पण शेंकडों निरपराधी बांधवांच्या रक्तानें हात माखून घेऊन अनंत पापाचे धनी मी आपल्याला होऊं देणार नाहीं!"

इंदिरादेवीच्या या प्रत्येक शब्दांत जणूं विद्युत्शक्तीच संचरली होती! मुकुंदरायांच्या खंबीर मनांतही त्या शब्दांनीं थोडा वेळ कंप उत्पन्न केला! तिच्या या धिटाईच्या वागणुकीचें त्यांना अत्यंत आश्चर्य वाटत होतें, हें त्यांच्या मुद्रेवर स्पष्ट दिसून आलें! इंदिरादेवीला तिच्या सत्संकल्पांत प्रत्यक्ष जगदंबामातेचें सामर्थ्य लाभलें होतें, हें मुकुंदरायांना त्या वेळच्या त्यांच्या क्रोधांध स्थितींत कसें कळून येणार? थोडा वेळ स्तब्ध राहून नंतर क्रुद्ध व निष्ठुर स्वरांत ते उद्गारले, " तू हा अविचार करशील यांत शंका नाहीं! आजची गांवकऱ्यांची योजना सिद्धीस नेण्याचा माझा निश्चय, ती निष्फल करण्याच्या तुझ्या निश्चयाहूनही जास्ती बळकट आहे! व तो तडीला गेलेला तुला लवकरच कळेल!"

मुकुंदराय तत्क्षणीं महाल सोडून निघाले!

थोड्या वेळानें बाहेरून महालाच्या दाराला कुलूप लावलें गेलें! अरेरे! बिचाऱ्या इंदिरादेवीस सर्व रात्र महालाच्या आंत अडकून राहाण्याची शिक्षा झाली होती! आतां ती काय करणार होती! आपल्या पतीकडून त्या दिवशींचें पापकृत्य न होऊं देण्याचा आपला निर्धार पार पाडण्याचें कोणतें साधन त्या असहाय्य अबलेच्या हातीं होतें?

प्रासादाबाहेर येऊन मुकुंदराय मेण्यांत बसले. महालक्ष्मीच्या देवळाकडे जलदीनें मेणा घेऊन जाण्यास उग्र शब्दांनीं त्यांनीं भोयांस आज्ञा केली! लगेच घोड्याच्या गतीनें भोई धांवूं लागले! अंगांतून निघणाऱ्या घामाची सबंध वाटभर धार गळवीत अत्यल्प वेळांत त्यांनीं आपल्या धन्याचा मेणा देवळाच्या महाद्वाराशीं आणून उभा केला!

आपला पुढारी आलेला पाहतांच, गांवाच्या वेशीवरील निर्जन व एकांत स्थळीं असलेल्या त्या देवळांत जमलेल्या शेंसवाशें गांवकऱ्यांनीं त्यांचा योग्य सन्मान केला व त्यांच्या पुढील आज्ञेची मोठ्या उत्सुक-कतेनें ते वाट पाहूं लागले !

ठरल्यावेळीं सर्व गांवकरी जमा झाल्याबद्दल मुकुंदरायांनीं समाधान व्यक्त केलें व नंतर ते म्हणाले, "गड्यांनों, तुमच्या मनाचा थोडासा विरस करणें मला भाग आहे! पूर्वीच्या बेताप्रमाणें इतक्या लवकर आपल्या कामगिरीवर निघणें मला योग्य वाटत नाहीं ! आणखी एक-दोन तासांनीं येथून निघाल्यास मध्यरात्र उलटल्यानंतर आपण आपल्या इष्ट स्थळीं जाऊन पोहोंचूं ! आणि मध्यरात्रीशिवाय दुसरी कोणती वेळ आपली आजची योजना सोळा आणे पार पाडण्यास योग्य आहे ?"

मुकुंदरायांच्या शहाणपणासंबंधीं कोणाही गांवकऱ्याच्या मनांत कधीं किंतु येणें शक्य आहे का ? आपली अधीरता आवरून त्या सर्वांनीं त्यांच्या या सूचनेस होकार दिला !

ज्या पवित्र ठिकाणीं आल्यावर मनुष्याच्या हृदयांत केवळ उच्च, दैवी भावनाच उचंबळून येणें अवश्य आहे, त्या ठिकाणीं जमलेल्या त्या जनसमुदायाच्या मनांत त्यावेळीं किती आसुरी विचारांचें थैमान चाललें होतें ! ज्या आईजगदंबेच्या मंगलमूर्तीवर दृष्टी जातांच कोणाच्याही वाणीला तिच्या नामसंकीर्तनाशिवाय दुसरें कांहींही सुचूं नये, त्याच मूर्तीसमोर उभे असतांही, त्या अविचारांध गांवकऱ्यांच्या तोंडीं किती दुष्ट गोष्टींचा खल चालला होता ! ज्या ठिकाणच्या पवित्र वातावरणांत प्रत्यक्ष वैऱ्यासंबंधींही मनांत बंधुभाव उत्पन्न व्हावा, तेथेंच आपल्याच रक्तामांसाच्या आपल्या बांधवांचे गळे चिरण्याबद्दलची अधीरता क्षणो-क्षणीं त्यांच्या मनांत वाढत चालली होती !

ते दोन तास लगेच निघून गेले ! मुकुंदरायांनीं निघण्याची सूचना देतांच देवीपुढें नारळ फोडण्यांत आला व ज्या कामगिरीवर ते निघाले होते, तींत यश देण्याबद्दल सर्वांनीं तिला गाऱ्हाणें घातलें ! व नंतर आपापलीं शस्त्रास्त्रें व पोशाख नीट धारण करून गांवकऱ्यांचा जमाव हमरस्ता सोडून जरा दूरच्या आडवाटेनें कर्दलीच्या दिशेला चालूं लागला !

अमावास्येच्या घनदाट काळोखांत त्यांच्या मशालींच्या ज्वाळा वाऱ्यानें थयथय नाचत होत्या ! तें भीषण दृश्य ज्यांतून सर्व कोमल व सुष्ट भावना लोपून गेल्या आहेत व सूडाची एक राक्षसी वृत्तीच प्रज्वलित होऊन ज्यांत थैमान घालीत आहे, अशा त्यांच्या काळ्या-कुट्ट हृदयाचें जणूं काय एक हुबेहुब चित्रच होतें !

राजदरबारांत कर्दलीपक्षीयांकडून झालेल्या अपमानाचा सूड घेण्या-साठीं व त्यांचें वर्चस्व कायमचें नष्ट करण्यासाठीं कर्दली गांवावर रात्रींचा एकाएकीं छापा घालून सांपडतील तितक्या लोकांची सरसहा कत्तल करण्याचा अमानुष कट लोष्टावलींतील लोकांनीं केला होता; व तो कट पार पाडण्यासाठींच मुकुंदरायांच्या आधिपत्याखालीं ते आतां तिकडे चालले होते !

* * *

त्याचवेळीं इंदिरादेवी आपल्या महालांत काय करीत होती ? दाराला कुलूप लागल्यामुळें व महालाच्या खिडक्यांबाहेर बरीच खालीं खोल नदी वाहत असल्यामुळें, तिला बाहेर निघण्यास कोणताही मार्ग मोकळा नव्हता ! कोणा दासदासीकडून कर्दलीला निरोप पाठवण्याचें काम तडीस न्यावें, तर एरवीं इंदिरादेवीस क्षणभरही दृष्टीआड होऊं न देणाऱ्या तिच्या दासींना आज महालाच्या आसपाससुद्धां फिरक-ण्याची सोय नव्हती ! आपल्या सद्गुणी व दयाळु धनिनीवर त्यांचें

प्रेम नव्हतें का ? होतें ! पण आपल्या धन्याचा धाक त्यांस त्याहूनही जास्त होता ! आपल्या पतीकडून व गांवकऱ्यांकडून घडणारी घोर कृती न होऊं देण्याबद्दल आतां यत्किंचितही प्रयत्न करणें स्वतःला शक्य नाहीं, हें इंदिरादेवीस पक्कें कळून चुकलें होतें. दुःखानें अश्रु ढाळीत त्यांना या पापमार्गापासून बचावण्याबद्दल मनोभावें ईश्वराची प्रार्थना करण्यांत ती मग्न झाली होती !

तिचा बराच वेळ त्या स्थितींत गेला. इतक्यांत सोसाट्याचा वारा सुरू झाला. प्रासादाबाहेरील नारळीच्या व इतर झाडांचे शेंडे जोरानें एकमेकांवर आदळूं लागले ! कांहीं वेळानें महालाशेजारींच असलेल्या व नदीवर वांकलेल्या एका जुनाट आंब्याच्या झाडाची एक भली मोठी सुकलेली फांदी, त्या वादळीवाऱ्यानें मोडली व नदींत पडली. ती मोडतांना कडकड असा एवढा मोठा आवाज झाला, कीं पूर्णपणें आपल्या दुःखांत चूर होऊन गेलेली इंदिरादेवी सुद्धां त्यामुळें दचकली व क्षणभर तिचें चित्त तिकडे गेलें. तो एकच क्षण ! पण त्यानें केवढी मोठी कामगिरी बजावली !

रानांत गाढ अंधारामध्यें चांचपडणाऱ्या एखाद्या वाटसरूस विजेची एखादी चमक ज्याप्रमाणें वाट दाखवून देते, त्याप्रमाणें त्या एकाच क्षणानें प्राप्त संकटांतून पार पडण्याचा एक मार्ग अचानक तिला दाखवून दिला !

कर्दली गांवांत गेलेल्या तिच्या बाळपणांतील एका गोड प्रसंगाची एकाएकीं तिला आठवण झाली ! ती आठ नऊ वर्षांची असतांना, त्यांच्या घरामागें वाहाणाऱ्या नदीतील डोहांत त्यांच्या परसांतील वृक्षाची अशीच एक भक्कम फांदी मोडून पडून पुष्कळ दिवस पाण्यां-तच अडकून राहिली होती. त्या फांदीमुळें अर्धवट पोहायाला येणाऱ्या गांवांतील सर्व लहान मुलांना पाण्यांत डुंबत राहायला ती जागा फारच

सोईस्कर झाली होतीं. लोष्ठावलींतील गांवकऱ्यांच्या हातून ज्यांचा आज भयंकर शेवट होणार होता, त्यांपैकीं बरेच जण त्यावेळीं बाल्यावस्थेंत असून ते सारे व त्यांच्याबरोबर इंदिरादेवीचे दोघे भाऊ, परसामागें जमा होऊन तासचे तास पाण्यांत डुंबत आपल्या गाण्यांनीं व आरडाओरडीनें सगळें परसूं कसे दुमदुमून सोडीत, त्यांचे त्यावेळचे पाण्यांत चालणारे निरनिराळे मजेचे खेळ पाहून आपल्यालाही पोहायाला शिकवण्याबद्दल आपल्या प्रेमळ आजोबाशीं आपण कसा हट्ट धरला, व त्यांनीं शेवटीं नदीवर नेऊन लाडिकपणानें आपल्याला कसे पोहायला शिकवलें, या सर्व गोष्टींचा चित्रपट तिच्या डोळ्यांपुढें उभा राहिला व तत्क्षणीं 'मला पोहायाला येतें तर !' असा विचार तिच्या मनांत चमकला !

इंदिराबाईचें लग्न होऊन दहा पंधरा वर्षें लोटलीं होतीं ! इतक्या दीर्घ अवधींत पाण्यांत उतरण्याचा किंवा त्यासंबधींचा विचारसुद्धां कधीं मनांत न आल्यामुळें, स्वतःला पोहायाला येतें, ही गोष्ट तिच्या ध्यानींमनींही नव्हती ! पण अशा अकल्पित रीतीनें ती तिला आठवतांच एक धाडसी विचार तिच्या मनांत आला !

खिडकीजवळ जाऊन तिनें बाहेर नदींत वांकून पाहिलें. खालीं चौदा पंधरा हातांच्या अंतरावर पाणी वाहात होतें. तिचा निश्चय ठरला ! अश्रूंनीं डबडबलेल्या तिच्या चेहऱ्यांवर आनंदाचें तेज चमकूं लागलें ! लगेच तिनें आपलें वस्त्र सांवरलें. पदर खोंवला. खिडकींतून नदींत उडी टाकून, बंदीवासांतून सुटका करून घेण्यास ती तयार झाली !

बऱ्याच वर्षांपूर्वी असलेल्या पोहण्याच्या थोड्याशा अर्धवट सरावावर अवलंबून अशा रीतीचें धाडस करणें किती धोक्याचें आहे व त्यांत स्वतः प्राण्यास मुकण्याचा कसा संभव आहे, हें तिला माहीत नव्हतें का ? पण आपल्या पतीच्या हातून घडणाऱ्या अमानुष पाप-

कृत्यापुढें व कर्दळींतील शेंकडों निरपराधी जीवाच्या संहारापुढें इंदिरा-देवीच्या थोर मनाला स्वतःच्या प्राणांची क्षिति वाटली नाहीं! आपल्या प्राणांवर अशारीतीनें उदार होतांना, यत्किंचितही खेद किंवा भीती तिच्या मनाला शिवली नाहीं! नदींतून पोहून जाण्याच्या प्रयत्नास यश आल्यास तिच्याकडून एक श्रेष्ठ कर्तव्य बजावलें जाणार होतें! ह्या प्रयत्नांत प्राण गमावल्यास आपल्या पतीकडून घडणारी घोर कृती पाहाण्याचें तरी तिच्या नशिबीं येणार नव्हतें! दोन्ही दृष्टींनीं अशा तऱ्हेचें साहस करणें तिला श्रेयस्कर वाटलें व त्यांत यश देण्यासाठीं सद्गदित अंतःकरणानें ईश्वराची तिनें प्रार्थना केली!

थोड्या वेळानें महालाच्या बाहेर नदीचें पाणी जोरानें वर उसळलें व बराच मोठा आवाज झाला! सोसाट्याचा वारा अजून वहात होता. प्रासादांतील नोकरचाकर म्हणाले, “किती भयंकर वारा! झाडाची आणखी एक फांदी मोडून पडली!”

इंदिरादेवीनें बऱ्याच उंचीवरून घेतलेली उडी चुकीची पडल्यामुळें तिचें कानशील पाण्यावर जोरानें आपटून तिला कांहीं वेळ भोंवळ आल्यासारखें झालें. झटकन् प्रासादाच्या भिंतीकडे तिनें आपले दोन्ही हात नेले! सुदैवानें भिंतीच्या दगडांमधील एक खांच हाताला लागल्या-मुळें ती पकडून तिला बराच वेळ पाण्यावर स्वस्थ रहातां आलें. नंतर चांगली हुषारी येतांच तिनें पोहण्याचा प्रयत्न केला. शंभर दीडशें कदमांचें अंतर तिला पोहून जावयाचें होतें. चाळीस पन्नास कदम ती कशीबशी पोहून गेली. पण सराव नसल्यामुळें एवढयानें तिच्या शरी-रास इतके श्रम झाले कीं एक तसूभरहि पुढें जाण्याचें त्राण तिच्यांत राहिलें नाहीं! पुनः एकदां दैवानें तिला हात दिला! जवळच कांहीं वेळापूर्वीं मोडून पडलेली झाडाची फांदी पाण्यावर तरंगत होती. ती

हाताला लागतांच ती पकडून बराच वेळ तिनें विश्रांति घेतली. आणखी पन्नाससाठ कदमांपलीकडे जमीन होती. तितकें अंतर पोहून जाईन असा आत्मविश्वास तिला आतां वाटूं लागला. आपल्या साहसास यश येण्याचा रंग दिसूं लागतांच तिचें हृदय हर्षानें उचंबळून आलें! फांदीवरून हात काढून घेऊन तिनें पुनः जोरानें पोहण्यास सुरवात केली. पुनः एकदां तिचीं सर्व गात्रें श्रमानें गलित होऊन गेलीं. पण कशीबशी अखेरीस जमीन गांठल्याशिवाय ती राहिली नाहीं. तिच्या अंगावरील सर्व वस्त्रें चिंब भिजून गेलीं होतीं! तशांत वर्षाऋतूंतील गार सोसाट्याचा वारा अंगाला झोंबत असल्यामुळें तिला हुडहुडी भरली होती! पोहण्यामुळें झालेल्या अमर्याद श्रमांमुळें ती अजून धापा टाकीत होती! पण आपल्या शरीराकडे लक्ष देण्यास तिला अवसर नव्हता. ज्या महत्त्वाच्या गोष्टीसाठीं तिनें एवढें मोठें साहस केलें होतें, ती आतां यापुढें कोणत्या रीतीनें शेवटास न्यावी, या गूढ विचारांत ती दंग होऊन गेली! प्रासादांत जाऊन कोणाहि नोकराकडून तत्काळ कर्दलीला निरोप पाठवावा, असें एकवार तिच्या मनांत आलें. पण आपल्या आज्ञेला मान देऊन धन्याचा रोष सहन करण्यास कोणी नोकर कबूल होईल असें तिला वाटेना. उलट आपण केलेल्या साहसाची गोष्ट बाहेर फुटतांच आपल्या मार्गांत भलतेंच दुसरें एखादें विघ्न येईल, अशी तिला भीति वाटूं लागली. शेवटीं पूर्ण विचाराअंतीं तशीच स्वतः थेट कर्दलीला जाण्याचें तिनें ठरविलें. जवळच असलेला कर्दलीला गेलेला रस्ता तिच्या पूर्ण माहितीचा होता. सासरहून माहेरीं व माहेरहून सासरीं कैक वेळां ती मेण्यांतून त्या रस्त्यानें आली गेली होती. लगेच तो तिनें गांठला, आजूबाजूस पाहून आपणाला कोणी पाहिलें नसल्याची खात्री करून घेतली व कर्दलीच्या दिशेनें अतिशय वेगानें ती चालूं लागली!

# आजचें व कालचें गोमंतक

अमावास्येचा दाट काळोख सर्वत्र पसरला होता ! रस्त्यावर एखादें चिटपाखरूंहि दिसत नव्हतें. सभोंवार पसरलेली भयाण शांतता, मधुन मधून वाऱ्यानें एकमेकांवर जोरानें आपटणाऱ्या वृक्षांच्या व रात-किड्यांच्या आवाजानें अधिकच भीषण भासत होती ! सृष्टीचें हें भयानक स्वरूप पाहून कोणालाहि, विशेषतः दासदासीशिवाय केव्हांहि प्रासादाबाहेर न निघालेल्या इंदिरादेवीसारख्या एका घरंदाज व श्रीमंत घराण्यांतील स्त्रीला त्या निर्जन रस्त्यानें तशा वेळीं एकटें जाण्याचा खात्रीनें धीर झाला नसता ! तशांत इंदिरादेवी ही इतर स्त्रियांहून विशेष धीट किंवा निर्भय मनाची होती असें नाहीं. इतर सर्वसाधारण अबलांपैकींच ती एक होती. पण मुकुंदराय क्रोधाच्या आवेशांत एक अत्यंत घोर पापकृत्य करून आपल्या आयुष्याला जो कायमचा काळिमा लावून घेणार होते, तो लागूं न देणें, व शेंकडों निरपराधी लोकांचे प्राण वांचवणें, अशा तऱ्हेच्या आपल्या दुहेरी कर्तव्यांत असलेल्या तिच्या निस्सीम निष्ठेमुळें, त्यावेळेपुरतें तरी तिच्या मनास व देहास एक प्रचंड सामर्थ्य प्राप्त झालें होतें ! म्हणूनच त्यावेळच्या सृष्टीच्या भीषण स्वरूपामुळें यत्किंचित्‌हि भीति तिच्या मनास शिवली नाहीं ! लग्न झाल्यापासून एक कदमहि मेण्याशिवाय चालण्याचे श्रम ठाऊक नसलेल्या तिच्या नाजुक पायांत तर इतकें चापल्य व बळ आलें होतें कीं, तिच्याइतक्या वेगानें एखाद्या चपळ जासुदासहि चाल-वलें नसतें. लोष्ठावलीपासून कर्दलीपर्यंतचें तीन कोसांचें अंतर तिला तोडावयाचें होतें. अंधारांत वारंवार ठेंचाळल्यामुळें व दगडांवर आप-टल्यामुळें तिच्या पायांचे तळवे व बोटें रक्तबंबाळ झाली होतीं. पण त्याचें तिला कांहींच वाटलें नाहीं. शक्य तितक्या लवकर कर्दलीस जाऊन पोहोंचणें या एकाच विचारांत तिच्या मनाच्या व शरीराच्या सर्व शक्ती एकवटल्या होत्या ! एकसारखें दोन तास भराभर चालल्या-

वर कुत्र्यांच्या भोंकण्याचा अस्पष्ट आवाज दुरून मधून मधून तिच्या कानांवर येऊं लागला! गांव जवळ आला अशी आतां खात्री होऊन तिचा चेहरा हर्षानें प्रफुल्लित झाला! ती अधिक जोरानें चालूं लागली. आणखी अर्ध्या तासानें कर्दली गांवाच्या सीमेवर असलेलें पहिलें घर तिला लागलें. आंतलीं माणसें गाढ झोंपेत मग्न झालीं होतीं. बिचाऱ्यांना आणखी थोड्या वेळानें त्यांजवर येणार असलेल्या भयंकर आपत्तीची कल्पनाही नव्हती! दाराशीं जाऊन तें जोरानें ठोठावण्यास इंदिरादेवीनें सुरवात केली. ती अत्यंत अधीर झाली होती! 'कोण जाणे! गांवकऱ्यांस सावध होण्यास अत्यल्पही विलंब लागला, तर त्यामुळें कोणता अनर्थ घडून येईल!' या विचारानें प्रत्येक जाणारा क्षण तिच्या हृदयाला कंपित करीत होता! शेवटीं आंतील मंडळी जागी झाली. दिवा पेटवून ते बाहेर येण्यापूर्वीच इंदिरादेवीनें मोजक्या शब्दांनीं त्यांच्या गांवावर येणार असलेल्या संकटाची त्यांस जाणीव करून दिली! ती अकल्पित घोर वार्ता कानीं पडतांच ती सांगणाऱ्या व्यक्तीस पाहाण्याकरितां ते घाईघाईनें जों बाहेर येतात, तोंच इंदिरादेवी अमावास्येच्या दाट काळोखांत दिसेनाशी झाली! ती केव्हांच लोष्ठावलीच्या दिशेनें परत फिरली होती!

स्वतःच्याच नव्हे तर सबंध गांवांतील लोकांच्या प्राणांवर बेतल्यावर त्या घरांतील माणसांनीं, त्यांना अशा रीतीनें सावध करणाऱ्या व्यक्तीचा शोध करण्यांत वेळ न दवडतां, गांवकऱ्यांस ती गोष्ट कळवण्याकरितां धांवपळीस सुरवात करावी यांत नवल नाहीं!

पण इंदिरादेवी परत लोष्ठावली गांवाकडे चालूं लागली होती, हा तिचा वेडेपणा नव्हे काय? आज तिच्याकडून घडलेल्या या साहसामुळें मुकुंदरायांचा क्रोधाग्नि कसा भडकून जाईल, व तिला कालत्रयींही त्यांजकडून क्षमा होण्याची कशी आशा नाहीं, याची तिला जाणीव

नव्हती का ? आपल्या पतीच्या स्वभावाची तिला पूर्ण ओळख होती ! लोष्ठावलीस जाऊन स्वतःस दुःखांत लोटून घेण्याऐवजीं, समर्थ व समृद्ध स्थितींतील आपल्या माहेरचाच तिनें आश्रय घेतला असता, तर पतिसेवेव्यतिरिक्त इतर कोणत्याही सुखाची स्वतःला तेथें वाण पडणार नाहीं, हेंही तिला ठाऊक होतें ! पण पतिसेवेस मुकल्यास जगांतील इतर सर्व सुखांचा लाभही तिला सुखी करूं शकला नसता ! मुकुंदरायांकडून होणारी कितीही मोठी शिक्षा आनंदानें भोगीन, पण पतिगृहाचा त्याग करून आपल्या पत्नीधर्मास कदापि कलंक लावून घेणार नाहीं, असा तिच्या मनाचा दृढनिश्चय ठरल्यामुळेंच ती परत लोष्ठावलीकडे चालली होती !

* * *

मध्यरात्र उलटून गेली होती ! लोष्ठावलींतील गांवकरी कर्दली गांवच्या वेशीवर येऊन पोहोंचले होते. जिकडे तिकडे सामसूम असून त्यांच्या कल्पनेबाहेर शांतता गांवांत सर्वत्र पसरलेली त्यांस दिसून येत होती. आपला बेत आतां पूर्णपणें सिद्धीस जाईल, याबद्दल त्यांना तिळमात्रहि संशय नव्हता ! सर्वांच्या चेहऱ्यांवर एक प्रकारचा आसुरी आनंद दिसत असून, त्यांचे अधीर झालेले हात पुनः पुनः आपल्या शस्त्रांकडे जात होते. वेशीवर पोहोंचतांच आपल्या कचाट्यांतून कर्दलीं-तील शक्य तितके कमी लोक निसटून जाण्यासाठीं कोणकोणते उपाय योजावे, याचा त्यांनीं पुनः एकदां खल केला व मोठ्या सावधगिरीनें ते गांवांत शिरले. थोड्या वेळानें त्यांना कसलासा संशय येऊं लागला. रस्त्यावर नुकत्याच थोड्या वेळापूर्वी टाकून दिलेल्या अर्धवट जळा-लेल्या मशाली त्यांस दिसूं लागल्या. दार सताड उघडें असलेलें व आंत चिट पांखरूंहि नसलेलें असें एखादेंदुसरें घरहि त्यांना मधून-

मधून लागूं लागलें ! गांवांतील मुख्य वस्तीच्या भागीं येतांच त्यांचा संशय दृढ झाला. केवढी भयंकर निराशा ! कोणा तरी घरभेद्यानें त्यांचा कट बाहेर फोडला होता ! तो कोण हें त्यांना त्यावेळीं कळलें असतें, तर त्याचे राईराई एवढे तुकडे केल्याशिवाय ते राहिले नसते ! पण इतक्या गुप्त रीतीनें केलेल्या कटाची गोष्ट शत्रूला कोणी कळविली असावी याची त्यांना मुळींच कल्पना होईना ! कटाची बातमी लागतांच कर्देळींतील एकंदर लोक गांव सोडून अघनाशिनी नदीच्या पार झाले होते. तितक्या थोड्या अवकाशांत शत्रूच्या हल्ल्याचा प्रतिकार करण्याची तयारी करणें शक्य नसल्यामुळें त्यांनीं पळून जाऊन आपला बचाव केला होता. स्वसंरक्षणाची अधिक तयारी करून पुनः आपल्या गांवीं ते येणार असल्यामुळें आपली कसलीहि मालमत्ता त्यांनीं आपल्याबरोबर नेली नव्हती. पण त्यांच्या प्राणाहून दुसरी कोणतीहि वस्तु लोष्टावलीकरांनां नको होती व ती तर आतां मिळणें शक्य नसल्यामुळें माघारे आपल्या गांवाकडे वळण्यावांचून त्यांना गत्यंतर नव्हतें !

येतेवेळीं आडवाटेनें ते आले होते, पण तसें करण्याची आतां जरूर नसल्यामुळें, अधिक जवळच्या हमरस्त्यानें ते चालले होते. अत्यंत सावधगिरीनें रचलेला इतक्या महत्वाचा व्यूह अशा रीतीनें फुकट गेल्यामुळें सर्वांचींच मनें निराशेनें व खिन्नतेनें भरून गेलीं होतीं ! पण त्यांतल्या त्यांत आजच्या या अपेशाचा मुकुंदरायांवर असा कांहीं परिणाम झाला होता कीं, निराशेनें व संतापातिशयानें ते जवळ जवळ वेडेच बनले होते ! त्या वेळच्या त्यांच्या अशा या मनःस्थितींत त्यांच्याजवळ जाण्यास कोणीही धजेना ! आपल्या एकदोघां विशेष मर्जींतल्या सोबत्यांसह क्षुब्धतेच्या भरांत इतर गांवकऱ्यांस मागें टाकून ते वेगानें पुढें चालले होते !

मुकुंदराय व त्यांचे सोबती गांवच्या वेशीजवळ येऊन पोंचे तों तांबडें फुटलें! ज्या ठिकाणांहून चार पांच तासांपूर्वी सूड घेण्याचे निरनिराळे बेत करून ते निघाले होते, तें देऊळ दिसूं लागतांच, त्याचे चेहरे लज्जा व खेद यांनीं काळवंडून गेले! इतक्यांत रस्त्यावर कोणीतरी माणूस निश्चेष्ट स्थितींत पडलेलें पाहून ते थांबले! त्या वेळच्या अंधुक प्रकाशांत तें कोण असावें हें त्यांना ओळखतां येईना! शेवटीं थोड्या वेळापूर्वी मालवलेल्या मशालींपैकीं एक त्यांनीं पुनः पेटवली व तिच्या प्रकाशांत नीट निरखून पाहिलें! लगेच त्यांच्या अंगांवर शहारे आले! आश्चर्यानें त्यांच्या तोंडून शब्द निघेनात! डोक्याला जखम होऊन त्यांतून रक्ताचे ओघळ वहात असलेल्या व बेशुद्ध स्थितीत पडलेल्या त्या स्त्रीला ते ओळखल्यावांचून कसे राहतील!

अमर्याद श्रम झाल्यामुळें शरीरांत त्राण न राहून चालतां चालतां इंदिरादेवी रस्त्यांत घेरी येऊन पडली होती! एका दगडाला आपटून तिच्या डोक्याला एक भयंकर जखम झाली होती! तिला उचलून नजिकच्या देवळांत नेल्यावर व योग्य उपचार केल्यावर ती हळुहळू शुद्धीवर येऊं लागली!

* * * *

आपल्या गुप्त कटाची बातमी कोणाकडून फोडली गेली, हें आतां मुकुंदरायांस व त्यांच्या सोबत्यांस कळून आलें! प्रभुघराण्यास अशा रीतीनें तिनें लावलेल्या कलंकाची वाच्यता इतर गांवकऱ्यांमध्यें करणें मात्र मुकुंदरायांस व त्यांच्या सोबत्यांस इष्ट वाटलें नाहीं. मात्र तिचें आजन्म मुखावलोकनही करणार नाहीं, अशी मुकुंदरायांनीं प्रतिज्ञा केली!

पतिगृहास मुकल्यामुळें इंदिरादेवीस अर्थात् अपरंपार दुःख झालें. पण कर्तव्यपालनामुळें ओढवलेल्या या प्रसंगास देवावर हवाला ठेवून

शांत चित्तानें तोंड देण्याचा तिनें निश्चय केला. वेशीवरच्या महालक्ष्मीच्या देवळाच्या शेजारीं एक दीनदुबळा पुजारी व कांहीं सेवेकरी रहात असत. तेथेंच त्यांच्या शेजारीं एका झोपडीवजा लहानशा घरांत राहून ईश्वरसेवेंत ती आपलें आयुष्य घालवूं लागली.

इंदिरा देवीच्या माहेरच्या मंडळीनें तिनें माहेरीं येऊन सुखांत रहावें याबद्दल तिचें मन वळवण्याचे बरेच प्रयत्न केले, पण ते सफल झाले नाहींत!

इंदिरादेवी पूर्वी सबंध गांवाला सद्गुणांची पुतळी वाटे! गांवांतील प्रत्येक आबालवृद्ध स्त्रीपुरुष तिच्या दर्शनाला वचनाला भुकेलेला असे! पण त्याच इंदिरादेवीचा परित्यक्ता म्हणून आतां सर्वत्र तिरस्कार होऊं लागला! तिचें नांव आपल्या स्मृतिकक्षेपासून दूर करण्यांत गांवकरी समाधान मानूं लागले!

त्यानंतर एवढा काळ लोटला व आज हें महद्भाग्याचें गोड फळ आपल्याला लाभलें आहे! त्या फळाचा आस्वाद घेण्यांत आपण सर्वजण दंग झालों आहों, पण लक्षांत ठेवा! स्वतःच्या सुखावर तिलांजली देऊन एका आदर्श पत्नीनें, खऱ्याखुऱ्या गृहदेवतेनें, दहा वर्षांमागें रुजत घातलेलें कटु कर्तव्याचें बीज त्याच्या मुळाशीं आहे!

इतका दीर्घकाळ हें गुपित या म्हाताऱ्याच्या हृदयाला शल्यासारखें टोंचत राहिलें आहे! तें आजच्या या प्रसंगीं उघड केलें नाहीं, तर त्याच्यासारखा अधम दुसरा कोण?—

* * *

किरण उदेले! कमळ फुलले! कमळांतले म्होंवमुसक सुटले॥
हो, कमळांतले म्होंवमुसक सुटले॥
नशीब उदेलें! अंतस्करण फुललें! धा वर्सांचें गुपित फुटलें!
रावजि, धा वर्सांचें गुपित फुटलें॥ ध्रु०॥

पुजाऱ्याकडून व त्याच्या साथीदारांकडून ध्रुपदाचा हा अखेरचा घोष झाला व जोत संपली !

श्रोत्यांमध्यें खळबळ उडाली ! आश्चर्य, अनुताप, आनंद, खेद या भावना एकाच वेळीं गांवकऱ्यांच्या मुद्रेवर दिसूं लागल्या ! सर्वांची दृष्टि त्यांच्या नायकाकडे, मुकुंदरायाकडे, पुनः पुनः वळूं लागली ! मुकुंदरायांचे डोळे भरून आले होते ! व त्यांच्या तोंडांतून शब्द उमटत नव्हता !

* * *

थोड्या वेळानें वाद्यें वाजवीत विजयोत्साहपूर्वक गांवाकडे निघालेल्या लोट्ठावली, कर्दली व इतर गांवांतील शेंकडों लोकांच्या जमावापुढें इंदिरादेवीचा मेणा चालूं लागला !

* * *

गेल्या दहा वर्षांत एकदांही प्रकाशित न झालेला प्रभूंच्या प्रासादांतील नदीच्या बाजूचा महाल त्या दिवशीं रात्रीं अनेक दीपमालांनीं सुशोभित झाला होता ! आंत मुकुंदरायांच्या वक्षस्थलावर गळणारे इंदिरादेवीचे आनंदाश्रु त्यांच्या अनुतापदग्ध हृदयाला शांतवण्याचा प्रयत्न करीत होते ! दीर्घकाळानंतर या प्रेमळ जोडप्याचें प्रेमकूजन ऐकण्यास अधीर झालेल्या नदीच्या लाटांची महालाच्या भिंतीला बिलगून कानोसा घेण्यांत बाहेर अहमअहमिका चालली होती !*

---

* केळोसिकरांचा जामात तधीं ॥.........

घरीं येवोनी न्हाणियेपासिं ॥ म्हणे बोलतां नये मनुष्येंसी ॥

तुज चिंता सांगतों केलिसी ॥ आजि सोहिरे यांचे घातासि मांडलें ॥

....आइक नाइक सुचलें तिसी ॥ भ्रतार जेवुनी गेला समुदायासी ॥

....रात्री होतांच केली त्वरा ॥ सुचवोनि केळोसि माहेरा ॥

तत्काळ आली घरिच्या घरा ॥ कोणा न कळतां धिरें कार्य केलें ॥

—कोंकणाख्यान



# ताम्रपट

*"Every man born has the right to gain his sustenance from the land, just as every man has a right to the air and the sun, and that, therefore, no one who does not work the land has the right to regard the land as his own and to keep others from working it."*

("सूर्यप्रकाश व हवा यांचा उपभोग घेण्याइतकाच जमिनीच्या उत्पन्नावर आपली उपजीविका करणें, हा प्रत्येक मनुष्याचा जन्मसिद्ध हक्क आहे, आणि म्हणून

जमिनीच्या लागवडीसाठीं ज्यांकडून मेहनत घडत नाहीं, त्यांस तिजवर आपला हक्क मागण्याचा व इतरांस तिची लागवड करूं न देण्याचा अधिकार पोंचत नाहीं. '' )

टॉल्स्टॉय्—

अर्धा पाऊण तास झपाट्यानें चालल्यावर चढण संपली व मंगेशराव घांटीच्या ऐन माथ्यावर येऊन पोंचले. समोर उतरण सुरू झालेली दिसतांच त्यांना हायसें वाटलें! प्रहरभर दिवस वर आला होता; अर्थात् सूर्याचे किरण अजून कोंवळेच होते. पण दोनअडीच तासांच्या चालण्याच्या श्रमामुळें घामानें भिजून गेलेल्या त्यांच्या शरीराला ते कोंवळे किरणही तापदायक भासूं लागले, यांत नवल नाहीं! रस्त्याच्या बाजूला तांबड्यापिंवळ्या फळांच्या भारानें लवलेल्या हिरव्यागार काजींची रांग लागली होती. त्यांतील एका काजीच्या सावलींत बसून हातरुमालानें घाम पुशीत समोरील दरीकडे त्यांनीं आपली दृष्टि फेंकली. अलीकडच्या दाट झाडीमुळें व नारळीपोफळींच्या बागांमुळें दरीच्या मध्यभागीं वसलेलें गांव तेथून दिसत नव्हतें. नाहीं म्हटल्यास आकाशांत उंच गेलेला गांवांतील देवळाचा घुमट व त्याच्याहीपेक्षां उंच अशा दीपस्तंभाचा कांहीं भाग, हीं तेवढीं इतक्या दुरूनही दिसत व एखाद्या नवख्या इसमालाही तेथील गांवाच्या अस्तित्वाची कल्पना आणून देत! म्हणूनच तो घुमट व दीपस्तंभ दिसतांच मंगेशराव बऱ्याच समाधानपूर्वक स्वतःशींच पुटपुटले, "हेंच तें बाबासाहेब देशपांड्यांचें गांव!" नंतर उठून पुनः चालायाला लागण्याच्या उद्देशानें एका बाजूला कललेला आपला रुमाल त्यांनीं नीट सांवरला, हातांतल्या छत्रीनें काजीची एक फांदी खालीं वांकवली व चारपांच फळें तोडून झटपट

त्यांचा रस पिवून घेतल्यावर संतोषाचा एक सुस्कारा सोडला व उतरण उतरायला सुरवात केली.

पाव तासाच्या आंतच उतरण संपली व त्यांनीं गांवकुसू गांठलें. गांवाच्या मध्यभागीं एक विस्तीर्ण तलाव, त्याच्या सभोंवतीं घनदाट भाटांनीं व कुळागरांनीं वेढलेलीं लहान लहान घरें व झोंपड्या, दक्षिण सीमेवर असलेल्या उंच टेंकड्यांच्या रांगामधून दक्षिणोत्तर खालीं धांव घेणारा व तलावाला येऊन मिळणारा ओढा व या टेंकड्यांच्या विरुद्ध दिशेला, उत्तरेला, तलावापलीकडील प्रचंड खळखळाट करणारी खारी नदी, हें त्या गांवाचें सुंदर दृश्य आतां मंगेशरावांना सुस्पष्टपणें दिसूं लागलें व त्यांचे डोळे त्यावर खिळून राहिले!

हर्षभरित अंतःकरणानें त्या चिमुकल्या गांवाचें सौंदर्य अवलोकन करीत, ते एक दोन मिनिटें तेथें उभे होते, तोंच कोणाचे कुणबाऊ हेल काढून उच्चारलेले शब्द त्यांच्या कानीं आले, “ कुठून आलांत हो ? ”

तत्क्षणीं मंगेशरावांनीं मागें वळून आजूबाजूला पाहिलें, पण कोणीही दिसेना ! इतक्यांत पुनः तोच आवाज त्यांच्या कानीं पडला, “ इतक्या तल्लीन चित्तानें काय पाहातां बाबा गांवाकडे ? गांव तर आज पांच वर्षें झालीं, अगदीं वशाड पडला आहे ! ”

आवाजाच्या अनुरोधानें त्यांनीं लगेच डावीकडे दृष्टि वळवली, तों हें बोलत असलेला एक म्हातारा कुडवाळी पिंपळाच्या झाडावर बसलेला त्यांस दिसला ! एका फांदीच्या कोंवळ्या टहाळ्या मोडून खालीं वृक्षाच्या बुंधाशीं बसलेल्या एका रोडक्या गाईपुढें तो टाकीत होता.

कुतूहलपूर्वक त्याच्याकडे पाहात त्याच्या शब्दांचा अर्थ काय असावा, याचा मंगेशराव विचार करूं लागले. पण त्यांची मति कुंठित

झाली ! “ कोणीतरी वेडगळ प्राणी असेल ! बरळला असेल कांहीं-तरी ! ” असें जरी त्यांनीं स्वतःच्या मनाचें समाधान करून घेतलें, तरी त्याच्या प्रश्नास कांहीतरी उत्तर देणें आवश्यक वाटल्यावरून ते म्हणाले,

“ वाः ! असं काय भलतंच बोलतोस म्हातारेबुवा ! किती छान आहे तुझा गांव ! माझी तर दृष्टि जातांच तहानभूक निवून गेली ! आणि हा तलाव किती अफाट ! किती सुंदर ! ”

“ अगा, सभाग्या ! हा तलाव पाहून तुमची तहानभूक निवून गेली होय ? हो ! कां न जाणार ! या तलावामुळें आम्ही तहानभुकेनें तळमळतों आहों, तेव्हां तो पाहून तुम्हां दुस्वासी लोकांची तहान-भूक निवणारच ! तुमच्यासारख्यांच्या पापी डोळ्यांची दृष्ट लागून तर आमचा हा गांव असा पाड पडला ! असं बोलून आम्हां गरि-बांच्या दुःखावर डागण्या देतां, हें देवाला बरं दिसणार नाहीं बरं ! म्हणे किती सुंदर तलाव ! ” भुंवया वर चढवून अत्यंत संतापानें व तिरस्कारानें हें बोलत असतां म्हाताऱ्याची मान कांपत होती ! एका हातानें फांदी पकडून दुसऱ्या हातानें त्यानें आवेशानें हातवारेही चाल-वले होते.

अनपेक्षितपणें आपल्यावर झालेला हा गहजब पाहून मंगेशराव गांगरून गेले ! किंचित् विचार करून सौम्य स्वरानें ते त्याला म्हणाले, “ भल्या माणसा ! माझ्यावर निष्कारण कां असा रागावतोस ? मी आज वीस वर्षांनीं मुंबईहून गोव्याला आलों आहें, व या तुझ्या गांवाकडे तर ही माझी सबंध जन्मांत पहिलीच खेप ! मग या तला-वाची ही काय भानगड आहे, हें मला कसं ठाऊक असणार ? तुला लागण्यासारखे नकळत माझ्या तोंडून कांहीं शब्द निघाले असल्यास ते मनावर घेऊं नकोस ! तुला दुखवण्याचा माझा उद्देश नव्हता ! ”

म्हाताऱ्याच्या रागाचा पारा जितक्या वेगानें चढला होता, तितक्याच वेगानें तो आतां खालीं उतरला !

" खरंच का तुम्हांला माहित नाहीं ? मग उगाच तुम्हांला हे वाईट शब्द बोललों ! माफ करा साहेब ! आम्ही अडाणी माणसं ! आणि त्यांत सध्यांच्या या दुःखानं वैतागून गेलेलों ! बोलतांना तेवढा पोंच राहिला नाहीं ! तुम्हांला सांगतोच आमची सारी कर्मकथा ! " हे शब्द बोलतां बोलतां तो पिंपळावरून खालीं उतरला व अदबीनें मंगेशरावांपासून कांहीं अंतरावर येऊन उभा राहून दीनवाण्या स्वरानें पुढें बोलायाला त्यानें सुरवात केली.

" माझी आतां उणींपुरीं पाऊणशें वर्षें उमर आहे. पांचदहा जास्ती होतील किंवा कमी होतील, एवढच ! या माझ्या सबंध आयुष्यांत या गांवांतल्या आम्हां कुडबाळयांवर इतके वाईट दिवस आलेले मी कधीही पाहिलेले मला आठवत नाहीं बघा दादा ! नाहीं म्हटल्यास चाळीस वर्षामागं एकदां टोळधाड आली होती ! टोळधाड म्हणजे अशी तशी नव्हे ! एकदां त्यांच्या झुंडी आल्या, म्हणजे सबंध गांवावर छत्री धरल्याप्रमाणें सांवली पडे ! त्या टोळांनीं त्यावर्षी गावांत नांवाला एक हिरवं पान शिल्लक ठेवलं नाहीं ! सबंध वर्षाचा आमच्या तोंडचा घांस काढून नेला ! पण तेव्हांसुद्धां आम्हांला आजच्या इतकी हलाखी वाटली नाहीं. एक वर्ष कसेबसे पोटाचे हाल सहन केले व नंतर देवदयेनें पुढील वर्षं चांगलीं येऊन सर्व जिवांचा संतोष झाला ! तशांत तो एक ईश्वरी कोप होता ! पण सध्याचें हें संकट आम्ही माणसांनींच स्वतःवर ओढवून घेतलं आहे ! आज पांच वर्षें झालीं, पोटाला चिंध्या बांधून आम्ही गांवांतलीं शंभर कुटुंबे दिवस काढतों आहोंत ! व आमच्याबरोबर तीं बिचारीं जवळजवळ दहाबारा खंडी गुरंढोरं

चाऱ्यादाण्याशिवाय तडफडताहेत ! व याला कारण तो समोर दिसतो आहे तो तलाव ! ”

“ काय तलाव ! ? ” अत्यंत सहानुभूतिपूर्वक म्हाताऱ्याची कहाणी ऐकणाऱ्या मंगेशरावांच्या तोंडून आश्चर्योद्गार निघाले.

“ होय ! तलावच ! ” म्हाताऱ्यानें ठांसून उत्तर दिलें ! “ हा आज येथें जो तलाव दिसतो आहे, तेथेंच पांच वर्षांमागे तुम्हांला गांवाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत पसरलेलें, वर्षाच्याकांठीं सदोचें व वांयगणाचें मिळून हजार भऱ्यांचें पीक देणारें, भलें मोठें अफाट खाजन दिसलें असतें ! हें खाजन पिकवून व धनीसाहेबांना बरें मागून घामाकष्टाची मिळणारी पेज खात, आम्ही भागेली लोक आज अनेक पिढया या गांवांत नांदत आलों आहोंत ! इतकेंच काय, पण या खाजनाचे धनी निरनिराळे होऊन गेले. गेल्या चार पिढया सध्याच्या देशपांड्यांच्या घराण्याकडे हें आहे. त्याच्यापूर्वी कांहीं भाग एका वाण्याच्या व राहिलेला एका भटाच्या मालकीचा होता. या भटानें व वाण्यानें एका गाबत्याकडून तें खरेदी केलें होतें, असें माझे आजोबा सांगत असल्याचें मला आठवतें. मात्र वर्षामागून वर्षें व पिढयांमागून पिढया, याची मशागत करणारे आम्ही भागेली मात्र तेच आहोंत ! आमच्या व आमच्या वाडवडिलांच्या नांगराशिवाय दुसऱ्या कोणाच्याही नांगराचा फाळ आजवर या जमिनीला लागलेला नाहीं, व दुसऱ्या कोणाही इसमाच्या अंगचा एक थेंब या खाजनावर गळालेला नाहीं ! आम्हीच मुळीं या गांवचे रहिवासी ! म्हणूनच दसऱ्याच्या दिवशीं देवीपुढं पहिला नारळ फोडण्याचा मान आम्हां कुडवाळयांकडे चालत आला आहे ! कोणी कांहींही करो, आम्ही गांवकर लोकांनीं नारळ फोडल्याविना देवीपुढं तरंग उभं राहतं तर पाहा ! ”

देवीचा व तरंगाचा उल्लेख करतांना समोर दिसणाऱ्या गांवांतल्या देवळाकडे म्हाताऱ्यानें बोट दाखवलें व त्यावेळीं त्याच्या हृदयांत उसळलेली भाविकतेची लाट, त्याच्या आवाजांत एकाएकीं आलेला कंपयुक्त आवेश व त्याच्या निस्तेज डोळ्यांवर क्षणमात्र येऊन गेलेली एक चमक, यांनीं दाखवून दिली !

" खरं का ? " सस्मित मुद्रेनें व कौतुकयुक्त स्वरानें उच्चारलेल्या या दोनच साध्या शब्दांनीं, देवळांतल्या या मानाबद्दल, मंगेशरावांनीं त्याचें अभिनंदन केलें.

म्हाताऱ्यासही त्यामुळें आनंद झाला ! थोडा वेळ थांबून तो पुढें म्हणाला, " पण देवळांतला हा मान वर्षांतून एक दिवस ! राहिलेले तीनशें एकुणसाठ दिवस आम्हांला कुत्रासुद्धां पुसत नाहीं ! तसं नसतं, तर आम्हाला सध्याचे हे हाल कां काढावे लागले असते ? अहो, आज पांच वर्षं झालीं ! या खाजनाचा तो नदीच्या बाजूचा बांध फुटल्यामुळें खारं पाणी आंत शिरून खाजनाऐवजी हा तलाव बनून राहिला आहे ! बांधाला आधीं एक लहानसें भगदाड पडलं होतं; तें वेळींच बुझवलं असतं, तर ही नासाडी झालीच नसती. पण त्याच वेळीं थोरल्या घरांतले बाबासाहेब व धाकट्या घरांतले रावसाहेब यांच्यामध्यें दुही माजली ! सबंध खाजन एकाच घराण्यांतल्या या दोघां वर्गाच्या समाइक मालकीचें ! पूर्वी दोन्ही वर्ग त्या एकाच थोरल्या घरांत गुण्यागोविंदानें एकत्र नांदत असत. पण अलीकडे एक वर्ग फुटून त्या ओढ्यापलीकडच्या धाकट्या घरांत राहतो आहे व तेव्हांपासून ही जी धुसपुस सुरू झाली ती आतां इतकी पेटली आहे कीं, सांगतां सोय नाहीं ! या खाजनाची यांच्या आजोबापर्यंत किती बेस बरी व्यवस्था चालत आली होती ! तो त्या टेंकाडांमधून ओढा खालीं वाहतो आहेना ? "—म्हाताऱ्यानें दक्षिण

दिशेकडील टेंकड्यांकडे बोट दाखवलें. "त्याचें पाणी सबंध वर्षभर या खाजनांत वाहून येऊन, ही सगळीं एस्पेस जमीन भिजवीत असते. त्या नदीच्या बाजूला जो बांध आहे, त्या बांधाच्या मध्यमार्गी असलेल्या मानसेमधून शेत भिजवून राहिलेलं फालतू पाणी मुकतीच्या वेळीं नदींत सोडून देतां येई ! पांचवर्षामागे बांध असा भक्कम होता, कीं भरतीच्या वेळीं मानसेचीं दारें बद केल्यावर, पुनवेच्या व अमावास्येच्या जोरगतीच्या दिवशीं सुद्धां काय बिशाद होती, खाऱ्यापाण्याचा एक थेंब आंत खाजनांत शिरण्याची ! पण आज त्याच या खाजनाची काय दुर्दशा झाली आहे पहा ! ठिकठिकाणीं बांध कोसळून गेला आहे व भरतीच्या वेळीं सबंध खाजन भरतीच्या खाऱ्या पाण्यानें भरून जातें ! त्या पाण्यानें बनलेला हा तलाव तुम्हांला सुंदर वाटला, पण या तलावाहून शेंकडोंपट सुंदर देखावा, त्याच जागीं पांच वर्षामागं तुम्हांला दिसला असता ! पहाणाऱ्याची नजर ठरत नाहीं, एवढें विस्तीर्ण हिरवें पिवळें शेत वर्षातून दोनदां ज्या ठिकाणीं दिसे, तेथेंच आज खारवट पाण्यावर पोसणारीं हीं दळभद्रीं इपलीचीं व चिपीचीं झाडें मातली आहेत. पूर्वी खाजनांतील गोड्या पाण्याच्या ओलाव्यामुळें, बांधावर व खाजनाच्या आजूबाजूच्या जमिनीवर बाराही मास उगवणाऱ्या हिरव्याचार गवतावर आमच्या गुरांढोरांचे कळप तासांचे तास मान वर न करता चरतांनां दिसत ! पण भुकेनें तळमळणाऱ्या त्याच मनजातीला या झाडाचा भिकार, रुक्ष पाला घालून आज कसेंबसें आम्ही जगवतों आहोंत ! आनंदानें खपणाऱ्या शेकडों पुरुष, स्त्रिया, मुलांचा जमाव व तीसचाळीस पुष्ट बैलांच्या जोड्या यांनीं हें खाजन पूर्वी फुललेलें दिसे ! व वर्षभर एकामागून एक नांगरणी, ओपणी, लुवणी, मळणीं इ. कामांची सतत मारे गर्दी उडालेली पहायला मिळे !"

म्हातारा पोटतिडकीनें हें सर्व बोलत होता ! बोलून थकल्यामुळें तो आतां थांबला. त्यानें सांगितलेली सर्व हकिगत ऐकून मंगेशरावांचें अंतःकरण कळवळल्यावांचून राहिलें नाहीं !

"तुम्हां गरीब लोकांवर ही मोठीच आपत्ति म्हणायाची !" सहज रीतीनें अनुकंपायुक्त स्वरांत त्यांच्या तोंडून हे उद्गार निघाले.

" पण तुम्हा भागेल्यांबरोबर तुमच्या भाटकारांचेंही यांत नुकसान आहेना? मग एकदांचा हा बांध दुरुस्त करून हें खाजन पुनः ते वसवीत कां नाहींत? बांध पुनः दुरुस्त करणें आतां शक्य नाहीं का?"

म्हातारा अशा एखाद्या योग्य प्रश्नाचीच वाट पाहात होता. किंचित् भुंवया वर चढवून तो म्हणाला, "शक्य नाहीं, असं कसं होईल? आजपर्यंत या खाजनाच्या बाबतींत देमांदापायीं जो या दोन्ही पक्षांनीं पैसा खर्च केला आहे, त्याचा दहावा नव्हे विसावा हिस्सा मुद्धां या कामाला लावायला ते तयार होतील, तर आठ दिवसांच्या आंत बांध पुनः बांधून काढतां येईल. पण त्यासाठीं त्यांच्यापैकीं कोणीतरी एकानें पडतें घेऊन आपसांतील कलह आधीं मिटवला पाहिजे ना? आम्हां गरीब कुडवाळ्यांना हें खाजन म्हणजे भिकाऱ्याच्या उशाखालची पोळी ! पण तसं त्यांचं थोडंच आहे. त्यांची या खाजनावरच कांहीं सर्व मदार नाहीं. आजूबाजूच्या गांवांत त्यांच्या मालकीचीं आणखी ठिकाणें आहेतच. बाकी तींही आतां हळुहळू देमांदामुळें गहाण पडताहेत म्हणा! पण त्यांचा सर्वच प्रकार मातबर ! इर्षेला बळी पडून या खाजनाच्या दरसालच्या तीसचाळीस हजारांच्या उत्पन्नावर तर त्यांनीं पाणी सोडलेंच आहे ! शिवाय या खाजनाच्या सभोंवतालील त्यांच्या भाटांतील माड या खाऱ्या पाण्याच्या संसर्गानें मरत चालले आहेत, तेंही थोडंथोडकं नुकसान नाहीं ! जेथें पूर्वी दर पाड्याला वीस पंचवीस हजार नारळ पडत,

तेथेंच आतां पंधरासोळाहजारही पडण्याची मारामार ! पण एवढं मोठं नुकसान सोसूनही देमांद चालू ठेवण्याची त्यांस धमक आहेच. आम्हा गरिबांची स्थिति मात्र 'रेडेपाडे झुंजताहेत व झाडांवर काळ !' अशी झाली आहे ! "

त्याचें एवढें बोलून होतें आहे, इतक्यांत शेजारच्या नारळीच्या बागेत चाललेला गाण्याओरडण्याचा आवाज त्यांच्या कानीं आला. म्हाताऱ्यानें त्या बाजूला वळून बारीक दृष्टीनें थोडावेळ इकडे तिकडे पाहिलें व नंतर एकदम उसळून तो म्हणाला, " आम्ही उपाशीं मरतों आहोंत ! पण सध्या चंगळ चालली आहे, ती मात्र या परदेशी पोळांची ! पाहा कसे आडसरांचा यथेच्छ फडशा पाडताहेत ! बाग कोणाची ! हे कोण कुठले ! पण आहे का कांहीं दरकार त्यांना या गोष्टीची ! यापूर्वी आम्हा भागेल्यांचे नजरे समोर धनीसाहेबांच्या एका चुडीला हात लावण्याची होती का कोणाची प्राज्ञा ? पण आतां " पाद्री पडला बोवाळांत व इगर्ज लुटली गेली !" असा प्रकार येथें चालला आहे !

" पण या पुरभय्यांची ही एवढी मोठी टोळी या लहानशा गांवांत कुठून आली ? " मंगेशरावांनीं कुतूहलपूर्वक त्या बागेकडे दृष्टि फेंकीत विचारलें !

" तेंच तर सांगतों आहे ना साहेब ! दोन्ही पक्षांमध्यें अलीकडे कोणत्या ना कोणत्या कारणामुळें वारंवार मारामाऱ्या होत असतात ! आरंभीं या दोन्ही घरांमधले बदेच हें एकमेकांचीं डोकीं फोडण्याचें काम पार पाडीत ! पण दोन महिन्यांमागें थोरल्या धनीसाहेबांनीं धाकट्या घरावर मात करण्यासाठीं मुंबईहून ही भाडोत्री भय्यांची टोळी आणली. भाकरीचा तुकडा ज्याच्याकडून मिळेल, त्यानें 'छू !' करतांच कोणाचाही चावा घेण्यास हे कुत्रे नेहमीं एका पायावर तयार

असतात ! यथेच्छ घीशक्कर खाऊन व पुऱ्या बडवून चैनींत राहावं व महिन्यापंधरवड्यानें एकदां अस्तन्या सरसावून व लाठ्या परजून गांवांत विरुद्धपक्षाविरुद्ध दंगल माजवावी, ही यांची सध्या कामगिरी ! पण यांचाही आतां नक्षा उतरण्याची वेळ आली आहे. थोरल्या घराला तोडीला तोड म्हणून धाकट्या धनीसाहेबांनीं आठच दिवसांमागं आपल्या बाजूला पठाण आणले आहेत ! त्या लोकांच्या खान्याला तर दर दिवसाला एक सबंध बकरा व पंधरा वीस कोंबडींही पुरत नाहींत ! ”

“ अरेरे ! हें प्रकरण एवढ्या थराला येऊन पोहोंचलें आहे का ? केवढी लाजिरवाणी गोष्ट ! एवढ्या थोर घराण्यांतल्या या गृहस्थांना हा प्रकार खात्रीनें शोभत नाहीं ! निदान तुम्हा गरीब कुळांचे चाललेले पोटाचे हाल पाहून तरी यांनीं आपसांतली ही दुही मिटवून टाकावी ! आज पांच वर्षे खाजन अशा स्थितींत ठेवून गांवातल्या शेंकडों जिवांचा चाललेला तळतळाट उघड्या डोळ्यांनीं पाहाणाऱ्या या तुमच्या धनीसाहेबांना कांहीं माणुसकी आहे कीं नाहीं ? ”

असहाय्य गांवकऱ्यांच्या करुणास्पद स्थितीची हकिगत ऐकून मनांत उचंबळून आलेल्या सहानुभूतीच्या भरांत मंगेशरावांचे तोंडून हे जे शब्द निघाले, त्याचा म्हाताऱ्याच्या मनावर दुहेरी परिणाम झाला. त्या शब्दांतील सहानुभूतीचा ओलावा त्याच्या दुःखीकष्टी मनास समाधान देण्यास कारण झाला, पण त्याच वेळीं एका तिऱ्हाईत माणसानें आपल्या धनीसाहेबासंबंधीं निंदायुक्त उद्गार काढावे, या गोष्टीचें त्याला वाईटही वाटलें ! त्याच्या रोमरोमांत भिनलेलें निस्वार्थी स्वामीनिष्ठेचें आनुवंशिक बीज यावेळीं जागें झालें ! लगेच नापसंतीचा भाव आपल्या चेहऱ्यावर व्यक्त करून तो म्हणाला “असं कसं म्हणतां रावसाहेब ? धनीसाहेबांना काय आम्ही उपाशीं मरावं असं वाटतं आहे ? पण त्यांचा निरुपाय

आहे ! हा त्यांच्या आपसांतल्या हक्काचा व इभ्रतीचा प्रश्न आहे ! आमच्यासारख्या भिकारड्यांना पोटापुढं दुसरं काही दिसत नाहीं ! पण त्यांचं तसं नाहीं ! त्यांना वाडवडिलांपासून चालत आलेले आपले हक्क व इभ्रत ही राखावी लागतात ! त्यांच्यासाठीं भांडावं लागत ! शिवाय या अशा गोष्टीचा निकाल लावण्याच्या बाबतीत त्यांना सरकारदरबारातून काय थोड्याथोडक्या अडचणी येत असतील ? त्यांची आम्हां अज्ञान कुडवाळ्यांना कुठली कल्पना असणार ?"

थोड्या वेळापूर्वी अत्यंत वैतागानें आपल्या आपत्तीचा पाढा वाचणाऱ्या म्हाताऱ्यानें त्या आपत्तीस कारण झालेल्या आपल्या धनीसाहेबांच्या कृतीचें अशा रीतीनें समर्थन केलेलें पाहातांच मंगेशरावांस बरेंच आश्चर्य व थोडीशी मौजही वाटली व त्यांच्या चेहऱ्यावर थोडा वेळ स्मित झळकलें !

म्हाताऱ्याची गोष्ट ऐकतां ऐकतां बराच वेळ निघून गेला, हें आतां त्यांच्या लक्षांत आलें ! ते चटकन् गांवाकडे निघालेल्या पायवाटेकडे वळले व त्याचा निरोप घेतां घेतां म्हणाले, "बरं बाबा ! तू म्हणतोस तसंच का होईना ! यांत तुझ्या धन्याचा दोष असो वा नसो पण एकदां देव करो व त्यांची आपसांतली दुही लवकर मिटून तुम्हां गरिबांची होत असलेली ही उपासमार टळो !"

"तुमच्या तोंडांत साखर पडो, साहेब !" कृतज्ञतायुक्त स्वरानें व लीनपणानें म्हाताऱ्यानें उत्तर दिलें !

"तुझ्या धनीसाहेबांकडे—बाबासाहेबांकडे—मला जावयाचें आहे. त्यांचें घर याच बाजूला ना ?" तेथून निघतांना मंगेशरावांनीं त्यास सहज प्रश्न केला. तोंच म्हाताऱ्याला त्यांजविषयीं वाटूं लागलेला आदर दसपट वाढला ! "काय ? तुम्ही आमच्या धनीसाहेबांचे पाहुणे ?

मग एवढा वेळ हें कां बोललां नाहीं ! चला, मी दाखवतों त्यांचें घर तुम्हांला !" असें म्हणून लगेच त्यानें त्यांजपुढें चालायला सुरवात केली.

थोड्या वेळानें एका भल्या मोठ्या वाड्याकडे येऊन पोहोंचल्यावर बऱ्याच अभिमानाच्या व आपलेपणाच्या स्वरानें म्हातारा म्हणाला, "हाच आमच्या धनीसाहेबांचा वाडा !" व त्या वाड्याबाहेरील गडग्याला असलेलें लांकडी फाटक त्यानें बाजूला केलें. फाटक ओलांडून मंगेशराव आंत शिरतांच मोठ्या अदबीनें त्यानें त्यांचा निरोप घेतला व तो माघारा वळला.

गडग्याच्या आंत मंगेशरावांना एक विस्तृत आवार लागलें. या आवाराची डावीकडची कांहीं बाजू एका पडवीनें व्यापलेली असून तेथें गोठा व तबेला होता. गोठ्यामध्यें वीस पंचवीस खुंट होते, पण सध्या त्यांत दोन तीनच गुरें बांधलीं जात असावीं, हें त्या गोठ्याच्या वापरण्यांत आलेल्या एका लहानशा कोंपऱ्यावरून उघड दिसे. तबेल्यांत बरींच वर्षे घोडा नसावा, हें कोणालाही ताडतां आलें असतें. गंज चढलेली एक शिग्राम गाडी, धुळीनें माखलेलें एक मोडकें माचील व जळाऊ लांकडांचा व मोडणांचा ढीग, यांनींच त्याचा बहुतेक भाग व्यापला होता. आवाराच्या उजव्या बाजूच्या कडेला आंब्याचीं, फणसाचीं व पेरूचीं चार पांच झाडें, एक बेलाचें झाड व पारिजातक, बटमोगरा, आबोलीं, शब्दुलीं अशीं कांहीं फुलझाडें होतीं. त्यांच्याच शेजारची थोडी जागा वेळूच्या कुंपणानें वेढलेली असून तेथें आधुनिक पद्धतीची फिरंगीफ्याशनची बाग तयार करण्याचा प्रयत्न केलेला दिसत होता. पण तेथें ठेवलेल्या कांहीं कुंड्या फुटल्या होत्या व इतर कुंड्यांत लावलेलीं कांहीं नव्या नवलाईचीं झाडें मरून गेलीं होतीं. या बागेच्या

आजूबाजूला माडाचे वांसे, चुडतें, फळीं इ० बरीच अडगळ पडलेली होती.

या आवारावरून प्रत्यक्ष दुमजली वाडयाकडे नजर फेंकली, तर त्याच्या एका कोंपऱ्याकडचा कांहीं भाग पाडण्यांत आला असून तेथें नवीन गच्ची उभारण्याचें सुरू केलेलें बांधकाम बरेंच दिवस अर्धवट राहिलेलें असावें, ही गोष्ट ठळकपणें दृष्टीस पडे.

देशपांडयांच्या वाडयाचें हें बाह्य दृश्य कुतूहलपूर्वक पाहात पाहात मंगेशराव बल्कावांत येऊन पोहोंचले. आपल्या अंगाचें वेंटोळें करून बल्कांवाच्या कोंपऱ्यांत डुलक्या घेणाऱ्या एका म्हाताऱ्या कुत्र्यानें त्यांची चाहुल लागतांच थोडीशी गुरगुर केली. ती ऐकून एक नोकर बाहेर आला व त्यानें विचारपूस करून मंगेशरावांना आंतल्या एका दिवाणखान्यांत नेलें, व धनीसाहेबांना वर्दी देण्याकरितां तो तेथून निघून गेला.

दाराजवळचा दिवाणखान्याचा बराच मोठा भाग नव्या पाडाच्या नारळांच्या ढिगानें व्यापला होता, व त्यामध्यें एका कोंपऱ्यांत, नुकतीच व्यालेली एक मांजरी आपल्या पिलांना चाटीत बाळंतपणांतील विश्रांति घेत पडली होती. या ढिगामधून कशी वशी वाट काढून मंगेशराव पलीकडच्या बाजूला असलेल्या खुर्च्यांपैकीं एकीवर जाऊन बसले. दिवाणखाना ऐसपैस लांबीरुंदीचा व हंडयाझुंबरांनीं व भल्यामोठ्या आरशांनीं शोभवलेला होता. मात्र झुंबरांचें बरेचसे लोलक गळून गेले असून कल्हई गेल्यामुळें आरशांवर बऱ्याच जागीं टिपके पडले होते. भिंतीवर ठिकठिकाणीं तसबिरी व फोटो टांगलेले होते. बहुतेक सर्व तसबिरी देवादिकांच्या व आरशांवर चितारलेल्या असून त्या शेंसवाशें वर्षांइतक्या जुन्या असाव्या. फोटो मात्र गेल्या पंचवीस तीस वर्षांतलेच

होते; त्यांतील, दों. कार्लुश्, दों. मानुयेल, इ. पोर्तुगालच्या राजघराण्यांतील व्यक्ति, त्यांच्याच शेजारीं असलेले दो. आल्मेद, मानुयेल-द-आर्रेयाग व गोव्याचे कांहीं गव्हर्नर व न्यायाधीश यांचे फोटो विशेष डोळ्यांत भरण्यासारख्या ठिकाणीं लावण्यांत आले होते. याशिवाय तरवारी, भाले, बंदुका अशीं कांहीं जुनीं गंजलेलीं हत्यारेंही भिंतीवर बसवलेलीं दिसत होतीं.

दिवाणखान्याच्या या दृश्यावरून मंगेशराव आपली दृष्टि फिरवीत आहेत, इतक्यांत बाबासाहेब आंत आले. मंगेशरावांनीं आपलें नांव-गांव सांगून आपली त्यांना ओळख करून देण्यास सुरवात केली, तोंच एक नोकर गुडगुडी घेऊन तेथें आला व मोठ्या अदबीनें त्यानें ती मंगेशरावांपुढें केली. त्यांनीं गुडगुडीची आपल्याला संवय नसल्याचें सांगितल्यावर बाबासाहेबांनीं ती घेतली, व दोनचार झुरके घेऊन परत केली, व पाहुण्यासाठीं चहाची तयारी करण्याबद्दल आंत निरोप पोहोंचवण्यास व चहा होईपर्यंत दोनतीन आडसरें आणण्यास त्या नोकरास त्यांनीं फर्मावलें.

स्वतःचा परिचय करून देतांना मंगेशरावांनीं नंतर आपल्या आजोबांचा व बाबासाहेबांच्या चुलत्यांचा जुगारीच्या नादामुळें, त्यांच्या सबंध आयुष्यभर कसा जीवश्चकंठश्च स्नेह होता, या गोष्टीची त्यांस जाणीव करून दिली. मंगेशरावांचा आपल्या घराण्याशीं असलेला इतका जवळचा व निकट संबंध कळून येतांच बाबासाहेबांना आतां त्यांच्याविषयीं दुजाभाव वाटणें शक्यच नव्हतें. हर्षभरानें मंगेशरावांच्या खांद्यावर हात ठेवून ते म्हणाले "अरे वाः! तुम्ही भवानीबाबांचे नातु का? मग हो आणखी स्वतःचा परिचय काय करून देतां? भवानीबाबांचा व आमचा इतका घरोबा कीं कोणालाही ते आमच्या कुटुंबांतलेच एक वाटत! दसऱ्याच्या वेळीं जी स्वारी यायची,

ती दोन महिने आमच्याकडे राहून व आमच्या काकांबरोबर या बाजूच्या सर्व जत्रा फिरून, मग काकांना बरोबर घेऊन म्हाडदोळ-षष्टीला जायची, ती काकांसह तीनचार महिने त्या बाजूला बेपत्ता! काकांचीही त्यांच्यावर भारी भिस्त ! भवानीबाबा बरोबर असले, कीं कितीही अट्टल जुगाऱ्याबरोबर सामना द्यायला ते कधीं कचरायचे नाहींत ! एखाद्या पेगूवरही अंगरखारुमाल गहाण ठेवण्याची ते पाळी आणीत ! ”

यानंतर आपले काका व भवानीबाबा या वीरद्वयानें गोव्यांतील निरनिराळ्या प्रख्यात जुगारी अड्ड्यांवर गाजवलेल्या पराक्रमाचें रस-भरित वर्णन करतांना बाबासाहेबांना इतकें स्फुरण आलें, कीं मध्यं-तरीं नोकरानें आणून दिलेलीं आडसरें व नंतर चहा बरोबर आलेला सांजा, तिखटपोहे, केळ्यांचा हलवा इ. चार पांच खाद्यपदार्थांवर यथास्थित ताव मारण्यांत, व त्या बाबतींत आपलें अनुकरण करण्या-बद्दल पाहुण्यांना पुनः पुनः अत्याग्रह करण्यांत त्यांचा जो वेळ गेला असेल, तेवढा खेरीज करून, इतर सबंध दीडदोन तास त्यांच्या वक्तृत्वाचा ओघ थांबतां थांबेना !

त्यांच्याशीं असलेलें आपलें काम झटपट उरकून घेण्यास अत्यंत अधीर झालेले मंगेशराव संभाषणाचा विषय बदलण्याच्या हेतूनें मधून मधून एखादें दुसरें वाक्य बोलण्याचें धाडस करीत, पण तें बाबासा-हेबांच्या शब्दांच्या ओघांत, त्यांच्या हास्यलकेरींच्या झपाट्यांत व हातवाऱ्यांच्या जाळ्यांत कुठल्याकुठें गडप होऊन जाई !

मंगेशरावांची या बिकट स्थितींतून मुक्तता करण्याचें श्रेय शेवटीं एका नोकरास मिळालें! खोबरेलतेलाची एक तपेली आणून त्यानें आपल्या धनीसाहेबांपुढें ठेवली व पेजेची वेळ झाल्याचें त्यांना सुच-

वलें. बाबासाहेब आतां भानावर आले. तेलाची तपेली त्यांनीं पाहु-ण्यापुढें केली व स्वतःही त्यांतील तेल डोक्यास व इतर सर्व अंगास माखण्यास सुरवात केली. हा तैलसंमार्जनाचा विधी मंगेशरावांनीं झटपट एकदोन मिनिटांनीं उरकला. बाबासाहेबांना मात्र तो आटोपण्यास पंधरा वीस मिनिटें लागलीं, नंतर आंघोळ झाल्यावर बाबासाहेब व मंगेशराव पेज जेवण्यास बसले. पेज जेवतांना तरी बाबासाहेबांच्या तोंडाचा पट्टा बंद पडेल व आपल्याला बोलायला संधी मिळेल अशी मंगेशरावांना वाटू लागलेली आशाही लगेच नष्ट झाली! पेजेबरोबर तोंडीं लावण्यासाठीं म्हणून केळीच्या पानांवर वाढण्यांत आलेल्या हळसाण्याच्या मसालेदार सांबाऱ्याचे भुरके घेणें, त्या सांबाऱ्याबरोबर खाण्यासाठीं दुसऱ्या एका पानावर ठेवले गेलेले गरम खुसखुशीत पोळे एकामागून एक, एकदोन घांसांत फस्त करणें व मधून मधून पेजेची पितळी तोंडाला लावून पेजेचे पल्लेदार घोंट घेणें, या तिन्ही कामांत थोडासुद्धां खंड पडूं न देतां, सांबाऱ्याचा व पोळयांचा समाचार घेण्याच्या बाबतींत पाहुण्यांनीं चालवलेली अळमूटळम् व चुकारपणा, या गोष्टींविरुद्ध त्यांच्या ‘ मुंबैकरी ’ नाजु-कपणाचा उपहास करीत, बाबासाहेब एकसारखा असा झोड उठवीत होते, कीं त्यांच्या जिव्हेचें हें सव्यसाचित्व पाहून मंगेशराव आश्चर्यानें थक्क झाले!

अशा रीतीनें अर्ध्यापाऊण तासानें हा पेजविधी आटोपला व बाबा-साहेब पाहुण्यासह दिवाणखान्याकडे वळले. “दुपारच्या जेवणाला पलतडच्या वेळेवरचीं कालवें व शेजारच्या गांवांतील मिठागारांतून शेंवटे आणवल्याशिवाय राहूं नकोस!” अशी जेवणघर सोडतां सोडतां त्यांनीं स्वैपाक्याला दरडावून सूचना दिली! व पलतडच्या वेळेवरचीं कालवें सबंध महालांत किती प्रख्यात आहेत व शेजारच्या गांवां-

तील आपल्या मालकीच्या एका मिठागारांतील शेंवटे किती रुचकर असतात, याचें वर्णन करून आपल्या वडिलांच्या ओळखीच्या एका जुवीजाला या मिठागारांतील शेंवट्यांची कशी चटक लागली होती, व त्याला वेळोवेळ पाठवण्यांत आलेल्या या शेंवट्यांबद्दल, पेन्शन घेऊन पोर्तुगालला गेल्यानंतरही आपल्या वडिलांना पाठवलेल्या एकदोन पत्रांतून त्यानें कसा कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला होता, त्याचप्रमाणें सध्यांही आपले कित्येक बडे युरोपियन व क्रिस्तांव ऑफिसर स्नेही या कालवांची व शेंवट्यांची सागवाद पाठवली म्हणजे कसे खूष होऊन जातात, इ० बहारीच्या गोष्टी त्यांनीं मंगेशरावांना सांगण्यास सुरवात केली !

कोण जाणें या गोष्टींची सांखळी किती लांबली असती ! पण पेजे-नंतरच्या दररोजच्या वामकुक्षीच्या संवयीमुळें थोड्या वेळानें बाबासा-हेबांच्या डोळ्यांवर झांपड येऊं लागली व त्यांनीं निरुपायानें तो विषय एकदांचा आटोपता घेतला !

या संधीची वाट पाहात टपून बसलेले मंगेशराव यावेळीं मोठा हिय्या करून म्हणाले, " आतां ज्या कामासाठीं मी येथें आलों आहें, त्यासंबंधीं— "

पण बाबासाहेब त्यांना कसचें पुढें बोलूं देतात ! त्यांनीं मंगेशरा-वांना त्यांचें वाक्यही पुरें करूं दिलें नाहीं !

" त्याची तुम्ही मुळींच फिकीर करूं नका ! अहो तुमच्यासारखे कधीं न येणारे थोर गृहस्थ आमच्याकडे आले व त्यांचं काम झालं नाहीं, असं कसं होईल ? तुम्ही सांगण्याचाच अवकाश कीं तें झालेंच म्हणून समजा ! पण आधीं थोडी विश्रांति तरी घ्याल कीं नाहीं ? मग बोलू सावकाश !" असें म्हणून सकाळच्या चालण्याच्या श्रमांमुळें

आलेला शीण घालवण्यासाठीं थोडा वेळ आडवें होण्याबद्दल त्यांनीं पाहुण्यांना आग्रह चालवला! दिवसा झोंप घेण्याची आपल्याला संवय नसल्याचें मंगेशरावांनी पुष्कळ सांगून पाहिलें, पण व्यर्थ! जवळच गड्यानें दोन बिछाने पसरवून ठेवले होते, त्यांतील एकावर बाबासाहेबांनीं आपला देह ताणून दिला. अर्थात् शिष्टाचारार्थ त्यांनाही दुसऱ्यावर पहुडणें भाग झालें! एकदोन मिनिटांतच बाबासाहेब घोरूं लागले! व ते उठतांक्षणींच पहिल्याप्रथम कशा प्रकारें आपला विषय त्यांजकडे काढावा व त्याचा निकाल लावून घ्यावा, याचा विचार करण्यांत मंगेशराव गढून गेले!

बाबासाहेबांची पेजेनंतरची वामकुक्षी दोन तीन तासांपेक्षां कमी वेळांत आटोपली, असें कधींही झालें नाहीं! त्यांनहीं आज पाहुण्यांशीं बोलण्याच्या भरांत पोळ्यांवर त्यांनीं जरा जास्ती ताव मारला असल्यामुळें आज त्यांना उठायला त्याहूनही एक तास उशीर झाला! मंगेशरावांनीं मात्र, अधीरपणें ते जागे होण्याची वाट पाहात, हे चार तास कमालीच्या अस्वस्थतेंत घालवले!

झोपेंतून उठल्यावर जांभया देत पाहुण्यांकडे वळून दिलगिरीच्या स्वरांत बाबासाहेब म्हणाले, "आज जरा जास्ती वेळ माझा डोळा लागला! जेवणाची वेळ टळून गेली! तुम्हांला भूक लागली असेल! तुम्हां मुंबईच्या मंडळीला सर्व गोष्टी वक्तशीर करण्याची संवय!"

"छे! छे! नोकरीपेशाच्या पराधीनतेमुळें आलेला हा आमचा वक्तशीरपणा म्हणजे जुलमाचा राम राम! हेंच पहाना आतां! परवां माझी रजा संपते! म्हणजे उद्यां सकाळीं बोटींत बसून परवां मुंबईला पोंचल्याशिवाय मला गत्यंतर नाहीं! नाहीं तर मिळालाच साहेबाकडून प्रसाद! म्हणूनच तर या गांवचें एक प्रेक्षणीय स्थळ पाहायचें आहे,

तें काम आज संध्याकाळच्या आंत उरकून घेऊन मला येथून निघणें भाग आहे. तें स्थळ येथून जवळच—"

शेवटीं एकदांचा मोठ्या खुबीदार रीतीनें आपल्या कामासंबंधींचा प्रश्न बाबासाहेबांकडे काढतां आल्याबद्दल आनंदून गेलेल्या मंगेशरावांचें हें शेवटचें वाक्य, बाबासाहेबांच्या तोंडून एकाएकीं झालेल्या जंगी हास्याच्या स्फोटामुळें अपुरेंच राहिलें !

"वाः ! खासें काम ! मला वाटलें होतें, कीं तुमच्या वडिलार्जित मिराशीसंबंधीं उद्भवलेली एखादी ज्युदिसियाल भानगड निवारण्याच्या कामीं कोणाही फिरंगीफिदाल्गाकडे माझ्या वशिल्याचा तुम्हाला उपयोग करायचा असेल, अल्प दरानें कांहीं शेतभाट खरेदी करण्याच्या कामीं माझ्या सल्लामसलतीची तुम्हाला जरुरी असेल, किंवा असेंच दुसरें कसलें तरी तुमचें महत्वाचें काम असेल ! हा प्रेक्षणीय स्थळें पाहाण्याचा तुमचा नादही औरच दिसतो ! अहो गिरण्या, ट्राम, राणीचा बाग, चौपाटी अशा मोटमोठ्या गोष्टी नेहमीं पाहाणारे तुम्ही मुंबईकर, या खेड्यांत प्रेक्षणीय असं पहाणार तरी काय ? नाहीं म्हटल्यास या गांवीं येणारे लोक दोन ठिकाणं पाहून जातात; एक गांवांतलें देऊळ व दुसरा हा आमचा वाडा ! त्यांपैकीं हा वाडा तर तुम्ही पाहिलाच ! आतां उद्यां परवां सावकाश तें देऊळही दाखवतां येईल. पण आलां आहां ते दोन दिवस थारवाल तर खरे ! झक मारेना तो साहेब ! रजेवर गेल्यावर त्याचेही ठरलेल्या मुदतीहून एखादे वेळेस दोनचार दिवस जास्ती मोडतातच कीं नाहीं ?"

बाबासाहेबांच्या या शब्दांनीं गोंधळून गेलेले मंगेशराव आतां त्यांना काय उत्तर द्यावें, याचा विचार करताहेत, तोंच ते दोघेही जेवणघरांत जाऊन पोंहोंचले.



“हा पत्रा व इतर पुरावा उद्यांच्या उद्यां जुविजांत गुदरतों व करतों प्रोसेस क्रीम !” [ पृ. ११२ ]

शेजारच्या स्वयंपाकघरांतून दरवळणाऱ्या तळलेल्या माशांच्या व कालवांच्या मसालेदार तोंडीं लावण्याच्या खमंग वासानें बाबासाहेबांची चर्या खुललेली पाहातांच, त्यांचें वक्तृत्व आतां कालवांच्या व शेवळ्यांच्या आपल्या आवडत्या विषयाकडे वळणार, हें धूर्त मंगेशरावांनीं ताडलें व घाईघाईनें ते म्हणाले, "आपला वाडा तर पाहाण्यासारखा आहेच! देऊळही अवश्य पाहिलं पाहिजे! पण मी मुद्दाम या गांवीं आलों आहें, तो येथून अर्ध्या पाऊण कोसाच्या अंतरावर असलेलं देवचाराच्या सड्यावरचें तें भुयार पाहाण्यासाठीं! मला इतिहाससंशोधनाचा थोडा नाद आहे, व त्या दृष्टीनें तें भुयार प्रत्यक्ष जाऊन पाहाण्याची इच्छा आहे!"

मंगेशरावांचे हे शब्द ऐकून बाबासाहेबांनीं आश्चर्यानें तोंड वासलें, तें मिटायाला त्यांना बराच वेळ लागला!

"अहो, त्या भुयारांत असं पाहाण्यासारखं आहे तरी काय? पाहाण्यासारखं असतं तर आम्हीं नसत का पाहिलं? पण उभ्या जन्मांत मी एकदांही तेथें गेलेलों नाहीं! गुरं घेऊन गेलेल्या राखण्यांची दुपारच्यावेळीं शिदोरी खाण्याची ती जागा! आणखी इतिहाससंशोधनाचा अशा खेड्यापाड्यांतील कोनाकोपऱ्यांत असलेल्या या भुयारांशीं काय संबंध? आमचे काकाही एक मोठे इतिहाससंशोधक होते! जुगाराच्या एखाद्या बैठकीत जरा विशेष ठोकर बसली, कीं स्वारी वैतागून जाऊन मग दिवसांचे दिवस वाचनांत व इतिहाससंशोधनांत गढून गेलेली दिसायची! 'श्रीम्हाळसादेवस्थानच्या आद्यमहाजनांच्या हक्कांची फोडणीशी' हा त्यांचा ग्रंथ तुम्ही वाचलाच असेल! त्यांत त्यांनीं या देवस्थानचे आद्य महाजन फक्त तीनच घराणीं असल्याचं—त्यांपैकीं एक आमचं!—व इतर सर्व महाजन उपरे असल्याचं कसं सप्रमाण दाखवून दिलं आहे! याहूनही जास्ती महत्वाचा एक ग्रंथ लिहायाला

त्यांनीं आरंभ केला होता, व त्यांत भरपूर पुराव्यानिशीं ते असं सिद्ध करून दाखवणार होते, कीं आम्हां गौडसारस्वत ब्राह्मणांमधील पोट-जाती म्हणून समजले जाणारे सध्याचे हे भेद वास्तविक रीत्या निरनिराळ्या स्वतन्त्र जाती आहेत व त्यांचा एकमेकींशीं कांहींही संबंध नाहीं !—काका अशाप्रकारें इतिहासंशोधक होते, पण ते कधींही तें भुयार पाहायाला गेल्याचें मला आठवत नाहीं. पण तुमचा हा सगळाच प्रकार मुलखावेगळा दिसतो बुवा !" हें शेवटचें वाक्य थट्टेच्या स्वरांत उच्चारून बाबासाहेबांनीं 'खो खो' हंसण्यास सुरवात केली !

इतक्यांत आचाऱ्यानें पानांवर निरनिराळे पदार्थ आणून वाढतांच सांबाऱ्यांतलें एक कालव तोंडांत टाकतां टाकतां, त्यांनीं मंगेशरावांना प्रश्न केला, "कायहो, मुंबईला कालवें मिळतात काय ?" व अशा रीतीनें इतिहाससंशोधनाचा विषय बाजूला राहून, कालवांच्या व शेवट्यांच्या निरनिराळ्या जाती, त्यांची कमी-अधिक रुची, त्यांतील पाचक व शक्तिवर्धक गुण इ० शास्त्रीय माहितीनें भरलेलें त्यांचें व्याख्यान, व त्याच्या आधारें, त्या पदार्थावर विनासंकोच ताव मारण्याबद्दल मधून मधून मंगेशरावांना त्यांचा जोराचा आग्रह, हीं सुरू झालीं !

बऱ्याच वेळानें जेवण आटोपलें व बाबासाहेबांच्या आग्रहाच्या माऱ्यांतून एकदांची सुटका झाल्याबद्दल मंगेशरावांना समाधान वाटलें ! तोंच एका नोकरानें हलवा, काजूचे गर, कातल्या यांनीं भरलेलें ताट आणून मुखशुद्धीसाठीं त्यांजपुढें ठेवलें.

मुखशुद्धीसाठीं काजूच्या गरांचे व हलव्याचे बोकाणे भरतां भरतां बाबासाहेबांनीं एका नोकराला हांक मारून विचारलें, "भोंवंडीला गेलेले लोक परत आले कायरे ?"

" होय, जी ! आज सकाळींच आले." नोकरानें उत्तर दिलें.

तें ऐकून बाबासाहेबांना समाधान झालें व मंगेशरावांकडे वळून ते म्हणाले, "ठीक ! मग या 'मुंबैकर' पाहुण्यांना आज रात्रीं सागुतीचें जेवण देतां येईल ! गांवकरी भोंवडीला गेले कीं, रानडुकराची जांघ तेवढी नेमकी आमच्याकडे यायची हें ठरलेलं ! तुम्ही कांहींही म्हणा, मंगेशराव ! रानडुकराची सागुती पचायला जड म्हणून कोणीं कितीही नांवं ठेवलीं, तरी एक गोष्ट अगदीं उघड आहे ! डुकराच्या जांघेच्या गोडीची सर दुसऱ्या कोणत्याही सागुतीला येणार नाहीं ! सशाची सागुती पथ्याला उत्तम ! कबुल ! पण रुचीच्या बाबतींत मागंच ! हां ! कवड्याची मात्र लज्जत कांहीं और असते ! पण त्या दरिद्री कवड्याचं मांस म्हणजे नुसतं मूठभर ! एक कवडा मारून आणायाचा व चटणीच्या प्रमाणांत सतराजणांच्या पानांवर तो वाढायाचा, हें तुम्हां नाजूक संवयीच्या बारदेशच्या लोकांनाच जुळेल ! आपल्याइकडे तो भिकारीपणा चालायचा नाहीं ! मेजवानीला बोलावलं व असा प्रकार कोणीं केला, तर आपण पान सोडून उठून चालायाला लागूं !—"

"हां, तें बरोबर आहे ! सागुती खावी तर ती तुम्ही इकडच्याच लोकांनीं !" मंगेशराव घाईघाईनें मध्येंच म्हणाले, "पण माफ करा बाबासाहेब ! आजच्या आज पुढचा मुक्काम गांठल्यावांचून राहणें कोणत्याही रीतीनें मला शक्य नाहीं, कारण उद्यां सकाळीं पणजीला जाऊन बोटींत बसणं भाग आहे ! तेव्हां मेहेरबानी करून आपला एखादा नोकर माझ्याबरोबर द्या व तेवढं भुयार मला दाखवण्याची व्यवस्था करा. कारण त्या भुयारांतील एका शिळेवर एक जुना कोरींव लेख असल्याचं मीं ऐकलं आहे ! त्या लेखाचा कागदावर ठसा घेतां

आला, तर माझें एक मोठंच काम झाल्यासारखं होईल. म्हणून आतां ताबडतोब येथून निघावं व तें भुयार पाहून झाल्यावर तेथून परस्पर पुढील मुक्काम गांठावा असं मी ठरविलं आहे. तरी आतां आपला निरोप घ्यायला मला परवानगी द्या ! "

अर्ध्यापाऊण तासाचें अंतर पायीं रखडत जाऊन भुयार पाहण्याच्या, मंगेशरावांच्या निष्फळ बेतापासून, त्यांस परावृत्त करण्यासाठीं व एकदोन दिवस राहून त्यांनीं पाहुणचार घ्यावा, निदान त्या रात्रींचें सागुतीचें जेवण तरी त्यांनीं चुकवूं नये याबद्दल त्यांस आग्रह करण्याचे कामी बाबासाहेबांनीं आपलें सबंध वाक्चातुर्य खर्ची घालून किती पराकाष्ठा केली असेल, याची कल्पनाच केलेली बरी ! पण त्यांत यश न येऊन शेवटीं मोठ्या नाखुषीनें मंगेशरावांचें म्हणणें त्यांस कबूल करावें लागलें, व पाहुण्यांना निरोप देण्यापूर्वी आवश्यक असलेल्या थाटाच्या चहापानाची तयारी करण्याची त्यांनी आंत सूचना दिली.

पण चहा तयार होऊन बाहेर येईपर्यंत इतका वेळ लोटला, कीं बाहेर माडांच्या शेंड्यावर असलेलीं उन्हें जवळ जवळ त्यांच्या बुंधाशी पोहोचलीं ! लवकरच दिवस मावळेल व भुयार पाहाण्याचा आपला हेतू पार पडणें अशक्य होईल, या भीतीनें मंगेशरावांनीं बरेचदां चहाची आपल्याला जरूर नसल्याचें बाबासाहेबांना सुचवलें व चहा घेतल्याशिवाय जाऊं देण्याबद्दल त्यांस गयावयां करून विनंति केली, पण त्याचा कांहींही उपयोग झाला नाहीं.

शेवटीं योग्य वेळीं चहा व त्याबरोबर पांच सहा फराळाच्या पदार्थांचें ताट बाहेर आलें व त्यांचा आस्वाद घेतल्यावर यजमानांकडून पाहुण्यांना निघायाला परवानगी मिळाली. बाबासाहेबांच्या हुकमावरून

दोघेतिघे नोकर हातांत कंदील, चुड्या व काठ्या घेऊन मंगेशरावांबरोबर जावयाला सज्ज झाले होते! पण ओळख कायम ठेवण्याबद्दलचीं व परतभेटीचीं एकमेकांना आश्वासनें देण्याचा व पाहुणचार दिल्याघेतल्याबद्दल परस्परांचे आभार मानण्याचा लांबलचक शिष्टाचार आटोपून मंगेशराव जों वाड्याबाहेर पाऊल टाकणार, तोंच एक विघ्न उपस्थित झालें!

एकाएकीं बाबासाहेबांच्या वाड्याच्या आवारांत पंचवीसतीस माणसांचा एक घोळका घुसला, व त्यांनीं मोठाच गलबला माजवला! तो ऐकून बाबासाहेब घाईघाईनें बाहेर आले. त्या घोळक्यांत आपले बंदे व पुरभय्ये आहेत व त्यांपैकीं कांहींजणांचीं डोकीं फुटून त्यांतून रक्त वाहात आहे व एकदोघे तर बेशुद्ध झाल्यामुळें त्यांस उचलून आणलें आहे असे पाहातांच त्यांचा चेहरा संतापानें लालबुंद झाला व त्यांच्या डोळ्यांतून जणूं आगीच्या ठिणग्याच बाहेर पडूं लागल्या! प्रतिपक्षाला शिव्याशाप देत कांहीं बंद्यांनीं नुकत्याच घडलेल्या घोर प्रसंगाची हकीगत आपल्या धनीसाहेबांना सांगायाला सुरवात केली!

बाबासाहेबांच्या हुकुमावरून त्यांच्या एका भाटांतील जागेत त्यांच्या बंद्यांनीं एक नवीन विहीर खणण्याचें काम चालू केलें होतें. तेथें धाकट्या घरांतील मंडळीनें पठाणांसहित येऊन अडथळा आणला. नंतर दोन्ही पक्षांकडचे लोक हातघाईवर येऊन, त्यांत बाबासाहेबांकडील बंद्यांना व पुरभय्यांना बरीच इजा झाली! हा त्या तपशीलवार हकिगतीचा सारांश होता.

सर्व हकीगत सांगून झाल्यावर एका बंद्यानें एक रक्तानें माखलेला वीत दीडवीत लांबीचा कसल्या तरी धातूचा पत्रा बाबासाहेबांना दाखवला व तो त्वेषानें म्हणाला, "साहेब! हा रक्तानें माखलेला

पत्रा त्यांनीं आज आगळिकीला प्रथम सुरवात केली याला पुरावा आहे ! जमीन खणीत असतां आंत सांपडलेला हा पत्रा आम्हीं बाजूला ठेवून दिला होता. त्यांच्यापैकीं एका पठाणानें तो उचलला व आमच्या बाजूच्या मंडळीपैकीं कित्येकांच्या डोक्यावर त्यानें त्याचे तडाके देण्यास प्रथम सुरवात केली व अशा रीतीनें मारामारीचा प्रसंग आणला ! ”

एवढा वेळ बाजूला स्वस्थ उभे राहून अत्यंत आश्चर्ययुक्त मनानें मंगेशराव हा सर्व प्रकार पहात होते. पण त्या धातूच्या पत्र्याकडे नजर जातांच ते तत्काळ त्या घोळक्यांत शिरले, व तो पत्रा मागून घेऊन नीट निरखून पाहण्यांत ते गढून गेले !

त्यांची ही कृती नुकत्याच घडलेल्या प्रसंगाच्या हकिगतींत खोल शिरण्याबद्दलच्या त्यांच्या उत्सुकतेचेंच द्योतक आहे, अशा समजुतीनें बाबासाहेब त्यांच्याकडे वळले व “ पहा आमच्या या नष्ट्या व खून-मान्या वारसदारांचीं कृत्यें ! ” असे उद्गार काढून दांतओंठ चावीत व तावातावानें बोलत, धाकट्या घरांतल्या मंडळीकडून आतांपर्यंत झालेल्या सर्व अक्षम्य गुन्ह्यांचा त्यांनीं त्यांजपुढें पाढा वाचला व शेवटीं ते म्हणाले, “आतां या गुलामांची मुळींच गय करायाची नाहीं ! एकदांचा या प्रकरणाचा सोक्षमोक्ष लावून टाकलाच पाहिजे ! हा पत्रा व इतर पुरावा उद्यांच्या उद्यां जुबिजांत गुदरतों व करतों प्रोसेस क्रीम ! ”

मंगेशराव वरवर त्यांच्या या बोलण्याकडे लक्ष देत असल्याचें दाखवीत होते, पण वास्तविक त्यांचें मन त्या पत्र्याकडे लागून राहिलें होतें. नीट पाहून झाल्यावर त्यांनीं तो पत्रा परत केला.

बाबासाहेबांच्या वाड्यांत उसळलेलें हें वादळ हळुहळू शांत झालें. डॉक्टरांकडून उपचार करवून घेण्यासाठीं इजा झालेल्या बंद्यांची व

पुरभय्यांची शेजारच्या मोठ्या वस्तीच्या गांवीं रवानगी करण्यांत आली व कोर्टात फिर्याद दाखल करून आजच्या आगळिकीबद्दल प्रतिपक्षाला लवकरच पुरी अद्दल घडवण्यांत येईल, अशीं आश्वासनें बाबासाहेबांकडून मिळतांच मारामारींत भाग घेतलेले इतर इसमही, प्रतिपक्षावर सूड उगवल्यानंतर प्राप्त होणार असलेल्या भावी सुखाच्या आशेनें लाठीच्या तडाक्यांचें आजचें दुःख विसरून जाण्याचा प्रयत्न करीत तेथून निघून गेले!

आगंतुक घडून आलेल्या या गोष्टींत बराच वेळ खर्च झाल्यामुळें भुयार पाहायाला जाण्याचा बेत मात्र मंगेशरावांना आतां मोठ्या कष्टानें रद्द करावा लागला! कारण इतक्यांत सूर्य अस्ताला जाऊन काळोखही पडायाला सुरवात झाली होती! त्यांच्या मनाचा अशा रीतीनें हिरमोड झाल्याबद्दल बाबासाहेबांनीं खेद प्रदर्शित केला!

अखेरीस मंगेशराव पुढील मुक्कामीं जावयाला निघाले. पण जाण्यापूर्वी त्यांनीं एक विलक्षण गोष्ट केली! आपल्या बॅगमधून दऊत, कागद वगैरे वस्तु त्यांनीं बाहेर काढल्या व त्यांच्या साहाय्यानें जवळच पडलेल्या त्या पत्र्याचा त्यांनीं कागदावर ठसा घेतला व नंतर ते बाबासाहेबांना म्हणाले, "शेवटीं मला आपल्याला एक विनति करायाची आहे! आपण हा पत्रा फिर्यादीचा निकाल लागल्यावर कृपा करून माझ्या मुंबईच्या पत्त्यावर पाठवून द्यावा! कारण हा साधा पत्रा नसून ताम्रपट आहे! कोण जाणें! संस्कृतमध्यें यावर कोरलेला हा लहानसा लेख, ऐतिहासिक सत्याचें कोणतें उज्ज्वल रत्न काळाच्या उदरांतून मुक्त करून त्यामुळें मनुष्याच्या ज्ञानभांडारांत भर घालील!"

मंगेशरावांची ही विनंति व त्यांचे हे शब्द बाबासाहेबांना इतके विचित्र वाटले, कीं थोड्या वेळापूर्वी घडून आलेल्या प्रसंगामुळें अजून

कायम असलेल्या त्यांच्या क्षुब्ध मनःस्थितींतही त्यांना हंसूं कोसळल्यावांचून राहिलें नाहीं. पण तें मोठ्या कष्टानें आवरून त्यांनीं मंगेशरावांची विनंति मान्य केली व " अरे आतां भलताच उशीर झाला आहे. त्या सोनाराच्या घरामागील खाऱ्या बांधावरून हातपाटलीच्या शेतांत उतरा व तेथून थेट गांवाबाहेर पडा, म्हणजे गांवांतल्या या लांबलचक हमरस्त्याचा वळसा वांचेल. आणि हें पहा ! हे आपले रानवट गांव ! खांचखळगे, वाघटं, फुरसें, रस्त्यांत काय असेल व काय नाहीं याचा नेम नाहीं ! पाहुण्यांना पुढील मुक्कामापर्यंत नीट काळजीपूर्वक सोबत करा बरं ! " असें आपल्या नोकरांस बजावून आपल्या या पाहुण्याचा त्यांनीं अत्यंत प्रेमळपणानें शेवटचा निरोप घेतला.

बाबासाहेबांच्या हुकमाप्रमाणें त्यांचीं नोकरमाणसें हमरस्ता सोडून मंगेशरावांसह बांधावरून चाललीं होतीं. एकदोन मिनिटांत शेतांतील पायवाट सुरू होतांच एवढा वेळ स्तब्ध असलेल्या मंगेशरावांच्या तोंडून प्रश्न निघाला, " हातपाटलीचं शेत तें हेंच काय ? "

" होय जी ! " मुंबैकर पाहुण्याकडे बोलण्याचा मान सर्वांआधीं स्वतःच्या पदरांत पाडून घेण्यासाठीं हातांत कंदील घेऊन चाललेल्या एका तरुण बद्यानें घाईघाईनें उत्तर केलें. " हेंच हातपाटलीचें शेत ! ह्या बांधापासून तों थेट त्या जांभळीच्या झाडापर्यंत ! सर्द व वांयगण दोन पिकं निघतात ! जगू देसायाच्या मालकीचं हें ! पण आज पांच वर्षं झालीं, गहाण पडलं आहे ! व्याजाचीसुद्धां फेड झालेली नाहीं !"

" तोंड मिट झिलग्या ! " पाहुण्यांशी सलगी करण्याची संधी स्वतःऐवजीं या पोरसवदा बद्यानें साधली, या गोष्टीमुळें चिडून गेलेला बाबासाहेबांचा एक म्हातारा गडी त्याजवर मध्येंच खेंकसला ! " स्वतःला

माहित नसलेल्या गोष्टीसंबंधीं बोलला नाहींस, तर कोण काय तुला सुळीं देताहेत ? आहे कांहीं तुझ्या बोलण्याला सयसुवाद ? म्हणे हातपाटलीचं शेत तें हेंच ! खरंखुरं हातपाटलीचं शेत तें पुढं आहे ! भटणीच्या हातांतील पाटली हरवली ती त्या शेतांत ! या नव्हे ! आणि हें शेत अजून गहाण आहे, म्हणून कोणी रे सांगितलं तुला ? बिचाऱ्या जगु देसायानें पैन पै फेडून शेत सोडवून घेतल्याला झाले गेल्या दसऱ्यांत तीन महिने ?—"

तो त्या बद्यावर आणखीही ताशेरा झाडणार होता, पण मंगेश-रावांची चौकसबुद्धि त्याच्या आड आली.

"म्हणजे ही भटीण कुठली ? व तिच्या पाटलीचा या शेताशीं काय संबंध ?" मोठ्या उत्सुकतेनं त्यांनीं विचारलें.

"साहेब तें असं आहे,—त्या शेतांतल्या त्या लहानशा ओढ्या-जवळ भटणीच्या हातांतील एकदां पाटली हरवली ! फार जुनी गोष्ट ! आमच्या बापदाद्यांवेळची ! आमच्या या गांवच्या देवळांतल्या पुजाऱ्याची ती भटीण बायको ! पहांटेस कोंबडा आरवण्यापूर्वी या शेतांत येऊन दूर्वा वेंचाव्या, हा तिचा नित्यनेम ! पण कोणावर कशी वेळ येईल हें काय सांगतां येतं ? एकदां काय झालं ?—"

पण हातपाटलीच्या शेताची गोष्ट म्हणजे त्या गांवांतल्या कुळवाड्यांच्या ज्ञानकोशाचा सर्वोत्कृष्ट खंड ! मग ती पाहुण्यांना सबंध स्वतःच कथन करण्याचा त्या म्हाताऱ्याचा आप्पलपोटेपणा त्याचे इतर सोबती थोडाच सहन करितात !

"दूर्वा वेंचतां वेंचता त्या पापणीच्या हातांतली एक सोन्याची पाटलीच त्या शेतांतल्या ओढ्यांत हरवली !" त्यापैकीं एकानें मध्येंच तोंड घातलें व कथेचा हा पुढील भाग पाहुण्यांना उतावीळपणानें सांगून टाकला !

" आमच्या फुटक्या नशिबाचे भोग ! दुसरं काय ?" म्हाताऱ्याचा चेहरा बदलला व खिन्नपणानें त्यानें त्यांस उत्तर दिलें. एक दोन क्षण थांबून तो पुढें म्हणाला, " देवपण चाललं आहे ! " पण एवढयानें मंगेशरावांस व्हावा तो बोध झाला नाहीं, हें त्यानें ताडलें व त्यांच्या प्रश्नाचें सविस्तर उत्तर देण्यास त्यानें सुरवात केली !

" नाचणे पाकड खाऊन पांच वर्षं आम्ही अर्धपोटीं दिवस काढले ! आतां यापुढं आणखी पोराबाळांचे व गुरांचे हाल नाहीं बघवत धन्यांनो ! यंदां वाटलं होतं, थोरल्या व धाकट्या धनीसाहेबांमध्यें सलोखा घडून येईस असं ! पण गेल्या आठ दहा दिवसांत झालेले प्रकार पाहिले, म्हणजे ती आतां आशाच नको ! आजूबाजूच्या गांवांतील शेतांतून उमज, दुरो होऊन तास काढणं चाललं आहे ! कुठंकुठं तर सातही नांगरण्या संपल्या ! आणि आमच्या शेतावर येथें छातीभर पाणी आहे तें आहेच ! आतां काय ? वाडवडिलांचं हें गांव व घरदार सोडून चाललों भीक मागत, कुठं वाट फुटेल तिकडे ! कोणी मुरगांवला जाऊन रस्त्यावर खडी फोडतील ! कांहीं पणजीला हमाली करतील ! थोडेजण आपल्या सोयऱ्याधायऱ्यांच्या शेतांवर नोकर म्हणून खपतील ! याहून दुसरी काय गत ? गांव सोडण्यापूर्वी आई हातपाटलाईची आज्ञा घेण्याचं तेवढं काम राहिलं आहे ! तें घेतों एकदांचं आज उरकून ! बाकी देवी निरोप दिल्यावांचून राहाणार नाहीं हें ठरलेलं ! कारण सुरवातीपासून चिन्हं बरीं दिसताहेत ! परवांचे दिवशीं झिलगे भोंवडीवर गेले व आज परत आले ! या गेल्या पांचदहा वर्षांत असं कधीं घडलं आहे कां ? भोंवडीवर गेले कीं, कमींतकमी पांचसहा दिवस उपाशींतापाशीं रानांत वनवास भोगल्याशिवाय सावज हातीं आलं, असं झालंच नाहीं ! कधीं कधीं तर पंधरा पंधरा दिवस भोंवडीवाले रानांत आणि गांवांत साव-

जाविना देवपण खोळंबलेलं! अलीकडे रानांत सावजांचा मागमूसच नाहीं त्याला तरी कोण काय करील? नाहींतर पूर्वी माझ्या आजोबांच्या नेणतेपणीं याच रानांत हत्तींचे कळपसुद्धां पाहायाला सांपडत! पण या खेपेच्या भोंवडीचं काय म्हणे इप्रित? रान काढण्याचाच अवकाश! चार रानडुकर, दोन मेरू, पहिल्या झपाट्यासरशीं सांपडले तडाक्यांत! आतां आज रात्रीं सावजं ठेवायाचीं देवीपुढं! आणि पाहायाचं गाऱ्हाणं घातल्यावर अवसराच्या तोंडून काय शब्द निघतात तें!"

इतक्यांत देवळाच्या दारांतून कोणी मोठ्यानें ओरडला, "या रे, गाऱ्हाण्याला सारे जण!" तें ऐकतांच म्हाताऱ्यानें आपलें बोलणें थांबवलें व "ओळख असूं द्या साहेब या गरिबाची!"

असे शब्द उच्चारून तो घाईघाईनें देवळाकडे वळला.

पुनः एकदां त्या जमावावर दृष्टि फेंकून मगेशरावांनींही वाट चालावयाला सुरवात केली.

× × ×

दोन आठवडे लोटले! या इतक्या थोड्या अवधींत त्या गांवाचें स्वरूप किती झपाट्यानें पालटत चाललें होतें! बांध कोसळल्यापासून गेलीं पांच वर्षें त्या गांवांतील शेतीचा बहुतेक सर्व व्यवसाय बंद पडला असला, तरी पोटासाठीं गांवकऱ्यांकडून होणाऱ्या इतर लहानसहान काबाडकष्टांची गजबज अष्टौप्रहर गांवांत चालू असे. पण ती आतां दरदिवशीं कमी होत चालली. भाजीपाल्याचे व फुलांचे जेथें तेथें पसरलेले लहानलहान मळे वाळून जाऊं लागले. आंबे, फणस, केळी इत्यादि फळझाडांवरील एकूणएक कोवळीं फळेंसुद्धां पाडलीं जाऊन तीं उघडीं बोडकीं दिसू लागलीं. गाईम्हशी, बकरीं, कोंबडीं, कुत्रीं इत्यादि पाळींव जनावरांचा दर पावलागणिक कानांवर येणारा आवाज आतां ऐकूं

येईनासा झाला, व त्यांचें मनोवेधक चलनवलन दिसेनासें झालें. पूर्वी जिकडे तिकडे दिसणाऱ्या गवताच्या गंजी, शेणींचे ढीग, बांबूंच्या व चुडत्यांच्या मोळया आतां हलूं लागल्या. शेणानें सारवलेल्या लहान लहान पण नीटनेटक्या झोंपड्यांचे गांवांत सर्वत्र पसरलेले पुंजके एकामागून एक उठूं लागले. रस्त्यावर, नदीकांठावर, माळावर डोंगर-माथ्यावर ठिकठिकाणीं दिसणारे कुडवाळ्यांचे समाधानी व साधेभोळे चेहरे आतां विरळ होत चालले. सुतारलोहारादि कमबी लोकांच्या झोंपड्यांतील हत्यारांचा नादही आतां बंद पडला. एकंदरींत त्या गांवांतील चैतन्याचा झराच जणूं एकाएकीं आटत चालला !

गांव सोडून जाण्याच्या कुळवाड्यांच्या विचाराला पंधरा दिवसांमागें झालेल्या देवपणाच्या प्रसंगीं देवीची अनुज्ञा मिळाली होती, व " कुठं जाल तिथं माझी तुमच्यावर कृपादृष्टि राहील ! " असें तिनें अवसराच्या तोंडून त्यांस आश्वासनही दिलें होतें ! लक्तरें पांघरून त्या गांवांत शतकानुशतकें वावरत आलेल्या लक्ष्मीचें पाऊल त्या दिवसापासून तेथून हललें ! दररोज गांवकऱ्यांचे लहान मोठे जमाव गांव सोडून जातांना दिसूं लागले व आजतर मागें राहिलेल्या इतर सर्व गांवकऱ्यांचा समुदाय जावयाला निघाला होता !

आपलीं गुरेंढोरें व शेतीचीं आउतें त्यांनीं आसपासच्या गांवांत विकून टाकलीं होतीं. त्यांची राहिलेली मालमत्ता म्हणजे गाडगींमडकीं व फाटक्यातुटक्या चिरगुटांपांघरुणांचीं बोजकीं ! ती त्यांच्या डोक्यावरच दिसत होती ! त्यांची सोबत सोडावयास तयार नसलेलीं बिचारीं कांहीं मरतुकडीं कुत्रीं तेवढीं त्यांच्या पाठोपाठ चाललीं होतीं !

गांव सोडण्यापूर्वी त्या सर्वांची बाबासाहेबांच्या वाड्याच्या आवारांत आज गर्दी जमली !

"धन्यांनों, तुमच्या पेजेवर आजवर हा आमचा पिंड पोसला ! पण यापुढं तुमची सेवा नाहीं आमच्या नशिबीं !" "साहेब, आम्हांला विसरूं नका ! आमची साडेसाती संपली कीं, तुमच्याच पायांकडे धांवत येऊं !" "आमचंच देव खोटं ! त्याला तुम्ही तरी काय करणार !" "कुठं असूं तिथं तुमच्या व तुमच्या मुलांबाळांच्या बरेपणाची खबर देव आम्हांला ऐकवो !" आपल्या धन्याविषयींचें प्रेम, निष्ठा व कृतज्ञता व गांव सोडतांना अंतःकरणांत दाटून आलेलें दुःख, या आपल्या भावना अशा निरनिराळ्या शब्दांनीं व्यक्त करण्याचा प्रयत्न करीत, ते त्यांचा निरोप घेऊं लागले !

जात्या कोमल वृत्तीच्या बाबासाहेबांचें हृदय या प्रसंगीं द्रवल्यावांचून राहिलें नाहीं. "भाऊसाहेबांकडे मिटतें घेऊन बांधाच्या दुरुस्तीची व्यवस्था करतों ! तुम्ही गांव सोडून जाऊं नका !" असे शब्द तर एकदोनदां त्यांच्या ओठांशीं आलेही ! पण समोर ओढयापलीकडे उभ्या असलेल्या 'धाकट्या घरा'कडे दृष्टि जातांच त्यांच्या मनांतील सर्व कोमल विकार दबले जाऊन, त्यावर सूडबुद्धीचें दडपण आलें व त्यांचे ते शब्द ओंठांतल्या ओंठांतच राहिले !

बाबासाहेबांचा वाडा सोडल्यावर गांवकऱ्यांनीं भाऊसाहेबांच्या घरीं जाऊन त्यांचाही अशाच प्रकारें निरोप घेतला व नंतर गांवांबाहेर गेलेल्या बांधावरील पायवाटेकडे ते वळले.

त्यांच्या अनेक पिढयांच्या अभिमानाचें व प्रेमाचें निधान व त्यांच्या ऐश्वर्याची खाण अशा त्या पाण्याखालीं बुडालेल्या अफाट खाजनाचाच तो बांध ! त्यावरून चालतांना त्यांचीं पावलें जड पडूं लागलीं ! डोळे भरून येऊन ते पुनः पुनः डाव्या बाजूच्या त्या विस्तीर्ण तलावाकडे वळूं लागले ! त्यावर जणूं त्यांचा जीव घुटमळूं लागला !

शेवटीं बांधावरील पायवाट संपली. दुःखानें सुस्कारे टाकीत मागें वळून त्यांनीं त्या खाजनाकडे व गांवांत आपल्या झोंपड्या उभ्या होत्या, त्या दिशेकडे एकवार शेवटची दृष्टि फेकली व आतां बांध सोडून ते हमरस्त्याकडे वळणार, तोंच त्यांच्यापैकीं कोणी ओरडला, "अरे, थांबा ! तो बघा, टपालवाल्याचा पोरगा पाण्यांत घसरला !"

"पहा कसं कार्ट, टपालाची पिशवी तशीच पाण्यांत वाहात जाऊं देऊन स्वतः तेवढं बांधावर चढलं !" दुसऱ्या एकाच्या तोंडून संतापाचे उद्गार निघाले. तोंच एक म्हातारा कानउघाडणीच्या स्वरांत म्हणाला, "अरे येसल्या, शिवल्या ! असे बघतां काय ? धनीसाहेबांचीं ना तीं पत्रें ! तें टपालवाल्याचं पोर तर पहा पळालं आपल्या घराकडे !" पण वास्तविक त्याच्या या शब्दांची जरूरच नव्हती. पिशवी पाण्यांत पडलेल्या ठिकाणाहून जवळच बांधावर उभ्या असलेल्या त्यांच्यापैकीं एकानें त्यापूर्वीच पाण्यांत उतरून पोहायाला सुरवात केली होती.

चारपांच कोसांच्या अंतरावरील शहरांत असलेल्या पोष्टऑफिसांतून पत्रें आणून तीं या गांवांत वांटण्याचें काम जवळ जवळ पेन्शनींत आलेला एक टपालाचा शिपाई आज अनेक वर्षे करीत आला होता. बिचाऱ्याचें नशीब थोर म्हणून इतक्या सुखासुखीं होणारी नोकरी त्याच्या वांट्याला आली होती ! त्या सबध गांवचें काय असेल नसेल तें टपाल एकदोन दिवसांआड सवडीनुसार बाबासाहेबांच्या किंवा भाऊसाहेबांच्या बल्कांवावर आणून टाकलें कीं, तो झाला मोकळा ! कारण त्या गांवांत येणारी पत्रें बाबासाहेब किंवा भाऊसाहेब यांशिवाय दुसऱ्या कोणाला असणार ? क्वचित् कधींकाळीं गांवांतल्या इतर कोणाचें त्यांत एखादें पत्र असलेंच, तर त्यासंबधींची बातमी कानावर आल्यावर देशपांड्यांच्या बल्कावांचे कोनेकोपरे धुंडाळून तेथून तें घेऊन जाण्याची जबाबदारी त्या त्या

इसमावरच असावी, अशी परंपरा त्या गांवांत पडून गेली होती. टपालवाल्याची नोकरी अशी सोयीस्कर! मग अलीकडे त्याच्या नऊ वर्षांच्या मुलानें गुरांमागें जाऊं लागण्याइतक्या महत्वाच्या कर्तृत्व-क्षेत्रांत पाऊल टाकल्यापासून थोरल्या किंवा धाकट्या रावसाहेबांच्या घरीं पत्रे नेऊन टाकण्याची ही कामगिरी कधीं कधीं त्यानें आपल्या मुलावरच सोंपवावी यांत आश्चर्य कसलें?

बऱ्याच दूरवर वाहात गेलेली ती पिशवी घेऊन पाण्यांत उतरलेला तो इसम थोड्या वेळानें बांधावर आला. बाबासाहेबांशीं आजवर चालत आलेल्या सेव्यसेवकसंबंधापासून तो कुळवाडी देहानें मोकळा झाला असला, तरी त्या संबंधाचे दीर्घकालीन संस्कार झुगारून देण्यास त्याचें भाबडें व इमानी मन तयार नव्हतें!

"धनीसाहेबांचीं हीं पत्रें पोंहोंचवून हा मी आलोंच तुमच्या मागोमाग." कांबळीनें पिशवीवरील पाणी पुसतां पुसतां तो आपल्या सोबत्यांस म्हणाला व लगेच गांवाकडे वळला.

बाबासाहेब अजून बांधावरून चाललेल्या आपल्या कुळांकडे अस्वस्थ चित्तानें दृष्टि लावून बसले होते! मधून मधून त्यांचे डोळे गांवाच्या निर्जन व ओसाड बनलेल्या आसपासच्या भागांकडे वळत व तेथें पसरलेली स्मशानवत् शांतता पाहून त्यांच्या मनांत चर्र होई!

"या शेंकडों दीनदुबळ्या कुळांच्या पोटावर पाय देण्याच पाप भाऊ-बंदकीमुळं गेलीं पांच वर्षें आमच्याकडून घडलं व आतां तर त्या बिचाऱ्यांस घरादाराला मुकवून देशोधडीस लावण्यास आम्ही कारण झालों आहों! हे आमचे वाडे, ही दौलत या गरिबांच्या पिढ्यानुपिढ्यांच्या काबाडकष्टांवरच उभारली गेली आहे! स्वतः कोंडाभाकर खाऊन व निढळाचा घाम गळवीत उन्हापावसांत खपून यांनीं दरसाल आमचीं

धान्याचीं कोठारें भरल्यामुळेंच आजवर आमच्या घृतकुल्या मधुकल्या यथास्थित चालू राहिल्या व गाद्यागिरद्यांवर आम्हांला लोळतां आलं ! सोनें पिकवणारा गांव अशी आमच्या या जमिनीची आज प्रख्याती आहे, त्याचं श्रेय तरी या कष्टाळू लोकांच्या नांगराशिवाय दुसऱ्या कशाला आहे ? इतकंही असून मानवी कायद्याप्रमाणें या जमिनीवर, शेंकडों वर्षे तिची मशागत करणाऱ्या या रयतेचा कोणताही हक्क नाहीं ! पण ईश्वरी कायदाही असाच असेल काय ? एखाद्याच्या तोंडांतून त्याच्या घामाकष्टांचा, हक्काचा घांस अशा रीतीनें हिरावून घेण्याची ही आमची निर्दयकृति त्या ईश्वरी कायद्याप्रमाणेंही क्षम्य ठरेल काय ? " अशा या विचारांचें त्यांच्या मनांत काहूर माजलें होतें व अनुतापाचे चटके त्यांस बसूं लागले होते !

इतक्यांत बांधावरून परतलेला तो कुळवाडी तेथें येऊन पोहोंचला व टपालाच्या पिशवीसंबंधाची घडलेली हकीगत सांगतां सांगतां ती त्यानें बाबासाहेबांच्या हातीं दिली. अजून आपलें धनीपणाचें नातें इतक्या निष्ठापूर्वक मानणाऱ्या त्या भागेल्याची ही कृती त्यांच्या हृद-यास जाऊन भिडल्यावांचून कशी राहील ?

" आतां पेजेची वेळ झालीच आहे. पेज जेवून जारे म्हादग्या ! " आपल्या खूषमर्जीचें चिन्ह म्हणून ते त्यास सौम्य स्वरांत हे शब्द बोलले, व टपालवाल्याच्या कामचुकारपणाबद्दल त्यास दोनचार शिव्या हंसडून पिशवींतील पत्रें त्यांनीं बाहेर काढलीं. त्यांतील एका पत्रावरील अनोळखी हस्ताक्षराकडे नजर जातांच तें त्यांनीं कांहींशा उत्सुकतेनें प्रथम फोडलें. त्यांतील सुरवातीचा औपचारिक भाग वाचून झाल्यावर पुढील मजकुरावरून जसजशी त्यांची दृष्टि फिरूं लागली, तसतशी त्यांच्या मुद्रेवरील, आश्चर्ययुक्त गांभीर्याची छटा दाटत चालली !

"......आतां या पत्रांतून जी एक महत्त्वाची व आनंदाची गोष्ट आपल्याला कळवायाची आहे, ती आपल्या शेतांत सांपडलेल्या ताम्र-पटासंबंधींची होय! हा ताम्रपट म्हणजे सुदैवानें आपल्या हातीं आलेला इतिहासाच्या खाणींतील एक अमोलिक हिरा आहे! त्या-वरील लेखाचा सुरवातीचा थोडा भाग व मधूनमधून कांहीं ओळी त्यांतील पुसट अक्षरांमुळें नीट लागत नाहींत, पण त्यामुळें त्यांतील एकंदर लिखितार्थाला कांहीं बाध येत नाहीं. आपल्या अवलोकनासाठीं हा संस्कृत लेख त्याच्या भाषांतरासहित याचपत्रीं निराळा लिहून पाठ-वीत आहें. आपले काका एक जाडे इतिहाससंशोधक होते. त्यांची इतिहाससंशोधनाची दृष्टि व विद्वत्ता आपल्यांतही आहे यांत संशय नाहीं. अर्थात् आपल्या गांवांतील खाजन व त्याचा बांध, ग्रामदेवतेचें हातपाटलाय व एका शेताचें हातपाटली हीं नांवें, आपल्या गांवाच्या आसपासच्या रानांत कांहीं वर्षामागें हत्तींचे कळप आढळून येत, या सर्व वस्तुस्थितीशीं या लेखांतील हस्तिनीपट्टणाचा उल्लेख व इतर मज-कूर यांचा आपल्याला सहज मेळ घालतां येईल.

सध्या आपल्या गांवांत जे खेदजनक प्रकार घडत आहेत, अशा वेळींच हा ताम्रपट उपलब्ध व्हावा, हा एक ईश्वरी योगायोगच आहे, हें आपणासारख्या सुज्ञ, सत्प्रवृत्त व थोर सज्जनास सांगणें नलगे!

कळावें, सेवेसी श्रुत होय, हे विनंति.

आ० कृपाकांक्षी

मंगेश सर्वोत्तम साखरदांडे."

पत्रांतील हा मजकूर वाचून संपल्यावर त्यांनीं तें बाजूला ठेवून दिलें, व त्यांत असलेला निराळा कागद त्यांनीं अधीरपणें वाचावयाला सुरवात केली.

......................

" जातः श्रीनरवर्मेति
करैरानंदयञ्जगत् ॥
यश्चालुक्यं निजे राज्येऽ-
स्थापयद्विजितालुपः ॥
कदंबितकदंबोऽलं–
कृतार्थी कृतवान्प्रभुः ॥
शौर्यश्रीपरिरं विश्रमभुजो-
द्दंडः प्रचंडोद्यमः
चंचच्चंद्रमरीचिनिर्मलयशः–
पुंजैर्जगद्राजयन् ॥
चक्रे गोपकपट्टने स्थिरपदं

......................

[" स्वकरांनीं जगताला आनंद-विणारा नरवर्मा जन्माला आल्या-वर त्यानें कदंबांना एकत्र करून व अलुपाला जिंकून, चालुक्याची (म्हणजे आपल्या सार्वभौमाची) त्याच्या राज्यावर स्थापना केली व स्वतः अत्यंत यशस्वी राजा झाला. प्रचंड उद्यमशीलता हेच ज्याचे बाहू होते व जे शौर्य-श्रीनें आपलें विश्रांतिस्थान व क्रीडास्थान केलें होतें, भ्रमण करणाऱ्या चंद्राच्या निष्कलंक किरणांप्रमाणें आपल्या निर्मल कीर्तिप्रभेनें जो जगास शोभवी, ज्यानें आपल्या गोवेनगरास ( गोपकपट्टनास ) स्थैर्य आणलें,

......................

तस्मादप्युदगाद्दिवोदितरवि-
र्मोद्यन्महीपद्मिनीम् ॥
आशापूर्तिकरैः करैः स विजया-
दित्यः समानंदयन् ॥

आपल्या आशापूर्णकारी हस्तरूपी किरणांनीं पृथ्वीरूपी कमलिनीस आनंदित करणारा विजयादित्यरूपी सूर्य त्याच्यापासून उदय पावला.

......................

सदनंतवीरविक्रम—
कदंबकादंबसंपदां धाम्नः ॥

......................

ज्याच्या ठिकाणीं अनेक श्रेष्ठ योद्धयांची शक्ति एकवटली आहे,

तदनंतवीरविक्रम—
नरसिंह इति विबुधैकसन्नाम्नः॥
विलोक्य परितः सर्वान् ।
चरतो द्विपयूथकान् ॥
तत्रैव स्थापयामास ।
हस्तिनीपट्टनं मुदा ॥

जो कदंब असून कदंबांच्या संपत्तीचें माहेरघर आहे, असा तो राजा अनंतवीरविक्रमनरसिंह असें बिरुद विद्वानांकडून मिळविता झाला.

सभोंवतालीं सर्वत्र हत्तींचे कळप फिरत असलेले पाहून मुदित होऊन त्यानें हें हस्तिनीपट्टण या ठिकाणीं वसविलें.

........................

सततं सरितः पूराद्
बन्धभंगवशात्कृषिः ॥
पीड्यते देवताक्षोभ-
निदानोऽयमुपप्लवः ॥
तन्निरासाय तत्रत्यैः
सर्वैः कृषिवलैर्ध्रुवम् ॥
प्रत्येकस्मात्कुलादेको
बलिः कृच्छ्रात्समर्प्यते ॥
ततः सा क्षेत्रिया भूमिः
निराबाधं स्थिराभवत् ॥

........................

देवतेचा क्षोभ झाल्यामुळें नदीप्रवाहानें येथील बांध नेहमीं कोसळून पडून शेतीची नासाडी होई. या आपत्तीच्या निरासासाठीं येथील सर्व शेतकऱ्यांनीं आपापल्या कुटुंबांतील एक एक इसम (देवीस) बळी दिला. तेव्हांपासून ही शेतजमीन निराबाध रीतीनें लागवडीस आली.

विश्रुत्य तेषां कृषिभूमिभक्तिं
मुदा युतो भूमिपतिः कदंबः ॥
यावत्सुधांश्वर्कमहं महीं ददे
भूमीन्दुवेदाधिकभूमितेऽब्दे ॥

त्या लोकांची शेतजमिनीवरील ही भक्ति ऐकून संतुष्ट झालेलों मी (विजयादित्य) कदंबभूमिपति शके १४११ या वर्षीं, ही भूमि यावच्चंद्रदिवाकरौ त्यांस दान देत आहें.

सामान्योयं धर्मसेतुर्नृपाणां
काले काले पालनीयो भवद्भिः ॥
सर्वानेतान्भाविनः पार्थिवेंद्रान् ।
भूयो भूयो याचते रामभद्रः ॥

स्वदत्तां परदत्तां वा ।
यो हरेत वसुंधरां ॥
षष्टिर्वर्षसहस्राणि ।
विष्टायां जायते कृमिः" ॥

स्वतः किंवा दुसऱ्यानें दान दिलेली ( एखाद्याची ) भूमि जो हरण करतो, तो साठ हजार वर्षें विष्टेत कृमि होऊन पडतो, असा धर्मनियम राजेलोकांसाठीं आहे व तो प्रत्येक काळीं तुम्ही पाळावा, असें सर्व श्रद्धावंत सार्वभौमांस (दाशरथि) रामचंद्र वारंवार विनवून सांगतो."]

ताम्रपटावरील हा सबंध लेख वाचून झाल्यावर त्यांच्या चेहऱ्यावर लाली आली ! त्यांच्या भुवयांना मुरड पडली. बल्कांवावर व आंतील चौकीवर त्यांच्या एकसारख्या येरझाऱ्या सुरू झाल्या !

अंमळशानें त्यांनीं तो कागद पुनः वाचावयाला सुरवात केली. एकदां, दोनदां, तीनदां त्याचें पारायण केलें !

"प्रत्यक्ष प्रभु रामचंद्राचा हा आदेश ! आजवर या भरतखंडांत अनेक महान् सम्राट व सार्वभौम होऊन गेले ! कैक युद्धे झालीं ! परचक्रें आलीं ! पुनःपुनः रक्ताच्या नद्या वाहवून त्यांनीं परस्परांचीं राज्यें व साम्राज्यें बळकावलीं ! पण त्या पुण्यश्लोक दाशरथी रामानें घालून दिलेल्या या एका धर्मनियमाचें तेवढें त्यांपैकीं कोणीही उल्लंघन केलें नाहीं !... वंशानुवश हातांत नांगर धरून खपणारे हे शेतकरी, हींच भूमातेचीं खरींखुरीं लेंकरें ! त्यांस तिच्या कुशीवरून दूर करण्याचें जें पाप करण्यास ते सर्वसत्ताधारी सार्वभौमही धजले नाहींत, तें केवळ दोनतीन पिढ्यांचीच या खाजनावर मालकी असलेला, माझ्यासारखा एक क्षुद्र

जंतु आज निःशंकरीतीनें करीत आहे !...त्या धर्मात्म्याकडून, महाभाग कदंब राजाकडून दान मिळालेली भूमी जे आज पांचशें वर्षं निर्वेध रीतीनें उपभोगीत आले, तिचा त्यांजपासून क्षुल्लक स्वार्थासाठीं अशा रीतीनें माझ्याकडून अपहार व्हावा ना !......मंगेशराव लिहितात त्याप्रमाणें हा ईश्वरी योगायोगच नव्हे तर काय ? माते हातपाटलाई, तूं हा ताम्रपट या ऐनवेळीं पाठवून या पाप्याच्या डोळ्यांत चांगलेंच अंजन घातलेंस ! या उप्परही तुझा हा इषारा मी मानला नाहीं तर—हरहर ! ती कृमियोनीच माझ्या कपाळीं यायची !"

अशा प्रकारें बाबासाहेबांच्या जागृत झालेल्या विवेकबुद्धीनें त्यांच्या मनाचा आतां पूर्णपणें कबजा घेतला !

"म्हादग्या !" बऱ्याच उंच चढलेल्या आवाजांत त्यांनीं हांक मारली !

बिचाऱ्या म्हादग्याची जन्माची पेज घालवायाला त्याचे धनीसाहेब कारण झालेले ! पण नुकत्याच त्यांजकडून मिळालेल्या एक वेळच्या पेजेच्या आमंत्रणाबद्दल त्यांच्या औदार्याचें कौतुक करीत तो आनंदांत गर्क होऊन गेला होता ! बाबासाहेबांची हांक ऐकतांच तो झटकन् अदबीनें पुढें आला.

"आत्तांच्या आतां येथून निघ, जा !" क्षुब्ध स्वरानें ते म्हणाले !

म्हादग्याचा चेहरा खर्रकन् उतरला ! त्यानें खालीं मान घातली ! एकाएकीं धनीसाहेबांची अशा रीतीनें गैरमर्जी झाल्याबद्दल त्याच्या मनांत लगेच दुःखाची लाट उसळली !

"शक्य तितक्या जलद जा ! व आज येथून निघालेल्या एकूण एक गांवकऱ्यांना गांठून माघारीं घेऊन ये ! म्हणाव आजपासून थोरल्या व धाकट्या घरांमधली दुही मिटली ! आठ दिवसांच्या आंत बांधाची

दुरुस्ती होईल, व येत्या पुनवेच्या आंत नांगरणीसाठीं खाजन तुम्हांला मोकळ होईल !"

धनीसाहेबांचे हे शब्द म्हणजे म्हादग्याला स्वप्नच वाटलें ! बराच वेळ तो आश्चर्यानें त्यांच्या तोंडाकडे पाहात पुतळयासारखा स्तब्ध उभा होता !

"अरे !! अजून अजागळासारखा येथेंच काय उभा राहिला आहेस ? " ही बाबासाहेबांची गर्जना व त्या मागोमाग त्यांच्या खूष-मर्जीतल्या माणसांना नेहमीं मिळणारी त्यांची 'बटकीच्या !' ही शिवी कानांवर आदळतांच तो भानावर आला !

बल्कांव सोडून त्यानें बाहेर धूम ठोकली ! गांवकऱ्यांचा जमाव केव्हांच दोनचार मैलांच्या अंतरावर पोंचला असला, तरी त्यांच्या नांवानें एकसारखा हांकांचा सपाटा चालू ठेवून तो बांधावरून तीरासारखा पळत सुटला होता ! आनंदवाचक शब्दप्रतिशब्दांचे व वचनांचे थवेच्या थवे त्याच्या ओंठांबाहेर पडत होते ! एखाद्याला वाटलें असतें, त्याला हर्षवायूचाच झटका आला असावा !



# महापुराची शिकवण

सांतुशणे व पावलु-द-सा या दोघां शेजाऱ्यांमध्यें उत्पन्न झालेल्या बखेड्याची बातमी जेव्हां बाहेर फुटली, तेव्हां प्रथम ती कोणासही खरी वाटेना ! पण कांहीं दिवसांनीं प्रत्यक्ष त्या दोघांच्या तोंडूनच गांवांतल्या चव्हाट्यांवर एकमेकांची नालस्ती होऊं लागून तिला पुष्टि मिळतांच तिच्यावर विश्वास ठेवण्यावांचून लोकांना गत्यंतर नव्हतें ! सबंध फुलगांवांत तो एक मोठाच कुतूहलाचा व विस्मयाचा विषय होऊन बसला ! आणि साहजिकच आहे ! त्या दोघांचींही घराणीं फुलगांवांत इतकीं प्रतिष्ठित व खानदानीचीं म्हणून नाणावलेलीं होतीं कीं, कोमुनिदादींतील उलाढाली असोत, गांवांतल्या कज्जेकफायती असोत, भाटकारांमुणकाऱ्यांमधील बेबनाव असोत किंवा एखाद्या गांवकऱ्याच्या घरीं उद्भवलेली बरीवाईट कौटुंबिक भानगड असो, तेथें सांतुशणे व पावलु-द-सा यांच्या सल्ल्याशिवाय पान हलावयाचें नाहीं, अशी त्या गांवांत स्थिती होती. शिवाय सांतुशणे हा हिंदु व

पावलु-द-मा हा क्रिस्तांव असला, तरी त्या दोघांच्याही कुटुंबांमध्यें पिढयानुपिढया इतका जिव्हाळयाचा घरोबा व सलोखा चालत आलेला होता कीं, त्यांमध्यें कधींकाळीं बिघाड येईल, अशी कोणीं कल्पनाही केली नसती. तशांत इतक्या भक्कम पायावर उभारला गेलेला या दोघां शेजाऱ्यांमधील स्नेह ढांसळण्यास कारण झालेली गोष्ट तरी किती क्षुल्लक !

सांतुशणेचा भाचा सोनू हा या भांडणाचें मूळ ! केवळ सोळा सतरा वर्षांचा कोंवळा पोर ! पण आजोळीं येऊन दोनचार दिवस झाले नाहींत, तोंच त्यानें ही एवढी आग पेटवली !

पण एका अर्थीं सोनू म्हणजे कांहीं सामान्य व्यक्ति नव्हती. त्याचें घर 'गोव्यांतलें पुणें' म्हणून प्रसिद्ध असलेल्या एका मोठ्या शहरांत असल्यामुळें, तेथील वाचनालयें, व्याख्यानमाला, सार्वजनिक विषय-चर्चेचे अड्डे इ० गोष्टींच्या लाभानें विविध प्रकारचें अर्धेकच्चें ज्ञान डोक्यांत कोंबलें जाऊन अकालपांडित्य प्राप्त झालेल्या शहरांतील तरुण मुलांचा तो एक उत्तम नमुना होता. लागोपाठ स्थापन होऊन लयाला गेलेल्या विद्यार्थ्यांच्या पांचसहा 'संघां'ची व 'मंडळां'ची चिटणिशी त्याला लाभली होती. इतकेंच नव्हे तर अलीकडे शहरांत भरणाऱ्या बऱ्याच स्थानिक सभा व व्याख्यानांमधून अनुमोदक, सूचक व आभारक होण्याचा मानही त्यास हळुहळू मिळू लागून एक होऊं घातलेला 'दे० भ०' म्हणून त्याची सर्वांकडून चहा होऊं लागली होती !

या सर्व गोष्टींचा परिणाम अर्थात् असा झाला कीं, असा एकही राजकीय, धार्मिक किंवा सामाजिक प्रश्न नव्हता कीं, त्याचें संपूर्ण ज्ञान स्वतःस झालें आहे, असे त्यास वाटत नसे !

विशेषतः गेले कित्येक महिने उत्तर हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं झालेल्या हिंदुमुसलमानांमधील दंग्यांसंबंधींचीं वर्तमानपत्रांतून आलेलीं

वर्णनें व लेख वाचल्यापासून 'परधर्मीयांचें हिंदुधर्मावरील आक्रमण' हा विषय त्याच्या फारच जिव्हाळयाचा बनला होता. कोठेंही क्रिस्तांवांची एखादी धार्मिक मिरवणूक, एखादें चर्च किंवा नुसता एखादा काळा डगलेवाला पाद्री दृष्टीसमोरून गेला कीं पुरे! गोव्यांतील हिंदु-क्रिस्तांवांमधील परस्परसंबंधांचें हृदयद्रावक दृश्य आजूबाजूच्या श्रोत्यांपुढें उभें करण्यासाठीं सोनूचें मग आवेशयुक्त वक्तृत्व सुरू झालेंच! ब्रिटिश महाराष्ट्रांतील कांहीं ठराविक वर्तमान पत्रांतील हिंदुमुसलमानांच्या प्रश्नासंबंधीं येणारे लेख त्यानें इतके आत्मसात् करून घेतले होते कीं, कोणत्याही घटकेला अशा वक्तृत्वाला लागणारी सामुग्री त्याच्या जिभेवर अगदीं तयार असे. फक्त त्या लेखांतील 'मुसलमान' या शब्दाऐवजीं 'क्रिस्तांव' या शब्दाची योजना करण्याची त्यास खबरदारी घ्यावी लागे एवढेंच!

फुलगांवांत आल्यापासून तर आपल्या या आवडत्या विषयावरील सोनूच्या वक्तृत्वास फारच ऊत आला! गोव्यांतील शहरांमधील हिंदु व क्रिस्तांव या समाजांत राजकीय क्षेत्रांतील स्पर्धेमुळें व क्रिस्तावांच्या प्राश्चात्य धर्तीच्या राहाणीमुळें जो परस्परांविषयीं विषमभाव व थोडाबहुत अलगपणा दिसून येतो, तो त्या कारणांच्या अभावीं फुलगांवासारख्या खेडेगांवांत अस्तित्वांत असणें शक्य नव्हतें. अर्थात् तेथें या दोन्ही समाजांमध्यें आढळून येणारें आपुलकीचें दळणवळण म्हणजे हिंदुसमाज स्वतःवर ओढवून घेत असलेलें मोठेंच अरिष्ट असें सोनूला वाटावें व 'भयाचें बिगूल' वाजवून तेथील हिंदूंना जागवण्यासाठीं व त्यांना आक्रमणशील बनवण्यासाठीं त्यानें चंग बांधावा यांत नवल नाहीं.

सांतुशणैच्या घरीं बल्कांवांवर दररोज गांवांतील बरीच वृद्ध मंडळी संध्याकाळच्या वेळीं शिळोप्याच्या गप्पांमध्यें घटकाभर मन रिझवण्या-

साठीं जमत असे. आजवर आपल्या विद्वान नातवाच्या पांडित्याचीं ज्याच्या त्याच्याकडे केलेलीं वर्णनें कशीं खोटीं नाहींत, हें दाखवण्या-साठीं केव्हां एकदां त्याच्या ज्ञानाचें व हुषारीचें या मंडळीमध्यें प्रदर्शन करीन असें सांतुशणेंस झालें होतें. त्यामुळें या बैठकीमध्यें सोनूचा प्रवेश व्हावयाला मुळींच उशीर लागला नाहीं. एक दोन दिवसांतच तेथील श्रोतृसमुदायावर त्यानें आपली बरीच छापही बसवली व त्याचीं आपल्या ठराविक आवडत्या विषयावरील व्याख्यानें हा एक या बैठकींतील महत्वाचा दैनिक कार्यक्रम होऊन बसला.

उज्ज्वल आर्यसंस्कृति, सनातन हिंदुधर्म, धर्मवेडे मुसलमान व पोर्तुगीज, वास्कोदगामा, झेजुइट्स, इन्किझिशन्, अवरंगजेब, झिजीया-कर, स्वामी दयानंद, आर्यसमाज, हिंदु हुतात्मे अशा निरनिराळ्या महत्वाच्या मुद्यांवरील त्याचें जळजळित वाक्पांडित्य ऐकण्यांत त्याचे श्रोते इतके तल्लीन होत कीं, एखादे वेळेस गुडगुडी ओढणेंसुद्धां ते अजिबात विसरून जात !

पण हिंदुधर्मावरील त्याचीं प्रवचनें दररोज तल्लीनतेनें ऐकावीं ! गामानें केलेल्या हिंदूंच्या प्राणाहानीचीं व दिओग रुद्रीगिश्नें जमिनीला मिळव-लेल्या देवळांचीं हृदयभेदक वर्णनें त्याच्या तोंडून ऐकून दुःखनिश्वास सोडावे ! 'हिंदु तितका मेळवावा । विधर्मी तितुका लाथाडावा ।' या सूत्रावर, किंबहुना या सूत्राच्या उत्तरार्धावरच आधारलेल्या त्याच्या उपदेशाला माना डोलवाव्या ! मात्र सांतुबाबाच्या बल्कांवांवरील बैठक बरखास्त होऊन घराकडे वळतांच वाटेंत पावलूच्या व आजूबाजूच्या आणखी दोघांतिघां क्रिस्तांव शेजाऱ्यांच्या बल्कांवांवर आळीपाळीनें थारवून पाहुणचारादाखल त्यांजकडून मिळणाऱ्या शंतांच्या विडीचें बोटांच्या पकडींत न राहाण्याजोगें थोंटूक होईपर्यंत परस्परांच्या दैनिक सुखदुःखांचा, नित्याच्या जिगरदोस्तीच्या सलगीनें खल करण्याच्या

कामीं चुकूनही खंड पडूं देऊं नये, असा उपड्या घागरीवर पाणी हाच या वृद्ध मंडळीच्या बाबतींत सोनूला अनुभव आला !

अखेरीस फुलगांवांतील लोक हिंदुधर्माच्या लढ्याचें महत्कार्य शिरावर घेण्यास कितपत तयार आहेत, ही गोष्ट एकदांची घसास लावून पाहाण्याच्या इराद्यानें एक दिवस त्यानें हा प्रश्न मोठ्या कळकळीनें पण रोखठोक त्यांजपुढें मांडला, व गोव्यांतील हिंदुसमाजानें या पुढें बेसावध न राहतां ख्रिस्त्यांविरुद्ध चढाईचें धोरण स्वीकारणें कसें अवश्य आहे, याचें मुद्देसूद प्रतिपादन करून फुलगांवकरांनीं इतर ठिकाणच्या हिंदुसमाजाला या बाबतींत धडा घालून देण्याचें श्रेय घ्यावें, अशी आपल्या श्रोत्यांस आग्रहाची विनंति केली !

येथवर मजल आल्यावर मात्र त्यांपैकीं कित्येकांस बराच पेंच पडला ! एकदोघांनीं कशी तरी वेळ मारून नेण्यासाठीं त्याच्या म्हणण्याला नुसती मान तुकवली ! कांहीं जणांनीं ती गोष्ट हंशावारी नेण्याचा प्रयत्न केला ! एका धूर्त इसमानें, "सोनूबाबाच्या उपदेशाप्रमाणें आपण सर्वांनीं अवश्य वागलें पाहिजे ! नाहींतर हिंदुधर्मांत जन्मल्याचें काय सार्थक ! सध्यां बरसातीचे दिवस जवळ आले आहेत. लोकांना फुरसत नाहीं. पण हे दोनतीन महिने जाऊं द्या, कीं दसऱ्याच्या मुहूर्तावर करूं या पवित्र कार्याला आरंभ ! देऊं बार उडवून !" इ० गोड शब्दांनीं या त्याच्या सूचनेची बोळवण केली. पण त्यांच्यामध्यें फटकळ तोंडाचा एक खमंग म्हातारा निघालाच ! ब्रिटिश हिंदुस्थानांतील हिंदुमुसलमानांप्रमाणें गोव्यांतील हिंदुक्रिस्तावांमध्यें तंटेबखेडे झाल्याचें किंवा तेथील मुसलमानांप्रमाणें येथील क्रिस्तांवाकडून हिंदूंवर अत्याचार झाल्याचें एकही उदाहरण आपल्या संबंध हयातींत घडलें नसल्याचें त्यानें ठांसून सांगितलें ! आजवर आपले वाडवडिल क्रिस्तांवांशीं गुण्यागोविंदानें वागत

आले, तोच कित्ता पुढें गिरवण्याचा आपला निश्चय व्यक्त केला ! व सोनूच्या त्या उपदेशावर पढतमूर्खत्वाचा शिक्का मारून लहान तोंडीं मोठा घास घेणाऱ्या 'अलीकडच्या पोरांत' तुच्छतापूर्वक त्याची गणना केली !

स्वतःचा व विशेषतः स्वतःच्या उच्च तत्त्वांचा अशा रीतीनें एका जुन्यापुराण्या गांवढळाकडून झालेला हा उपमर्द सोनूस थोडाच सहन होतो ! त्याच्या अंगाचा तीळपापड उडाला ! वादविवादाच्या आखाड्यांत उतरण्याचें त्यानें आपल्या प्रतिस्पर्ध्यास आव्हान दिलें ! पण तें स्वीकारण्याचें त्या भ्याड म्हाताऱ्याला कमचें धैर्य होतें ! सोनूच्या तान्ह्या वयांत एकदां त्याला कडेवर घेतल्यावेळीं आपलें परीटघडीचें उपरणें त्यानें घाण केलें होतें, त्याचप्रमाणें दुसऱ्या एका वेळीं कांहीं खोडी केल्याबद्दल आपण त्याचा कान पकडला होता, इ० त्याच्या लहानपणीच्या संस्मरणीय गोष्टींच्या आधारें सिद्ध केलेल्या आपल्या वयाच्या श्रेष्ठत्वाची ढाल पुढें करून त्यानें सोनूशीं थोडावेळ बाचाबाची तेवढी केली व नंतर सांतुशेणच्या बल्कांवांवरून मागता पाय घेऊन शेजारच्या पावलूच्या बल्कांवाचा आश्रय घेतला !

झालें ! त्या दिवसापासून सोनूची बालंबाल खात्री झाली कीं, वठलेल्या झाडांच्या या जुन्या खोडांना कितीही पाणी घातलें, तरी त्यांना पालवी फुटणें अशक्य ! हिंदुधर्माचें भवितव्य अशा नेभळट बुड्ढ्यांवर अवलंबून ठेवणें ही घोडचूक होय ! याकामीं आजच्या बालपिढीमध्यें तेजस्वितेचें बीजारोपण करणें हा एकच उत्तम मार्ग ! कारण तेच समाजाचे भावी आधारस्तंभ ! त्यांतूनच हिंदुत्वाची दिव्य पताका जगभर मिरविणारे उद्यांचे धर्मवीर निर्माण व्हावयाचे !

दुसऱ्या दिवसापासून सोनूनें आपलें कार्यक्षेत्र बदललें ! बल्कांवांवरील अड्ड्याला कायमचा रामराम ठोकून, यापुढें घराच्या चौकीवर,

अंगणांत व घरासभोंवतालील भाटांत धांगडधिंगा घालणाऱ्या आर्य-कुमारांमध्यें त्यानें आपलें प्रचारकार्य सुरू केलें !

हिंदुधर्माचा दिव्य संदेश त्यांच्या मनावर ठसवण्यासाठीं नव्या जोमानें त्यानें त्यांजपुढें आपल्या व्याख्यानांची फेर झाडतांच त्यांचा प्रभाव या खेपेस लगेच प्रत्ययास आला. ज्यांचे आदर्श, कल्पनेच्या सहाय्यानें त्यांस इष्ट तो नवा घाट देऊन सोनु आपल्या वाणीनें रंग-वीत असे, ते इतिहासकालीन व वर्तमानकालीन हिंदु हुतात्मे या फुलगांवकर कुमारांच्या अंगांत संचरण्यास फारच थोडा अवधि पुरेसा झाला !

दोन तीन दिवस लोटले. एके दुपारीं सोनूचे दहा अकरा वर्षांचे मामेभाऊ भिमू व बाबलू व शेजारचे इतर बालश्रोते त्याच्याभोंवती गोळा होऊन विजापूर शहरांतील मुसलमान कसायाचें डोकें उडव-णाऱ्या बालशिवाजीचें आख्यान मोठ्या उत्सुकतेनें श्रवण करीत होते ! तें ऐन रंगांत आलें आहे, इतक्यांत त्यांच्याच वयाचा शेजारच्या पावलूचा नातु सांतान हा धांवत धांवत तेथें आला. जेमतेम ढुगण झांकणाऱ्या एका आंखूड विजारीशिवाय त्याच्या अंगावर कांहींही नव्हतें. दिसेल न दिसेल, अशा एका पातळ थराशिवाय त्याच्या संबंध डोक्यावरील केंस साफ कापलेले असल्यामुळें त्याचा जणूं गोटाच केल्यासारखा दिसे. त्याच्या निमगोऱ्या कातडीवर खुलून दिसणारी एक ठळक वस्तु म्हणजे त्याच्या गळयांतील सोन्याची सांखळी व तिच्यामध्यें गुंफलेला हस्तिदंती खुरीस. सुताच्या टोंकाला बांधलेलें एक फुलपांखरू आज त्याच्या हातीं होतें व आपले क्रिस्तांवी हेल काढून त्यानें तोंडानें एकसारखी वटवट चालविली होती. त्याजकडे दृष्टि जातांच सोनूची वृत्ति एकदम गरम झाली. त्यानें आपलें भाषण थांब-वलें व त्याजवर डोळे वटारले !

पण सांतान तेवढयाला थोडाच डरतो ! दुपारच्या वेळीं सांतुशणैच्या चौकीवर येऊन भिसू व बाबलू यांजबरोबर यथेच्छ धिंगाणा घालण्याचा त्याचा गेल्या कित्येक वर्षांचा वहिवाटीचा हक्कच होता ! तेथें आल्यावर त्याला एकच निर्बंध पाळावा लागे ! तो हा कीं, खेळतांना भिसू व बाबलू यांना शिवून त्यांचे कपडे ओवळे करावयाचे नाहींत ! पण तो त्याच्या इतका अंगवळणीं पडला होता कीं, खेळांत क्वचित् येणारा एखादा हातघाईचा प्रसंग सोडल्यास, हा निर्बंध त्याजकडून कधींही मोडला जात नसे !

सांतुशणैच्या चौकीवर आज नेहमीहून जास्त सोबत्यांचा जमाव पाहून त्याला अधिकच हुरूप आला ! आपल्या हातांतील नवलाईची गंमत दाखवून त्या सर्वांचा तांडा स्वतःभोंवतीं गोळा करण्याच्या हेतूनें त्या फुलपांखरांसहित गिरक्या घेत व तोंडानें वेडचा आवाज काढीत त्यानें एकसारखा नाचण्याचा सपाटा चालवला !

आतां मात्र सोनूचा संताप आवरेना ! "पाहा ! या शिखानष्टांना लहानपणापासून किती दुष्ट वळण ! हींच कार्टी मोठीं झाल्यावर गोमातेच्या मानेवर सुरी ठेवायचीं ! पाहा ! पाहा ! त्या प्राण्याचा कसा छळ चालवला आहे ! कशाला हवीं आहे या क्रिस्तांव पोरांची आम्हां हिंदूंच्या घरीं एवढी सलगी ! द्या हांकलून त्या शिंच्याला !" तो त्वेषानें बोलला !

भिसू, बाबलू व त्यांचे इतर सोबती सांताननें आणलेलें फुलपांखरूं तेथें असलेल्या सर्वांच्या समाईक मालकीचें ठरवावें असा त्याजपुढें ठराव मांडण्याच्या विचारांत होते; कारण फुलपांखरें पकडणें हा त्यांचाही एक आवडीचा व्यवसाय होता !

पण सोनूचे शब्द कानीं पडतांच ते भानावर आले ! त्यांच्या अंगचें हिंदु रक्त उसळून आलें ! सांतानला न शिवण्याची खबरदारी

घेऊन सारेजण त्याजवर तुटून पडले! आपल्या सोबत्यांचा स्वतःवर झालेला हा अनपेक्षित गहजब पाहून सांतान बिचारा इतका घाबरून गेला कीं, तेथून पळून जात असतां भान न राहून भिसूला त्याचा धक्का बसला.

"सांतान शिवला! भिसूला शिवला!" सर्वांनीं एकच गिल्ला केला!

"आज शिवला, उद्यां तुमच्या तोंडांत मांस आणून कोंबील पोरांनों!" संतप्त झालेल्या सोनूच्या तोंडून हे धिःकारयुक्त शब्द निघाले!

या शब्दांचा योग्य तो सुपरिणाम लगेच घडून आला. भिसूनें थाडदिशी सांतानच्या थोबाडींत लगावली! इतरांनींही त्याजवर सोडणें, ढलप्या, खडे इ० हाताशीं मिळेल त्या अस्त्रांचा वर्षाव केला! सांताननें एक दोन शेलक्या शिव्या उच्चारून रडत ओरडत आपल्या घराकडे धूम ठोकली. वीरश्रीच्या भरांत भिसूनें त्याचा पाठलाग चालवला. पण आपल्या घराच्या हद्दींत पोहोंचतांच सांताननें उलट खाली व जवळच पडलेलें एक हाडूक उचलून त्यानें त्वेषानें भिसूवर फेंकलें. नेम चुकून हाडूक भिसूवर न बसतां जवळच असलेल्या विहिरींत पडलें.

सांतुशणैच्या घराचें परसूं व पावलूच्या घराची बाग हीं एकमेकांना भिडलेलीं असून त्या दोहोंच्यामध्यें ही विहीर होती व दोघेही शेजारी अनेक पिढ्या समाईक मालकीनें या विहीरीचा उपयोग करीत आलेले होते.

सांताननें फेंकलेलें हाडूक भिसूवर बसलें असतें तर त्याला स्नान करावयाला लावण्यापलीकडे त्या गोष्टीचा परिणाम गेला नसता! पण तें विहिरींत पडल्यामुळें त्याच्या या कृत्याला भयंकर अत्याचाराचें स्वरूप प्राप्त झालें!

"सांताननें विहिरींत डुकराचें हाड्क टाकलें !" केसूनें परत जाऊन आपल्या गोटांत ही बातमी जाहीर करतांच तेथें मोठीच खळबळ उडाली !

"क्रिस्तांवांनीं विहिरींत हाडकें व पावबिस्कुटें टाकून तुम्हांला बाटवायचं व तुम्ही शेळपट हिंदूंनीं नुमतं रडत बसायचं हा पूर्वापार चालत आलेला क्रमच आहे !"

सोनूनें आवेशानें हातवारे करीत आपल्या अनुयायी वर्गावर तिरस्कारयुक्त नजर फेकली व त्यांना टोमणा दिला.

किंचित् खजिल होऊन, पण रागानें दांत ओंठ चावीत भिसू, बाबलू व इतर कांहींजण उत्तरले, "वाः ! सांतानला आम्ही तसा सोडतों का ! लेकाला घालूं या आपल्या घराबाहेर भाटांत जरा पाऊल ! असा ठोकून काढूं !......"

"नाहीं ! तेवढयानें भागणार नाहीं !" सोनु म्हणाला, "विहिरींत पडलेलें हाड्क बाहेर दिघून एकदोन दिवस लोटेपर्यंत, त्यांतील पाणी आपल्याला घेतां येणार नाहीं ! या उन्हाळयाच्या दिवसांत आजूबाजूच्या सर्व विहिरी आटलेल्या. दुरून पाणी आणावें लागून आपल्या मंडळीचे तेवढे हाल व्हावयाचे ! व पावलूच्या घरीं मात्र नेहमींहून जास्तीच पाणी वापरायला मिळून त्यांची आयतीच सोय व्हायची ! अशानें पाण्याच्या टंचाईच्या दिवसांत मधून मधून विहिरींत हाडकें टाकून आपल्या हिंदु शेजाऱ्यांच्या घरीं होणारा पाण्याचा उपस थांबवण्याचें हें चांगलेंच साधन या आपमतलबी क्रिस्तावांच्या हातीं सांपडावयाचं ! तें कांहीं नाहीं. जशास तसं ! मी एक नामी युक्ति सुचवतों. ती कराल तर पावलूच्या घरची मंडळी एका घटकेंत वठणीवर येईल !"

सोनूची युक्ति इतकी बिनतोड, मजेदार व नाविन्ययुक्त होती कीं, ती त्याच्या तोंडून बाहेर पडण्याचाच अवकाश, सबंध बालचमूनें

घरामागल्या गोठ्याकडे धांव घेतली. सांपडेल तितकें गोठ्यांतलें शेण त्यांनीं एका टोपलींत गोळा केलें व त्या टोपलीसहित विहिरीकडे आपला मोर्चा वळवला ! लगेच सोनूचा रामबाण तोडगा अमलांत आणला गेला ! सबंध टोपली विहिरींत रिती झाली ! विहिरींत दोन तीन घागरींहून जास्ती पाणी नव्हतेंच. जणुं शेणाचा सडाच आंत तयार झाला !

या सर्व शत्रुपक्षीय हालचालींची आपल्या घराच्या खिडकींतून सांतानकडून टेहळणी चालली होती. भिसूकडून थोबाडींत मिळाल्या-मुळें त्याला झालेलें दुःख एवढ्या अवधींत बहुतेक ओसरलें होतें. तेवढीच एक गोष्ट असती, तर नेहमींप्रमाणें थोड्यावेळानें भिसूच्या घरीं येऊन त्यानें त्यांच्याशीं समेट केला असता. पण महत्प्रयासानें मिळवलेलें फुलपांखरूं नुकत्याच झालेल्या दंगलींत हातचें सुटून गेल्या-मुळें त्याच्या मनाला डंवचत असलेलें दुःख मात्र तो इतक्या लवकर विसरणें शक्य नव्हतें. अर्थात् प्रतिपक्षीयानीं केलेल्या सर्व घोर कृत्यांची तिखटमीठ लावून वर्दी देण्याकरितां त्यानें घरांतल्या वडिल माणसांकडे धांव घ्यावी, हें साहजिक आहे.

चराचर वस्तूच्या शुद्धिकरणाचें एक सवंग साधन म्हणून शेणा-बद्दल हिंदु लोकांच्या मनांत केवढीही पवित्र भावना असली, तरी क्रिस्तांवांना त्या वस्तूचा किळसच यावयाचा. शेजारच्या मुलांनीं केलेल्या इतर गोष्टींचें पावलूच्या घरच्या बायकामंडळीला विशेष कांहीं वाटलें नाहीं. पण अशा पाण्याच्या टंचाईच्या दिवसांत विहिरींत शेण टाकून त्यांतील पाणी खराब करण्याचा त्यांचा हा दुष्टपणा मात्र त्यांना खपला नाहीं. सांतुशणै व पावलु हे दोघेही यावेळीं आपापल्या घरीं नव्हते. ते घरीं आल्यावर पावलूकडून मुलांचा हा व्रात्यपणा सांतुशणैला कळवून त्यांना शिक्षा करवायची, असें त्यांनीं ठरवलें.

सांतुशणे व पावलु यांना कळेपर्यंत हा प्रकार एवढयावरच थांबता तर भिसू, बाबलू व सांतान यानीं आपापल्या आजोबांकडून दोनचार चपराका खाण्यांत, सोनूनें निर्माण केलेल्या फुलगांवांतील या धर्मयुद्धाचा त्याच दिवशीं संध्याकाळीं शेवट झाला असता. पण त्यास याहून निराळें स्वरूप यावयाचें होतें!

ही एकंदर गोष्ट त्या 'दुपारच्या वेळीं' सांतानचा बाप कायतान याच्या कानांवर गेली. कायतानची 'दुपारची वेळ' हें काय प्रकरण आहे, हें फुलगांवांतल्या प्रत्येक इसमास माहित होतें. दुपारच्या वेळीं कायतानशीं कोणत्याही प्रकारचा संबंध येऊं द्यावयाचा नाहीं, असा गांवांत सर्वांचा नियमच ठरल्यासारखा होता. चाळीस पंचेचाळीस वर्षें हें कायतानचें वय. एरवीं शांत प्रकृतीचा व सुस्वभावी गृहस्थ. पण दुपारच्या वेळीं आग्यावेताळच त्याच्या अंगांत संचरलेला असावयाचा! दुपारीं जेवणानतर यथास्थित काजूची दारू झोंकून तास दोन तास वामकुक्षी घेण्याचें त्याच्या नाजुक प्रकृतीला जरूर असणारें पथ्य गेलीं कित्येक वर्षें त्यानें नियमितपणें पाळलें होतें. अशा या 'दुपारच्या वेळीं' क्षुल्लक निरुपद्रवी गोष्टीही त्याचें डोकें भडकवण्यास कारण होत. मग आज घडलेल्या प्रकारासंबंधीं तर विचारावयालाच नको!

सांताननें भिसू व बाबलूविरुद्ध नेलेलें गाऱ्हाणें ऐकतांच व त्याच्या गालावर भिसूच्या बोटांचा उठलेला वळ पाहातांच कायतानचें पित्त खवळलें!

सोनूच्या व्याख्यानाचे फवारे उडूं लागले, कीं त्यांतील कांहीं तुषार कायतानच्या कानांपर्यंतही जात असत. त्यामुळें सोनूविषयीं त्याचें मन पूर्वीच कलुषित झालें होतें. आजच्या या एकंदर प्रकारामध्यें

त्याचेंच अंग असावें हें कायताननें ताडलें. आधींच लाली आलेले त्याचे डोळे व तोंड संतापानें जास्तीच लालबुंद झालें. तडकन खाटेवरून उठून तो सांतुशणैच्या घराकडे निघाला !

“ असं का ? येथवर पाळी आली ? आज आठ दिवस एकसारखी वटवट चालवून सेर्माव झोडतो आहे, तीं हींच का ? लेकाचं आज टाळकच सडकतों ! म्हणावं इथं नाहीं चालायाचा तो शहरांतला शहाणपणा ! ” असें रागानें स्वतःशींच पुटपुटत, जातांना बागेंतल्या पेरूच्या झाडाच्या फांदीची एक काठी मोडून यानें हातीं घेतली.

थेट सांतुशणैच्या चौकीवर जाऊन तो उभा राहिला व आपले डोळे गरगरां फिरवीत, दांत ओंठ चावीत दरडावून सोनूला म्हणाला, “ काय रे, ए कार्‍या ? ही काय पुंडाई आरंभिली आहेस तूं ? या कायतानशीं चालायचे नाहींत बरं हे चाळे ! चांगले कान उपटून हातीं देईन ! काय कारण होतं रे तुला विहिरींत शेण टाकण्याबद्दल मुलांना फूस द्यावयाला ? ”

“ शेजार्‍या, असं पाहा, ” सोनूनें अगदीं धिमेपणाचा व पोक्तपणाचा आव आणून उत्तर दिलें, “ तुझ्या गुणी बाळानें विहिरींत हाड टाकलं. त्यामुळें पाणी विटाळलं ! विटाळलेली कोणतीही वस्तु शुद्ध करून घेण्यासाठीं आमच्या धर्मात सांगितल्याप्रमाणें शेणाचा आम्ही हिंदु लोक उपयोग करतों, हें तुला माहित आहेच. विहिरींत शेण टाकण्याचं कारण हें असं उघड आहे ! ”

आपल्या या बिनतोड उत्तरानें कायतान निरुत्तर होईल, अशी सोनूची अपेक्षा होती. पण ती खोटी ठरली. कायतान जास्तीच चवताळून ओरडला, “ तूं एवढंसं शेंबडं पोर ! आणि मला या असल्या फिलोझोफी सांगणार ? तूंच आज आलास मोठा हिंदूंचा पाप विहिरींत

शेण टाकून त्या शुद्ध करून घ्यायला ! मी बोळ्यानं दूध का पितों आहें, तुझं हें थोतांड ऐकून घ्यायला गाढवा ? ”

“ अहो महाराज, कुमारी मारीयच्या पोटी क्रिस्त जन्माला आला, या गोष्टीवर मात्र तुम्ही विश्वास ठेवतां, व आमच्या धर्मातील या गोष्टी मात्र झूट मानतां ? बरं आतां मेहेरबानी करून घरीं जा व नीट शुद्धी-वर आल्यावर पुनः या, म्हणजे तुम्हांला आमचं सारं धर्मशास्त्र नीट समजावून देईन ! जा ! ”

अखेरचा वर्मी घाव घालण्याच्या उद्देशानें सोनूनें उच्चारलेले हे शब्द संपले न संपले, तोंच कायतानच्या हातांतील काठीचे जोराचे तडाके त्याच्या पाठीवर बसण्यास सुरवात झाली ! सोनूनें आपल्या तोंडाचा पट्टा चालवून आत्मसंरक्षण करण्याचा प्रयत्न केला, पण त्याचा कांहींही उपयोग झाला नाहीं. पांच सहा मिनिटें कायताननें आपल्या हाताचा सपाटा सारखा चालू ठेवला व नंतर त्यानें आपल्या घराचा रस्ता सुधारला !

* * *

जगांत कोठेंही कारण आधीं नंतर कार्य ! कार्याचें वास्तविक स्वरूप जाणून घेणें असेल, तर त्याच्या कारणाकडे आधीं दृष्टि वळवणें अवश्य असतें. पण कधीं कधीं प्रथमदर्शनींच कार्य मनुष्याच्या मनाचा असा कबजा घेतें कीं, कारणाचा निर्विकारपणें विचार करण्यास अवश्य असलेला समतोलपणा तेथें शिल्लकच राहात नाहीं ! पुष्कळांच्या हातून त्यांच्या आयुष्यांत घडणारे प्रमाद येथून उद्भवतात !

सांतुशर्णे व पावलु-द-सा यांच्याही बाबतींत त्या दिवशीं असेंच झालें ! सांतुशर्णे संध्याकाळीं घरांत पाऊल टाकतात न टाकतात तोंच कायताननें दारूच्या धुंदींत ‘ कांहीं विशेष कारण नसतां ’ सोनूला कसा बेदम मार दिला ही गोष्ट घरांतल्या सर्व मंडळीनें त्यांस तिखटमीठ

लावून व फुगवून कथन केली. एकुलता एक नातु ! बऱ्याच वर्षांनीं आजोळीं आलेला ! त्याजवर आलेला हा प्रसंग ऐकतांच सांतुशणैचें मन पराकाष्ठेचें कळवळलें, व संतापलें ! अशा स्थितींत, घडलेल्या गोष्टीचीं कारणें जाणून घेण्याचा त्यांनीं केलेला प्रयत्न अपुरा व पूर्व-ग्रहदूषित असावा, यांत मोठेंसें आश्चर्य नाहीं. शिवाय तीं त्यांना यथा-भूत व सविस्तर सांगण्याइतका विचारीपणा, एवढा उद्वेगजनक प्रकार झाल्यानंतर घरांतल्या इतर मंडळीमध्यें तरी कसा असेल ?

"गेल्या चार पिढ्या आम्हां दोघांही शेजाऱ्यांमध्यें केवढा दाट घरोबा ! पण पावलूच्या मागें हा दारुडा कायतान तो असाच कायम राखील, असें दिसत नाहीं ! आज हा कधीं न घडलेला प्रकार घडला ! वेळींच सावध होऊन त्यांच्याशीं असलेली घसट एव्हांच कमी केलेली बरी ! म्हणजे असे हे प्रसंग पुनः होणें तरी टळेल !" सांतुशणै वैतागलेल्या व क्षुब्ध स्वरांत म्हणाले.

नेमक्या याच वेळीं पावलु सांतुशणैच्या घरीं आला. दुपारच्या भांडणाची हकिकत त्यास नुकतीच कळलेली ! "सांतुशणैच्या नातवानें गांवांतल्या सर्व कोंकण्या पोरांकरवीं सांतानास मार देवविला ! विहि-रींत शेणाचा ढीग ओतला ! कायतानला 'दारुडा' म्हणून शिव्या दिल्या ! क्रिस्ताची निंदा केली !" या एवढ्या भागाचाच एकतर्फी विस्तार त्याच्या कानावर आलेला ! अर्थात् त्याचाही चित्तक्षोभ व्हायला उशीर लागला नाहीं. सांतुशणैस आपल्या नातवाच्या वर्तनाला आळा घालण्याची सूचना देण्यासाठीं तो तत्काळ घरून निघाला. दोघेही एकाच मनःस्थितींत ! त्यामुळें त्यांचें संभाषण व्हाव्या तितक्या शांतवृत्तीनें होईना ! शब्दास शब्द ! उत्तरास प्रत्युत्तर ! एका गैरसमजामुळें दुसरा गैरसमज ! हे सर्व प्रकार होऊन अखेरीस दोघेही वर्दळीवर आले व एवढें कडाक्याचें भांडण झालें कीं, "तुझ्या घरांत जन्मांत कधीं पुनः

पाऊल टाकणार नाहीं !'' असें शेवटीं आपल्या शेजाऱ्यास बजावून पावलु आपल्या घरीं निघून गेला !

आज अनेक वर्षें या दोघां शेजाऱ्यांमध्यें किती निकट संघटण चालत आलेलें ! केव्हांही शेतीवाडीचीं व घरसंसाराचीं कांहीं बिकट कामें उद्भवल्यास पावलूनें सांतुशणैची सल्लामसलत व मदत घ्यावी. त्याचप्रमाणें पणजीच्या सरकारदरबारी किंवा कोर्टकचेरीशीं कांहीं संबंध आला, कीं स्वतःला न झेपणाऱ्या त्या भानगडी सांतुशणैनें खुशाल पावलूवर सोंपवाव्या. कुटुंबांतील मंडळी मागें ठेवून पुरुषांना कांहीं दिवस घरापासून दूर गांवीं जावें लागणें म्हणजे त्यांस केवढी काळजी वाहण्यासारखी गोष्ट ! पण असा प्रसंग एखादेवेळीं आल्यास सांतुशणै व पावलु यांस परस्परांचा एवढा भरंवसा कीं, '' मुलांबाळांवर नजर असूं द्या बरं ! '' एवढी सूचना एकानें दुसऱ्यास दिली, कीं तो झाला मोकळा निर्धास्तपणें घरून निघण्यास ! सांतुशणैच्या घरची बायकामंडळी व मुलीबाळी, विणकाम, भरतकाम किंवा कशिदा शिकण्याकरतां अथवा अंगडींटोपड्रीं बेतणें, शिवणें, फुलांच्या वेण्या गुंफणें अशा प्रकारच्या आपल्या कामाकरतां पावलूच्या घरीं गेल्या नाहींत, तसेच पावलूच्या घरच्या माणसांनीं लोणचीं, मुरंबे, पापडशेवया करून घेण्याकरतां, आजीबाईच्या औषधी करंड्यांतून लहान मुलांचे काढे, मुळ्या नेण्याकरतां व अशाच इतर गोष्टींसाठीं आपल्या या हिंदु शेजारणींकडे खेप घातली नाहीं, असा दिवस तर क्वचित्‌च जाई. संध्याकाळीं गळ घेऊन नदीवर जावें व रात्रींच्या कढीसाठीं पुरेशी मासळी पकडावी हा कायतानचा दररोजचा प्रघात. पण मासळी घेऊन नदीवरून परत आल्यावर आपल्या शेजाऱ्याच्या घरावरून जातांना बाबलू व भिसू यांना हांक मारावी व दोनचार खरचाण्या किंवा मुड्डोशा त्यांच्या हातावर ठेवाव्या हा त्याचा नियमही कधीं चुकत नसे. एक दोन

दिवसाआड पावलूच्या बागेतील चांफ्याशेवत्यांनीं भरलेली एखादी दुसरी परडी व पेरू, सीताफळें, पोपया हीं फळें सांतुशणेंच्या घरीं यायचींच. उलट सांतुशणेंच्या घरी सणासुदीच्या दिवशीं व इतर विशेष प्रसंगी होणारे गोडधोड व पक्वान्नें यांत या किरिस्तांव शेजाऱ्याचा हिस्सा हमखास ठेवलेला. दोन्ही घरांतील मुलांचें मेतकूट तर विचारूंच नका! एकमेकांच्या घरी खेळतांना, आजूबाजूच्या झाडावरील पक्ष्यांचीं घरटीं हुडकतांना किंवा शेजारच्या टेकडावरील काजू-करवंदांचा फडशा उड-वतांना सिमू, बाबलू व सातान हे त्रिकूट नेहमी एकत्र दिसावयाचें!

पण इतका दीर्घकाळ अशा गुण्यागोविंदानें व खेळीमेळीनें वागत आलेल्या या दोन्ही कुटुंबांतील माणसांच्या परस्पर संबंधांत यापुढें केवढें रूपांतर घडून आलें! आजवर त्यांजमध्यें चालत आलेलें बोलणें चालणें, ये जा, देव घेव हे सर्व प्रकार अजिबात बंद झाले. सिमू, बाबलू व सातान यांनीं अजून परस्पराशीं थोडासा संबंध ठेवला होता. पण तो आपापल्या घराच्या हद्दींत राहून एकमेकांना वांकोल्या व जिभा दाखविणें व शिव्या देणें एवढ्यापुरताच! यंदाच्या गणेशचतु-र्थीच्या दिवशीं व इतर एक दोन सणांच्या दिवशीं सांतुशणेंच्या घरीं सालाबादप्रमाणें पावलूच्या घरून फुलांची भेट आली नाहीं. त्याच-प्रमाणें पावलूच्या घरच्या कपेलाचें फेस्त साजरें झालें, त्या दिवशीं सांसेबाशिनआंवाच्या मूर्तीपुढें लावण्यासाठीं सांतुशणेकडून जाणारें मेण-बत्त्यांचें बंडल यंदा रद्द झालें. इतकेंच नव्हे तर लहान सहान कार-णांवरून या दोघांही शेजाऱ्यामध्यें पुनः पुनः खटके उडूं लागले! पावलूच्या घरचीं डुकरें व कोंबड्या पूर्वी क्वचितच आपल्या हद्दापलीकडे जात. पण सांतुशणेंच्या परसांत शिरून तेथील भांडीकुंडीं, कपडे इ० वस्तु विटाळण्याचा जणुं त्यांना आतां नादच लागला. त्याचा वचपा काढण्यासाठीं सांतुशणेंचीं गुरेंही पावलूच्या बागेंत शिरून तेथील

केळींचा व इतर फळझाडांफुलझाडांचा फडशा उडवूं लागलीं ! सांतु-शणैच्या घरच्या उष्टया पत्रावळींचा व केरकचऱ्याचा पावलूच्या घराच्या कुंपणालगत ढीग जमूं लागला. अर्थात् पावलूच्या घरचीं जेवणानंतरचीं हाडकें, मांसाचे तुकडे, अंड्यांच्या कवच्या सांतुशणैच्या बल्कांवांसमोर पडलेल्या दिसूं लागल्या, यांत नवल नाहीं. शेवटीं अशीच एक गोष्ट विशेष निकराला जाऊन तिचें पर्यवसान सांतुशणैनें पावलूवर फिर्याद करण्यांत झालें !

सांतुबाबा व पावलु हे दोघेही आपापल्या समाजांतील प्रमुख पुढारी. त्यामुळें या प्रकरणांत दोन्ही समाजांतील इतर बऱ्याच गांवकऱ्यांनीं आपापल्या पुढाऱ्यांची बाजू घेतली व अशा रीतीनें या एकंदर प्रकाराचा शेवट असा झाला कीं, गांवांत पूर्वीं कधींही नसलेले हिंदु व क्रिस्तांव असे दोन नवीन तट निर्माण झाले !

या एवढया अवधींत आजोळ सोडून सोनूही आपल्या घरीं निघून गेला होता. गोव्यांतील एका साप्ताहिकांतून त्यानें लिहावयाला सुरू केलेल्या ‘ परशुरामभूमींतील पुण्यपर्वणी ! ! ! ’ या दणदणीत लेख-मालेंतील पहिले सहा स्तंभ याच वेळीं प्रसिद्ध झाले ! अखिलभरत-खंडाला विदित होण्यासाठीं त्यानें त्यांतून आर्यसंस्कृत्युद्धारार्थ फुलगां-वांतील हिंदु वीरश्री जागृत झाल्याची रोमांचकारी मंगलवार्ता घोषित केली होती !

* * *

गोव्यांत त्या वर्षी ठिकठिकाणीं आलेला महापुराचा प्रसंग लोक अजून विसरलेले नाहींत ! त्यासंबंधींची आठवण निघाली कीं, कोसळून पडलेलीं घरें, वाहून गेलेलीं गुरेंढोरें, भाटांचें व बागबागाइतींचें झालेलें नुकसान, नाश पावलेली मालमत्ता, अपघातांत सांपडलेल्या

माणसांची प्राणहानी, अशा अनेक आपत्तींचीं वर्णनें गांवोगांव ऐकायला मिळतील. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, फुलगांवामध्यें मात्र कोणाही इसमाकडे तुम्ही या महापुराची गोष्ट काढाल तर उल्हसित मनानें तो तुम्हांला निराळेंच वृत्त आधीं कथन करील ! तें कोणतें ?

इतर अनेक गांवांप्रमाणेंच फुलगांवांतील लोकांचीही महापुरामुळें वाताहात झाली नाहीं असें नाहीं, पण त्या प्रसंगीं प्राप्त झालेल्या एका अकल्पित दैवघटनेनें त्या गांवाची कधींही भरून निघूं न शकणारी अशी एवढी मोठी एक हानी टळली कीं, हा महापूर म्हणजे तेथील लोकांना त्यांच्या पुरती तरी एक इष्टापत्तीच वाटली !

दर दोनचार वर्षांनीं अधूनमधून नदीचें पाणी चढून गांवाच्या थोड्याशा भागावर बुडती येणें, ही गोष्ट फुलगांवासारख्या नदीकांठच्या गांवांतील लोकांना नवीन नव्हती. म्हणूनच त्या वर्षी मृग नक्षत्राच्या सुरवातीस जेव्हां दोन चार दिवस पावसानें एकसारखा झोड उठवला, तेव्हां लोकांस त्याची मुळींच फिकीर वाटली नाहीं. पण पांचवे दिवशीं रात्रीं महापुराचें रौद्र स्वरूप अचानक व्यक्त होतांच सर्वांचें धाबें दणाणलें !

निश्चिंत मनानें झोपीं गेलेला सबंध गांव मध्यरात्रीच्या सुमारास खडबडून जागा झाला. ओघामध्यें वाहून जाणारीं गुरें, डुकरें, कोंबडीं, इत्यादि प्राण्यांचा दीनवाणा स्वर कानीं पडूं लागला ! मधून मधून एकादें दुसरें घर कोसळून पडूं लागलें ! नदीच्या पाण्याची खळबळ व त्यांत वाहून येणाऱ्या अनेक लहानमोठ्या वस्तूंचा भीषण नाद दर घटकेला वाढूं लागला ! लोकांची धांवपळ व धडपड सुरू झाली ! मौल्यवान् मालमत्ता बचावण्यासाठीं कित्येकांनीं जिवापाड प्रयत्न चालवले ! आपल्या प्राणरक्षणासाठीं स्वतःचीं घरें सोडून दुसऱ्यांच्या घरांचा व झाडांचाही आश्रय घेण्याची बऱ्याच जणांवर पाळी आली !

या अशा घोर संकटांत सांतुशणै व पावलु-द-सा यांचा मात्र इतर सर्व गांवकऱ्यांना हेवा वाटूं लागला! त्या दोघांचींही घरें गांवाच्या एका टोंकाला असलेल्या उंचवट्यावर असल्यामुळें महापुरापासून त्यांस भीति बाळगण्याचें कारण नाहीं अशीच सर्वांची कल्पना होती. चाळीस वर्षांमागें आलेल्या एका महापुराच्या वेळीं या गोष्टीचा प्रत्यय आला होता.

सांतुशणै व पावलु यांनाही आपापलीं घरें महापुरापासून सुरक्षित राहूं शकतील अशी पुरी खात्री वाटत होती. पण तो त्यांचा समज लवकरच चुकीचा ठरला! चाळीस वर्षामागें आलेल्या महापुराहूनही या महापुराची चढती कळा होती. पहांटेच्या सुमारास या दोन्ही घरांमध्यें पाणी चढूं लागलें! पावलूच्या मुख्य घरापासून कांहीं अंतरावर व सखल भागावर असलेलें त्याचें परसांतलें पडघर तर यापूर्वींच वाहून गेलें होतें व पहांट होईपर्यंत या गोष्टीची घरांतील मंडळीला दादही नव्हती! पाणी व त्याबरोबरच या दोन्ही घरांतल्या माणसांची काळजी हीं सारखीं वाढूं लागली! कांहीं तासांनीं दोन्ही घरांचा खालचा मजला पाण्यांत बुडून गेला व वरच्या मजल्याचा त्यांना आश्रय घ्यावा लागला. सांतुशणैनें श्रीमंगेशास महारुद्राचा नवस केला! पावलूनेंही सांफ्रांसिस्काच्या कोंव्हेंतास एक मिस् देऊं केलें!

सुदैवानें कांही वेळानें पाणी चढण्याचें बंद झालें. पण तें ओसरून जाण्याची मात्र चिन्हें दिसेनात! पूर लवकर न ओसरल्यास सांतुशणैच्या घरच्या माणसांस विशेष फिकीर बाळगण्याचें कारण नव्हतें. भूक निवारण करण्यास जरूर असलेली सर्व सामुग्री त्यांजपाशीं होती. पावलूच्या मंडळीवर मात्र आणखी थोड्या तासांनीं पूर ओसरून न गेल्यास बिकट प्रसंग गुदरणार होता. परसांतल्या पडघरांत त्यांचें स्वयंपाक घर व दाणागोटा व जेवण्याखाण्याचे इतर जिन्नस यांची कोठी हीं दोन्हीं असत. पण संबंध पडघरच वाहून गेल्यामुळें अन्नाचा

एखादा कणही त्यांना आतां दिसणें मुष्किल होतें ! या प्रसंगीं सांतुशणेच्या घरून तेवढा अन्नाचा त्यांस पुरवठा होऊं शकला असता. पण पावलूची अभिमानीवृत्ती आपल्या शेजाऱ्याकडे मदत मागण्याचा लाचारपणा अशा प्रसंगींही त्यास स्वीकारूं देईल किंवा सांतुशणे आपल्या शेजाऱ्यावर आलेला घोर प्रसंग ओळखून आपण होऊन त्यास मदत करण्याचें मनौदार्य दाखवील, या दोन्ही गोष्टी संभवनीय नव्हत्या. कारण त्यांच्या कोर्टांतील दाव्यास दोनच दिवसांपूर्वी इतका रंग चढला होता कीं, साक्षीदारांच्या जबान्यानंतर लवाद नेमण्यांत येऊन पाहणीसाठीं दिवसही ठरला होता !

बरें, पुराचें पाणी ओसरून जाईपर्यंत गांवांतल्या इतर लोकांकडून अन्नसामुग्री मिळवण्याचा प्रयत्न करावा तर तीही गोष्ट अशक्य कोटीं-तली ! कारण फुलगांवावरून वाहाणाऱ्या नदीला मध्येंच एक वळण असून या वळणाच्या अलीकडे सांतुशणे व पावलू-द-सा यांचीं घरें व इतर सर्व गांवकऱ्यांचीं घरें या वळणाच्या पलीकडे अशी या गांवाची रचना होती. हें वळण इतकें वांकलेलें होतें कीं, नदीचें पाणी व त्याबरोबर त्याचा जोर थोडासा वाढला कीं, तेथें हटकून भोंवरा निर्माण व्हावयाचा ! मग आतां तर महापुरच होता ! मागील महापुराच्या प्रसंगीं या भोंवऱ्यांत सांपडून प्राणाला मुकलेल्या माणसांमुळें लोकांच्या मनाला बसलेला दचका इतका कायम होता कीं, अशा या भयंकर ठिकाणीं एखाद्या देवचाराची वसती असलीच पाहिजे अशी ठाम समजूत करून घेऊन त्यास दरवर्षी गांवांतले खारवी न चुकतां कोंबडा बळी देत आले होते. अशा परिस्थितींत पावलु किंवा त्याचा मुलगा कायतान यांनीं पलीकडे जाण्यासाठीं, किंवा त्यांच्या मदतीसाठीं गांवांतल्या लोकांनीं अलीकडे येण्यासाठीं पोहून किंवा होडींतून तो भोंवरा ओलांडण्याचा हिय्या करणें, ही दुर्घट गोष्ट होती !

पूर ओसरून जाऊन गांवांतल्या इतर लोकांशीं लवकर दळणवळण सुरू होईल व आपल्यावर आलेला प्रसंग टळेल, या एवढ्याच आशे-वर पावलूच्या घरच्या मंडळीला अवलंबून राहणें आतां भाग होतें !

पण तो सबंध दिवस गेला व दुसरा उजाडला तरी पाणी ओसरे-ना ! उलट मधूनमधून पावसाच्या मुसळधारा सुरू होत व ओघ थोडासा वाढल्याचाच भास होई ! दोन दिवसांच्या उपोषणानें पावलू-च्या कुटुंबांतील मोठ्या माणसांचे सुद्धां प्राण व्याकुळ झाले होते. मग सांतान व त्याचीं लहान भावंडें यांचे काय हाल झाले असतील याची कल्पनाच केलेली बरी ! कावून जाऊन खाऊबद्दल तीं अजाण अर्भकें पुनःपुनः एवढ्या मोठ्यानें रडणें ओरडणें चालवीत कीं, तें पलीकडच्या सांतुशणैच्या घरींही ऐकूं जात असे !

दुसरा दिवस गेला व रात्र आली ! मुलांचें भुकेनें विव्हळणें एक-सारखें चालू होतें ! व तें पाहून वडील माणसांचीं हृदयें दुःखानें पिळ-वटून निघत !

बिचारी कायतानची आई बाहेरील पाण्याकडे निश्चल दृष्टीनें पहात खिडकीशीं बसली होती. तिचे डोळे आंसवांनीं भरून आले होते ! ‘ आमच्या बापा ’ व ‘ नमन मोरिये ’ या स्तोत्रांचा तिनें एकसारखा पाठ चालवला होता ! भक्तिपूर्वक मधूनमधून ती स्वतःवर खुरि-साच्या खुणाही ओढीत होती !

तोंच अचानक एक लहानसा आशेचा किरण तिला दिसून आला ! लगेच कायतानला हांक मारून आशाळभूतपणानें ती म्हणाली, “ तें पाहिलंस का ? सांतुशणैच्या घरामागील फणसाच्या झाडाला अडकून राहिलेलं पांढऱ्या रंगाचं तें कांहींतरी दिसतं आहे ! बहुतेक तो आपल्या स्वयंपाकघरांतील वेताचा पेटारा असावा. तसं असेल तर

ईश्वरच आपल्या हांकेला पोंहोंचला असें म्हणायाला पाहिजे! कारण परवां रात्रीं दुसऱ्या दिवशीं डुकरांना चारण्यासाठीं कांहीं शिळे पाव त्या पेटाऱ्यांत मी ठेवून दिले होते. पाण्यानें भिजलेले व शिळे कां असेनात, पण ते पाव हातीं येतील तर, आम्हां सर्वांची उपासमार दूर होईल!!"

तिच्या तोंडून हे शब्द निघण्याचाच अवकाश, कायताननें ताबडतोब पाण्यांत उडी घेतली व त्या झाडाकडे पोहायाला सुरवात केली. तो आतां काय घेऊन परत येतो, याच्याकडे सर्वांचे डोळे लागून राहिले!

पण एक दोन मिनिटांत निराशाच त्यांच्या वांट्याला आली! घाईघाईनें पाणी तोडीत रिकाम्या हातानें कायतान परत आला! दम खाण्यापुरतामुद्धां विसावा न घेतां, धापा टाकतां टाकतांच तो बोलला, "मी त्या पेटाऱ्यापर्यंत गेलोंच नाहीं!"

"तें कां?" त्याच्या आईनें अधीरतेनें प्रश्न केला.

"हें काय पापा? आम्हांला किती भूक लागली आहे! तो पेटारा घेऊन या ना लवकर!" सांतानही रडकुंडीस येऊन म्हणाला.

"आपल्याहून कितीतरी मोठें संकट सांतुशणैच्या मंडळीवर आलें आहे! त्या पेटाऱ्याकडे जातांना त्यांच्या घराच्या मागील भिंतीचे बाहेरचे भाग कोसळून पाण्यांत पडल्याचा आवाज दोनतीनदां माझ्या कानीं आला. काळोखामुळें नीट दिसेना म्हणून किंचित् जवळ गेलों, तों काय सांगणार! सबंध भिंत पाण्यानें फुगून गेलेली व तिला मध्येंच भलीमोठी भेग पडलेली! कोण जाणे, ती सबंध भिंत व छप्पर खालीं यायला एकदोन मिनिटेंही पुरे होतील, व त्या बिचाऱ्यांना या गोष्टीची गंधवार्ताही नसेल! त्या सर्वांचे प्राणच धोक्यांत असल्यामुळें मी त्या

पेटाऱ्याकडे जाण्यांत वेळ न गमावतां तसाच परत आलों. मला वाटतें त्यांजवर येऊं घातलेल्या या संकटाची त्यांस आपण तावडतोब सूचना द्यावी व त्या सर्वांस आपल्या घरीं येऊन राहाण्यास सांगावें ! ''

" अलबत् ! या अशा प्रसंगीं आपलं त्यांच्याशीं असलेलं वैर आपण साफ विसरून गेलं पाहिजे ! '' अनुकंपायुक्त स्वरानें त्याची आई म्हणाली.

पावलूनेंही आपल्या बायकोच्या म्हणण्यास दुजोरा दिला.

लगेच कायतान व पावलु यांनीं घाईघाईनें कांहीं लांकडें व फळ्या एकत्र बांधून एकप्रकारचा तराफा तयार केला व तो घेऊन कायतान शांतुशणेंच्या घराकडे वळला.

याचवेळीं सांतुशणेंच्या घरीं त्याची बायको आपल्या नातवंडांस खाऊं घालीत असतां आपल्या नवऱ्यास उद्देशून म्हणाली, "ऐकलं का ? त्या पावलूच्या बिचाऱ्या नातवंडांची भुकेनें काय अवस्था झाली असेल ईश्वर जाणे ! वैऱ्यावरही येऊं नये असा हा प्रसंग ! या वेळीं का त्यांच्या आमच्यामध्यें उत्पन्न झालेला वांकडेपणा मनांत बाळगायाचा ? अशा प्रसंगींसुद्धां आपण शेजारधर्म पाळला नाहीं तर तें देवाला बरं दिसेल का ? ''

" माझी तरी त्यांना मदत करायाला कुठं ना आहे ? कालपासूनच मला वाटतं आहे कीं, एखाद्या टोपलींत त्या सर्वांना पुरतील एवढे खाण्याचे पदार्थ घालून ते त्यांच्याकडे पोहोंचवावे. पण त्या पावलूला ताठा भयंकर ! गृहस्थ अशा वेळींसुद्धां आपल्याला झिडकारून आपली मदत नाकारायाचा !'' किंचित् अपराधी स्वरानें सांतुशणेंच्या तोंडून हे शब्द निघाले.

" तें कसंही असो ! आतां ही एवढी टोपली त्यांजकडे पोंहोंचवा-

वीच !" असें म्हणून भातभाजीनें भरलेलीं दोन भांडीं एका टोपलींत ठेवून ती त्याच्या बायकोनें सांतुशर्णेपुढें केली.

सांतुशर्णेनें लगेच धोतराचा कांचा खोंवला व एका हातांत टोपली पकडून पाण्यांत उडी टाकली.

एक दोन मिनिटांत कायतान व सांतुशर्णे यांची पाण्यांत दोघां-च्याही घरांमध्यें गांठ पडली. एकमेकांकडे दृष्टि जातांच दोघांनाही मोठाच अचंबा वाटला !

" कुठं चाललां ?" कायताननें प्रश्न केला.

" तुमच्याकडे ! मुलांसाठीं थोडा भात व भाजी आणली आहे ! अशा वेळींही तुम्ही आमच्यासंबंधीं इतका परकेपणा बाळगावा व आम्हांकडून खाण्याचे पदार्थ मागून न नेतां हे दोन दिवस हालांत काढावे, हें आश्चर्य आहे बुवा !"

"बरं, तें असूं द्या !" किंचित् ओशाळलेल्या पण कृतज्ञतेच्या स्वरांत कायतान म्हणाला, " प्रथम तुमचीं सर्व माणसें या तराफ्यावरून एका मागून एक आमच्या घरीं आणूं ! यत्किंचितही दिरंगाई उपयोगी नाहीं. तुमच्या घराची भिंत कोसळून पडण्याच्या बेतांत आहे, याची तुम्हांला मुळींच जाणीव नसेल !"

सांतुशर्णेनें वेगानें पाण्यावर आठदहा हात टाकले व स्वतः जाऊन भिंत पाहिली. कायताननें सांगितलेल्या गोष्टीची खात्री पटतांच त्यांच्या उरांत धडकी भरली ! तत्क्षणीं विष्णुसहस्रनामाचा पाठ त्यांच्या तोंडून सुरू झाला व कांसवाच्या वेगानें त्यांनीं आपलें घर गांठलें !

एक दोन मिनिटांत कायतानच्या सहाय्यानें आपल्या घरची सर्व मंडळी तराफ्यावरून सुरक्षितपणें त्यांनीं पावलूच्या घरीं नेऊन पोंहोंच-वली तेव्हांच त्यांच्या जिवांत जीव आला !

शेवटच्या खेपेस सांतुशणेंच्या घरची सर्व अन्नसामुग्रीही तराफ्यावरून पावलूच्या घरीं आली, हें सांगावयास नकोच !

यानंतर पांच दहा मिनिटें गेलीं न गेलीं तोंच सांतुशणेंच्या घराच्या पिछाडीला मोठा आवाज झाला ! सबंध भिंत पाण्यांत कोसळली होती !

एक दोन मिनिटांत पुनः तसाच आवाज ऐकूं आला ! घराचें छप्पर खालीं आलें होतें !

पावलूच्या घरचीं मुलें या वेळीं अधाशीपणानें भातभाजीचे घांस खात होतीं ! पावलूला व त्याच्या कुटुंबांतील इतर माणसांनाही अन्न वांटण्यांत सांतुशणेंची बायको गुंतली होती !

नुकत्याच पाण्यांत कोसळलेल्या आपल्या घराच्या छपराकडे पाहात असलेल्या व कृतज्ञतेनें डोळे भरून आलेल्या सांतुशणेंच्या तोंडून उद्गार निघाले, "इतर सर्व गोष्टींहून शेवटीं शेजारधर्मच श्रेष्ठ ठरतो, नाहीं पावलू ?"

"होय, इर्मांव ! 'Ama a teu pro'ximo como a ti mesmo !' ('स्वतः इतकेंच आपल्या शेजाऱ्यावर प्रेम कर !') ही मुळीं आमच्या जेजूची आज्ञाच आहे !" पावलूही गहिंवरून बोलला !

गेल्या दोन तीन महिन्यांत या दोघां शेजाऱ्यांच्या मनावर परस्परांविषयीं आकस्मिकपणें चढलेलें वैरभावाचें पुट अशारीतीनें या महापुरानें धुवून निघालें ! त्याबरोबरच फुलगांवांत हिंदु व क्रिस्तांव या दोन्ही समाजांमध्यें भडकत चाललेला कलहाचा वणवा विझायालाही हाच महापूर कारण झाला !

फुलगांवांत घडून आलेल्या स्थित्यंतराची वार्ता सोनूच्या कानीं जातांच वर्तमानपत्रांतून चालू असलेल्या त्याच्या लेखमालेचा ओघ मात्र राजापुरी गंगेप्रमाणें एकाएकीं गुप्त झाला !

---




माळरानांतल्या त्या निर्जन रस्त्यावरून बराच वेळ मी एकटाच चाललों होतों. नुकत्याच येऊन गेलेल्या पावसाच्या सरीचे थेंब सभोंवारच्या हिरवळीवर व नाचण्याकुळथांच्या शेतांतील चिमुकल्या हिरव्या पात्यांवर जणू पाचूवर बसवलेल्या मोत्यांप्रमाणें चमकत होते ! या शोभेला पूर्णता आणण्यासाठीच कीं काय ढगांच्या वेढ्याबाहेर पडलेल्या मावळत्या सूर्याचे कोंवळे सोनेरी किरण येऊनही आतां त्यांस लगटले ! हें मनोहर दृश्य म्हणजे एवढा वेळ निवाऱ्या-खातर झाडांझुडपांआड राहिलेल्या पांखरांना पुनः पावसाचा मारा लवकर होणार नाहीं, याबद्दल मिळालेलें आश्वासनच होतें ! लगेच त्यांची फडफड व किलबिल आजूबाजूच्या शेतांवर सुरू झाली !

'कुद्रर, कुद्रर !' कोणा पक्षाचा चमत्कारिक पण मंजुळ आवाज माझ्या कानीं आला ! मी थबकलों व त्या दिशेकडे दृष्टि वळविली. तोंच तो आवाज थपकन् थांबला, व उजवीकडच्या नाचण्याच्या शेतांतील कोंवळे कोंब खाण्याकरतां जमलेलें दहापंधरा कवड्यांचें थिरें तेथून भुर्रकन उडून गेलें ! दूरच्या दुसऱ्या एका शेतांत जाऊन तें पुनः खालीं उतरल्यावर त्याच्या मागें धांवणारी माझी नजर मी मागें घेतली व रस्ता चालावयाला सुरवात केली.

" मोठा वस्ताद प्राणी ! मुंगीचीही चाहूल कवड्याला ऐकूं जाईल !" रस्त्याच्या डाव्या कडेस वडाच्या झाडाखालीं एका दवरण्यावर आपल्या डोक्यावरील बोजकें ठेऊन उभा असलेला एक कुळवाडी वाटसरू माझ्याकडे पाहून बोलला.

" एखाद्याची चाहूल लागली की ' कुट्टर ' घालणारा कवडा आपला ' कुट्टर ' थांबवतो ! तो धोक्याचा इषारा ! मग पळालें तेथून कवड्यांचें संबंध भिरें ! " किंचित् थांबून तो पुढें म्हणाला.

वाट चालतांना बरोबर बोलायाचालायाला एखादा सोबती गांठावा, अशी कोणाहि एकाकी वाटसरूच्या मनाची असणारी सर्वसाधारण प्रवृत्तीच, माझ्या ज्ञानांत भर घालण्याच्या अनाहूतपणें त्यानें चालवलेल्या या प्रयत्नाच्या मुळाशीं होती, हें ताडावयास मला फारसा उशीर लागला नाहीं.

त्याची निराशा करावी अशी माझीही इच्छा नव्हती. ' कुठून आलास ? ' ' कुठं चाललास ? ' हे ठराविक प्रश्न मी त्यास केले व त्याची ' सहचर्या ' पतकरण्यास माझी नाखुषी नसल्याचें त्यास सूचित केलें.

त्याला तेवढेंच हवें होतें ! दवरण्यावरील बोजकें उचलून लगेच त्यानें डोक्यावर घेतलें व माझ्याबरोबर चालावयाला सुरवात केली.

" माझं घर सत्तरींत. पण रेवोड्याला लेकीच्या घरीं गेलों होतों. तेथून आज निघालों. कोंबडा मारला होता ! जेवण आटोपायाला उशीर झाला, नाहींतर एव्हां म्हापसें गांठलें असतें. म्हापशास तिसऱ्या कुंपजींत मुलगा सोलदाद आहे. पुष्कळ दिवस झाले, लेकीला व झिलाला बघून ! म्हटलं एकदां भेटून यावं ! मी आतां काय, पिकलं पान ! केव्हां गळेन याचा नेम नाहीं ! "

पिकलं पान ! खरेंच ! आपलें आखुंड धोतर त्यानें गुडघ्यावर खोंवून घेतलें असल्यामुळें उघड्या पडलेल्या त्याच्या मांड्यांचा भक्कम

भाग व पायाच्या वाटोळया भरींव पोटऱ्या मला दिसत होत्या ! पाऊणशेंच्या हद्दींत पाऊल टाकलें असतांही त्याची उंच शरीरकाठी अजून वांकली नव्हती ! व तिच्या बळकटीची मला कल्पना आणून देण्यास, डोक्यावर भलेंथोरलें बोजकें असतांही झपाझप चालू असलेली त्याची लांबटांगी चाल पुरेशी होती !

सुरवातीच्या या आपल्या लहानशा प्रस्तावनेनंतर त्यानें थेट इतर महत्वाच्या विषयांत प्रवेश केला.

आपल्या जांवयाची घरसंसारांतील दक्षता, लेकीचा मायाळूपणा, मुलाचा बाइलवेडेपणा, सुनेचा दागिन्यांचा सोस, नवीन विकत घेतलेल्या बैलाचा मारखोरपणा, परसांतील करांद्यांचे वेल कुरतडून टाकणाऱ्या उंदरांची दुष्टाई, दिवसेंदिवस निकस होत चाललेलें शेत—त्याच्या आयुष्याशीं निगडित झालेल्या अशा अनेक चराचर वस्तूंच्या बऱ्यावाईट विशेषांशीं माझा परिचय करून देण्याचें काम त्याच्या जिभेकडून आतां एकसारखें चालू झालें.

" आधींच जमिनीचा तुकडा वीतभर ! त्यांत पिकणार काय, तर नाचण्यावरीसारखें वरकस धान्य ! त्यांतही शेताचा कस कमी कमी होऊन दरवर्षी कुडवाची पायली होऊं लागली, मग खाणार काय माती ? बरं, सरकारदस्त न भरतां हवं तिथं रान मारून भरडकुमेर करायाला आतां काय मागचे आमच्या आजापणजाचे दिवस राहिले आहेत ?"

पण अर्धापाऊण कोस अंतर मागें टाकल्यावर कुंचेलेची घांटी उतरत असतांना जोरानें चाललेला त्याच्या वैतागयुक्त शब्दांचा हा ओघ व त्याबरोबरच त्याचे पायही येथें अचानक थांबले ! पोटाचा प्रश्न म्हणजे अत्यंत महत्वाचा ! मग त्यासंबंधीं बोलतां बोलतां त्यानें मध्येंच असें तोंड मिटावें, याचें मला आश्चर्य वाटलें !

आपल्या डोक्यावरील बोजकें त्यानें खालीं ठेवलें. बाजूचा एक धोंडा उचलला व तो रस्त्याच्या डाव्या बाजूला पसरलेल्या एका दगडाच्या भल्या मोठ्या ढिगावर त्यानें हलकेच टाकून दिला!

एवढा वेळ त्याच्या बोलण्यांत गुंतून राहिलेलें माझें लक्ष आतां कुतूहलतेनें त्या दगडांच्या ढिगाकडे वेधलें गेलें. जवळ जवळ पुरुषभर उंचीच्या लहान मोठ्या दगडांच्या त्या ढिगानें रस्त्याचा अर्धा अधिक भाग व्यापला होता. दगडांच्या जोडीला झाडांचीं पानें, टहाळ्या, फुलें, नारळांचीं वळीं, काटक्या इ० वस्तू त्यावर पडलेल्या मधून मधून दिसत होत्या! उन्हानें फिकट बनलेल्या एक दोन लहान भगव्या रंगाच्या गुढयाही त्यावर फडकत होत्या!

"हें काय?" माझ्या तोंडून आश्चर्योद्गार निघाला!

"म्हणजे! एवढेंही तुम्हाला माहीत नाहीं? हा रावजी राण्याचा वरंडा!"

"रावजी राण्याचें नांव केव्हांतरी ऐकल्याचें आठवत! पण 'वरंडा' हें काय प्रकरण आहे बुवा?" मी पुनः त्यास प्रश्न केला.

माझ्या अज्ञानाबद्दल कीव दर्शविणारी एक नजर माझ्याकडे फेकून लगेच बाजूच्या एका खडकावर त्यानें आपली बैठक दिली! आपल्या खांद्यावरील कांबळीच्या टोकाला बांधलेलें चिलीम काढून तें पेटवतां पेटवतां तो म्हणाला "एका काळीं रावजी राण्याच्या मरणाच्या सूडासाठीं जिवावर उदार झालेल्यांपैकीं मी एक होतों! या वरंड्याची गोष्ट विचारली कीं, ती मोजक्या दोन शब्दांनी सांगण्याचें काम माझ्या या जिभेकडून होणार नाहीं! आज तीस पस्तीस वर्षें होऊन गेलीं! पण अजून ती आठवण झाली कीं, अंग शिर्र होतें व काळजांत उमाळ्यांवर उमाळे दाटून येतात!"

आपल्या चालू आयुष्यांतील सुखःदुखें वर्णन करीत असतांना थोड्या वेळापूर्वी आढळून येणारा त्याच्या आवाजांतील दीनवाणा व सौम्य स्वर आतां पार नाहींसा झाला! त्यांत भरपूर आवेश व किंचित् गुर्मीची झांक आतां दिसून येऊं लागली!

चिलमीचे भराभर पांचसहा दम मारल्यावर तो म्हणाला,—

“ येथें पसरलेल्या या दगडांच्या राशीची हकिगत सांगायाची, म्हणजे दादा राण्याच्या बंडापासून सुरवात केली पाहिजे!—

“ त्यावर्षी एक दिवस सांखळीस सोमवारच्या बाजारांत चवळ्यांच पोतं विकायाला घेऊन गेलों होतों. बाजारांत जाऊन नुकतंच पोतं उघडतों, तोंच शिवा तांडेल तिथं आला! “ कुष्ट्या! असं रे काय? तुझ्या भावास उद्यां तारवांतून पाठवतात मस्मीग! आणि तूं आज इथं चवळ्या विकतो आहेस?” हे त्याचे शब्द ऐकतांक्षणींच माझ्या पोटांत धस्स झालं! म्हटलं हळद लागो त्या चवळ्यांस! केलं पोतं एका शेजाऱ्याच्या स्वाधीन व तडक पणजीस जाणाऱ्या एका होडींत जाऊन बसलों!

पणजीस माझा भाऊ मिलितारींत सोलदाद! पण तिथं जाऊन पोंहोचलों, तर काय बघणार? एवढं मोठ अफाट शहर! पण सगळी-कडे सामसूम! विचारपूस करतां कळलं कीं, मिलितारींतले सगळे शिपाई आदले दिवशींच पळाले! माझ्या तोंडावर सत्तरकारांची छाया! ती काय लपते? रस्त्यांतून जातांना मला आर्तेलरींतल्या व पोलीसच्या शिपायांनीं दोन तीनदां शेंडी पाहाण्याकरतां हटकलं! सरकारी हुक-माप्रमाणें हिंदु सोलदादांना तेव्हां शेंडी लहान चिमुटभर ठेवावी लागे. त्या खुणेनें पळालेल्या शिपायांपैकीं एखादा सांपडला तर पकडावा हा डाव! पण माझी शेंडी होती भली थोरली हातभर! बघा म्हटलं! तेव्हां मला जाऊं दिलं.

नंतर मला एकंदर हकिगत कळली. आफ्रिकेंत खाफ्र्यांनीं सुरू केलेलं बंड मोडण्याकरतां गोयांतल्या शिपायांना पाठवून देण्याबद्दल पुर्तुगालहून हुकूम आला होता, त्यामुळें शिपाई बिथरले होते ! या देशांतच नोकरी करण्याचा सरकारशीं त्यांचा करार होता. एक दिवस कमांदांतनें कवाइतीच्या वेळीं नवीन आलेला हुकूम शिपायांना वाचून दाखविला. तेव्हां एका म्हाताऱ्या शिपायानें पुढें होऊन, तो हुकूम रद्द करण्याची शिपायांची मागणी त्याजपुढें मांडली. पण सरकारनें ती लक्षांत घेतली नाहीं ! आधींच या नव्या आलेल्या कमांदांतनें शिपायांचा असा छळ मांडला होता कीं, जसा काय पूर्वजन्माचा दुस्मानच ! हिंदु, क्रिस्तांव, मुसलमान सर्व शिपायांनीं एका ठिकाणीं रांच करावा, असा हुकूम देण्यापर्यंत त्याची मजल गेली होती ! क्रिस्तांव मुसलमानांबरोबर असं एकत्र जेवण करून हिंदु शिपाई काय प्राण गेला तरी बाटायला तयार होतील ? एका वीतभर पोटासाठीं काय धर्म सोडतील ? आधींच शिपाई असे सतावलेले. त्यांत पुर्तुगालहून आलेल्या हुकुमाप्रमाणें जबरदस्तीनें तारवांत बसवून सरकार मस्मीला पाठवील हा त्या बिचाऱ्यांस धाक ! शेवटीं त्यांनीं करायचं तेंच केलं ! एक दिवस सगळे जमा झाले व शहर सोडून निघाले ! आपल्याला मनाई होऊं नये म्हणून त्यांनीं रायबदरचा पूल ओलांडीपर्यंत हवेंत गोळीबाराचा धूमधडाका सुरू ठेवला ! त्यामुळें शहरांत सगळीकडे हाहाःकार माजला ! "सरकार तुमच्या अटी मान्य करील ! तुम्ही परत फिरा !" अशी आदमिनिस्त्रादोर व शहरांतील मोठमोठे वजनदार गृहस्थ येऊन त्यांची समजूत पाडूं लागले. पण शिपाई काय दुधखुळे ? सरकार दगा देईल ही त्यांस भीती ! ते थेट रायबंदरच्या मार्गानें म्हाशेलची तार उतरून आमोणेस आले. तेथून सांखळीस गेले व तेथल्या आदमिनिस्त्रादोराकडे त्यांनीं जेवणखर्चाची मागणी केली. आदमिनि-

स्त्रादोरानें पणजीच्या गोव्हर्नादोराकडे तार करून परवानगी विचारली व ती मिळतांच त्यांस जेवणखर्च पुरविण्यास सुरवात केली. नंतर सरकारदरबारांत वजन असलेल्या कांहीं बामणांनीं शिपायांस आम्नेस्ती मिळावी म्हणून खटपट चालवली. गोव्हर्नादोरानेंही पुर्तुगालास तसंच कळवलं. पण तेथून जबाब आला, 'अबकारी व पोलीसच्या शिपायांस पाठवून बंडवाल्यांस पकडून आणावं.' मग सांखळीच्या आदमिनिस्त्रादोरानेंही शिपायांस जेवणखर्च देणं बंद केलं. येथवर पाळी आल्यावर सत्तरींत नाणसाचा कोट आहे त्यांत जाऊन सर्व शिपाई राहिले. सबंध महिना त्यांनीं हालचाल केली नाहीं. सरकार दाद घेईल, म्हणून वाट पाहिली! नंतर धुमाकूळ माजला! ठिकठिकाणच्या राण्यांस व देसायांस शिपायांनीं आपल्या पक्षाकडे वळवलं. जुंव्यावर जाऊन रावजी, बाळासाहेब, लक्ष्मणराव या जुंवेकर राण्यांस जबरदस्तीनें आपल्यांत सामील करून घेतलं—"

"जबरदस्तीनं? म्हणजे तें कसं काय?" मी विचारलें.

"अहो, जबरदस्तीनं असंच त्याला नांव द्यायचं! जुंवेकर राणे सरकारी नोकरींत होते! रावजी राणे, तसेंच त्यांचे वडील बापूसाहेब दोघेही सनदी शिपायांचे कपीत! मग ते का आपखुषीनें बंडांत सामिल झाले, असं म्हणायचं? वास्तविक कसली जबरदस्ती व काय? राणे व आम्ही काय एकमेकांना परकी? सरकारनें त्यांचीं वतनं बळकावलीं म्हणून सोडा, नाहीं तर सबंध सत्तर महालाचे खरे मालक ते! त्यांनीं बावटा उभारला कीं, आम्ही एकूण एक सत्तरकर कुळवाड्यांनीं त्याखालीं धांव घ्यायची व आम्हां दुबळ्या रयतेवर कांहीं अरिष्ट आलं कीं, त्यांनीं आम्हांला पाठीशीं घालायाचं! हा आमचा पूर्वापार चालत आलेला संबंध!

पोटासाठीं सरकारची चाकरी करूं ! पण आमचे खरे धनी, त्राते राणेच ! मग धर्म गमावण्याची, बाटण्याची पाळी आल्यावर शिपायांनीं त्यांच्या नव्हे तर कोणाच्या तोंडाकडे पाहायाचं ? अशा या प्रसंगीं बंडवाल्यांनीं जुवेंकर राण्यांच्या दारांत जाऊन शिंग वाजवलं व ' हरहर महादेव ' घातला तर राणे काय बांगड्या भरून घरांत बसतील ? कीं त्यांच्या वाडवडिलांनीं घालून दिलेला मार्ग पतकरील ? धर्माच्या राखणीसाठीं पाऊणशें वर्षांमागे दिपु राण्यानं काय केलं ? हिंदूंच्या घरांपुढं तुळशी-वृन्दावनें असूं नयेत, क्रिस्तांवांच्या सणांच्या दिवशीं हिंदूनीं वाद्यें वाजवूं नयेत, असा सरकारचा जाच सुरू होतांच बंडाचा झेंडा उभारून त्यानें सबंध गोंय हलवून सोडलं नाहीं ? काय तो सांटेरच्या किल्ल्यांतला प्रसंग ! दिपुराणा मूठभर लोकांनिशीं आंत व किल्ल्याला जंगी सरकारी फौजेचा वेढा ! आठ दिवस डागताहेत तोफा ! करताहेत गोळीबाराचा भडिमार ! पण डगमगतो आहे का तो बहाद्दर ! उलट सरकारी सैन्याचीच त्यानें पुरे पळवाट करून सोडली ! उगीच नाहींत लोक अजून दिपु राण्याची कीर्त गात——

साठ सत्तर गांविंमधीं कोण विरबळी ? ॥
राण्यांच्या कुळिं तो दिपुराणा बळी ! ॥
तेणीं मेळविलि तिनशें साठ नळी ! ॥
तिनशें साठ नळी मेळवून घेतलें सांटेर कोट ! ॥
पणजेचे पाखले झाले भयभीत ॥
पळाले सांखळे, जिव घालति तारवांत ! ॥

शिमग्यांत एकदां या आमच्या गांवीं ! व ऐका राण्यांच्या या जोती व कवनें !—अरे ! पण मी ही कथेंत आडकथा आणली ! काय सांगत होतों ? हो—

जुवेकर राण्यांना शिपायांनीं आपल्या बंडांत ओढलं! आपाजी देसाय गांवठणकार, बळवंतराव राणे खडकेकार, गणबाराणे सालेलकार हेही येऊन मिळाले! दिपुराण्याचा नातु दादा राणे यांना सर्वांनीं पुढारीपण दिलं! दादाराण्याच्या हांकेला सत्तर महालांतले तमाम गाउ-नगेही धांवून आले! ते अशा संधीची वाटच पहात होते!"—

"लुटालुटीसाठीं ना?" माझ्या तोंडून सहज शब्द निघाले.

तो थांबला. त्याच्या कपाळाला आंठ्या पडल्या! "लुटालुटीच्या, इराद्यानें आम्ही सत्तरींतले गाउनगे आजवर बंडें माजवीत आलों असं आम्हांला दूषण देण्याची तुम्हां लोकांना संवयच जडली आहे!" तो किंचित् क्षुब्ध स्वरानं म्हणाला.

"सरकार व तुम्ही बामण लोक लेखणीच्या जोरावर आमच्या पोटाला चिमटा घेतां! आमची दाद तक्रार लागत नाहीं! मग आम्ही कोयता घेऊन उठतों! दादाराण्याच्या बंडाच्या वेळीं तरी काय झालं? हेंच! सत्तरींतले बामण सरकारी नोकर आम्हांला पिळून काढूं लागले! आम्हां अज्ञान रयतेच्या घरावर कुत्रीं चढवून आपलीं घरें भरूं लागले! मोकाशाशिवाय असलेले गांव आम्ही पिढ्यानुपिढ्या वसवीत आलों होतों! सरकारनें अन्यायानें त्यावर नवीन सरकारदस्त बसवला! तोही भरण्याची आमची ना नव्हती असं नाहीं, पण काय-द्याची नाना कुलंगडीं करून कुळकर्णी वगैरे बामण अधिकारी ते गांव स्वतःच बळकावून बसले! योग्य सरकारपट्टी घेऊन जुन्या काळापासून पिकवीत आलों त्या आमच्या जमिनी आमच्याकडेच राहूं द्याव्यात, ही आमची सरळ मागणी. तीही सरकारनें धाब्यावर बसवली. गाउनगे शिपायांच्या बंडाला मिळाले, त्याचं कारण हें!—आतां तुम्ही म्हणतां त्यांतही थोडंसं तथ्य आहे. राण्यांच्या प्रत्येक बंडांत

नागवणुकीच्याच लोभानें गोळा झालेले अनेक भुरटे लोक असत. राण्यांच्या नांवावर ते पुष्कळदां नाना अनाचार करीत ! पण तें राण्यांना पसंत असे, असं थोडंच आहे ? दिपुराण्यानें याच कारणासाठीं आपल्या एकदोघां साथीदाराचीं डोकीं मारलीं ! व्होनो गावडो म्हणजे नेमबाजींत किती प्रविण ! पण त्या सभाग्याला एकदां परस्त्रीवर हात टाकण्याची दुर्बुद्ध सुचतांच दादा राण्यानें त्यास स्वतःच्या डोळयांसमोर गोळी घालून ठार करवलं ! इतकी त्यांची अशा बाबतींत कदर !"

गाउनग्यांवर भलताच आरोप करण्यांत मजकडून झालेली चूक मी कबूल करीत असल्याचें माझ्या ओशाळलेल्या मुद्रेवरून दिसून येतांच त्यानें हा मुद्दा इतक्यावरच सोडून दिला.

"अशा रीतीनें गाउनगेही बंडवाल्यांना मिळाले ! मीही त्यांतच होतों ! शिपायांची संख्या बाराशें ! त्यांत इतर लोकांची भर पडून एकंदर जमाव दोन हजारांवर वाढला ! वेळुस गांवच्या वेळुस्पतीच्या देवळांत राण्यांनीं व शिपायांनीं एकमेकांना सोडून न जाण्याबद्दल आणभाक घेतली ! करंजाळ्यांच्या सांतेरी देवीच्या देवळांतील शिळा उलटून 'चाळा' मोकळा केला !—"

त्याच्या शब्दांमधून व हातवाऱ्यांमधून आवेशाचा ओघ आतां इतक्या जोरानें वाहायाला सुरवात झाली होती, कीं तो मध्येंच थोपवणें माझ्या जिवावर आलें ! पण माझ्या तोंडून शब्द निघालेच ! "ही शिळा कुठली ? व 'चाळा' कसला ?"

"ही शिळा ? या शिळेवर तर प्रत्येक बंडांत राण्यांचा सगळा भरिभार ! बंडाचं शिंग फुकण्यापूर्वी पहिली गोष्ट करायची, ती ही शिळा उलटी करणं ही ! ती केली कीं मग पाहून घ्या राण्यांच्या पाठीराख्या भूतपिशाच्च, देवचार, समंध या सबंध 'चाळ्या'चा धुमाकूळ ! वर्षानु-

वर्षे हा 'चाळा' त्या शिळेखालीं गुपचुप राहील ! पण एकदां का शिळा उचलून राण्यांनीं त्यास मोकळिक दिली कीं, झाला मग राण्यांच्या शत्रूंचा नायनाट करण्यासाठीं जिकडे तिकडे त्याचा थयथयाट ! दादा-राण्याच्या बंडापर्यंत प्रत्येक बंडांत राण्यांना कधींही अपेश आलें नाहीं, त्याचें मूळ हेंच ! नाहींतर पाहा, त्यानंतरच्या अगदीं अलीकडील बंडाची काय गत झाली ती ! कपाळफुटक्यांनीं उतावीळपणानें शिळा उलटण्यापूर्वींच केली घाई व सर्व राण्यांचा झाला कीं नाहीं त्या बंडांत पुरा निःपात !—"

ओघानुसार १९१२ सालच्या शेवटच्या अपेशी बंडाची आठवण झाल्यामुळें त्याच्या तोंडावर किंचित् उदासीनतेची छाया पसरली ! त्याचा आवाज उतरला ! एकदोन क्षण थांबून पुनः तो आपल्या मुख्य गोष्टीकडे वळला.

" यानंतर पेटली बंडाची आग ! दोन हजार बंडवाले ! त्यांच्या पोटाची काय सोय ? केली सुरवात नागवणुकीला ! केरीच्या शेंपन्नास लोकांसहित दादा राणे राहिले नाणसाच्या कोटांत व बाकीचे बंडवाले आलों थेट म्हापशाला. सबंध तिजोरी लुटली. पावती लिहून दिली तिजोरीवरील सरकारी कामदाराला. काय तो ऐवज ! घोड्याच्या गाड्या भरून रुपयांचीं पोतीं न्यावीं लागलीं ! शिवाय बंदुका दारूगोळा मिळाला तो तरी किती ! लयलूट ! मग परतलों तेथून. वाटेंत धारग-ळच्या देवळांत कलावंतिणी नाचवल्या. जेवणावळी केल्या. दोन दिवस मजा केली ! नंतर सांखळी गांठली. तेथें कमांदांत गोमिश-द-कोश्त सरकारी सैन्य घेऊन आला होता. त्याला एकदोनदां दाखविली चुणूक ! गोळी लागून बेटा स्वतःच जखमी झाला ! त्याचे दोघे चौघे गोरे ओफस्यालही आणले धरून ! मग कांहीं दिवस हा असाच प्रकार चालला. सरकारला आला कळून बंडवाल्यांचा जोर. शेवटीं पुर्तुगालहून

पाच्छाचा भाऊ इफांत स्वतः पांचशें पाखल्यांचें पलटण घेऊन गोयांत आला ! तो येतांच बंडवाल्यांनीं धरून आणलेल्या गोऱ्या ओफस्यालांनीं शिपायांना फुसलावलें. म्हणाले, 'पाच्छाच्या भावा-वर गोळी करू नका ! नमतें घ्या ! आम्हाला सोडून द्या. आम्ही जाऊन तुमच्या वतीनें रदबदली करतों. आम्नेस्ती मिळवून देतों !' शिपाई भोळसर ! ओफस्यालांच्या सांगणीप्रमाणें वागले. ओफस्यालांस सोडून दिलं. आपल्या बंदुका होडींत घालून सांख-ळीहून पणजीस पाठवून दिल्या. व स्वतः राण्यांचा पालव सोडून इंग्रजींत पळून गेले व आम्नेस्तीची वाट पाहात राहिले ! ×× च्यानीं राण्यांशीं दगेखोरी केली ! इंफातीला वाटलं बंडवाले आपल्याला भ्याले. आतां दाखवावं त्यांना आपलं पुर्तुगाली पाणी ! पाखल्यांच्या पलटणी व जगी दारूगोळा घेऊन बंडवाल्यांचं पारिपत्य करायाला सांखळीला आला. किनीही झालं तरी, इंफांत पाच्छाचा भाऊ ! सुरवातीला राण्यांनीं त्याचा मान राखला ! त्याजवर गोळी केली नाहीं. टाळाटाळ केली. पण इफांतीनें कहरच आरंभला ! बंडवाल्यांवर जरब बसवण्याकरितां सत्तरींतले त्यांचे गांव व गाउनग्याचीं घरेंदारें, दाणागोटा यांची जाळपोळ सुरू केली ! चाळीस गांव पाड घातले ! एकदोन गांवांत तर घरांना लावलेल्या आगींत होरपळून गोरगरीब मेलेसुद्धां ! अशा रीतीनें बंडवाल्यांचा आपण नायनाट केला, बंड मोडलं, असं पुर्तुगालला लिहून कळवावं हा इंफांतीचा विचार ! मग राण्यांनीं ठरवलं. आतां स्वस्थ बसतां कामा नये. बंडवाले अजून जिवंत आहेत हें दाखवलं पाहिजे ! केरी गांव जाळायाला इंफांत चालला होता ! नाणमाच्या कोटापर्यंत येऊं दिलं ! मुळीच हालचाल केली नाहीं. आसपास या डोंगरावर, त्या रानांत मेल्यासारखे पडून राहिलों ! मग घातला घाला ! दोनचार गोरे ओफस्याल व आणखीही तीस

चाळीस सरकारी लोक मारले ! इंफांतीबरोबर त्याचा दोस्त, कोणी बडा सरदार पुर्तुगालहून आला होता, त्याचं गोळी लागून कबरडं मोडलं ! इंफांत स्वतः दारूगोळा टाकून पळून गेला ! दारूगोळा आयताच बंडवाल्यांना सांपडला ! असें इंफांतीबरोबर आणखीही एकदोनदां झुंज दिलं ! अखेर इंफांतीनें हात टेकले, आम्नेश्ती दिली व पुर्तुगालची वाट धरली !

'सर्व बंडवाल्यांस माफी केली आहे ! त्यांनीं पूर्ववत आपापल्या घरोघर जाऊन उदिमधंदा निर्धास्तपणें सुरू करावा. मात्र हत्यारें बाळगून फिरणाऱ्यांना बंडवाले समजून ठार करण्यांत येईल,' असं बोलेतींत छापून आलं. ती वार्ता कानीं आल्यावर बंडवाल्यांचा जीव खालीं पडला. कांहीं जण आपापल्या घरीं निघून गेले. पण सर्वांना अजून धाकधूक होतीच. कितीही झालं तरी फिरंगी सरकार ! कायद्याचं कांही तरी लचांड काढून बिनहत्यारी बंडवाल्यांस पकडून मरमीचं सेंतेन्स दिलं तर ! मनांत हा दुभाव ! तेव्हां सगळे राणे पुढलं धोरण ठरवण्यासाठीं केरीस एकत्र जमले. रावजी राणे होते वाडी संस्थानांत सासवली गांवास. त्यांचे भाऊ बंडांत असले तरी पण ते स्वतः सासवलीस राहून सर्व सूत्रं हलवीत ! सर्व राण्यांनीं त्यांना या गोष्टींत दिला मुखत्यारपणा. म्हणाले 'आम्नेश्तीसंबधीं तुम्ही काय ठरवाल, तें आम्हांला मान्य !' हा कामुर्लीं गांव दिसतो आहे ना ?"—

डाव्या बाजूला डोंगरपठारापलीकडे पसरलेल्या खोऱ्याकडे त्यानें बोट केलं.

"तेथला करवाल नांवाचा क्रिस्तांव आदव्होगाद रावजी राण्याचा जिवाभावाचा इष्ट. करवालीचं फिरंगी ज्ञान अचाट ! पुर्तुगालपर्यंत त्याचं नांव लोकांस ठाऊक ! त्याजकडे बुद्ध विचारायला निघाले रावजी राणे ! कसली ती काळवेळ !!"

त्यानें एक लांब सुस्कारा टाकला !

“ बरोबर दोनच असामी ! मी व गेनो परीट. असा दिवस पडतो आहे, तों निघालों. पाऊल उचललं, तों शिंक झाली ! शिककाराला पुसलं. शिंककारानें शकुन पाहिला. दुश्चिन्ह म्हणून सांगितलं ! थोडा वेळ थांबलों. पुनः निघालों. पुनः कोण दळभद्री शिंकला ! सारेजण म्हणाले आज जाऊं नका. परोपरीनें विनविलं. पण रावजी राणे कसले निधड्या छातीचे पुरुष ! ते काय पुढं टाकलेलं पाऊल मागं घेतात ? कुणाचंही न ऐकतां निघाले. रात्रीं नादोड्यास पोंचलों ! नादोड्याच्या पलतडी जुव्यांवर रावजी राण्याचं घर. बंदुका दिल्या माझ्याकडे व जा म्हणाले घरीं. व स्वतः गेन्या परटास घेऊन कामुर्लीकडे वळले. त्या रात्रीं करवालीकडे राहून दुसऱ्या दिवशीं परतावं हा बेत. पण त्या ××× पेद्रुपांग्यानें या अशा प्रसंगीं दुस्मानकी साधली ! पेद्रुपांग्याचं घर रेवोड्यास. राण्यांच्या जुव्यांच्या शेजारीं. त्याचं व रावजी राण्याचं वतनावरून फार दिवसाचं खासगी वैर ! बंड सुरू झाल्यापासून पलतडच्या राण्यांच्या घरावर डोळ्यांत तेल घालून त्याची पाळत ! रावजी राण्याचा सुगावा लागतांच ती बातमी त्यानें म्हापशास आपल्या मुलाला कळवली. मुलगा मिलितारींत सार्जेंतच्या हुद्द्यावर !

त्या हरामखोरानें काय चुगली केली देव जाणे ! पण कमांदांतनें फोर्स हाताखालीं देऊन करवालीचें घर वेढायाला रातोरात त्याची रवानगी केली. करवालीचं घर वेढलं. पण रावजी राणे काय डगमगतात ! त्या बोकडांपैकीं दोघांचौघांचे मुडदे पाडून तेथून निसटून येणं त्यांना काय कठीण होतं ! पण करवाल म्हणाले, ‘ आम्नेश्ती झाली आहे. तुमच्याकडे हत्यार नाहीं. मग कोणाच्या बापाची भीति आहे ?’ सकाळीं दोघेही स्वाधीन झाले. रावजी राण्याचे भाऊ बाळासाहेब,

लक्ष्मणराव व इतर भाऊबंद बंडांतून नुकतेच परत येऊन जुंव्यावर घरीं राहिलेले. हां हां म्हणतां करवालीचें घर वेढल्याची बातमी तेथें पोंचली. राण्यांचें रक्त तें ! वाघासारखे चवताळून उठले ! निघालों ते व मी मिळून सात आठ असामी होडींतून. सरकारी फोर्स पन्नास साठ जणांचा. पण आम्हांला थोडीच त्या गोष्टीची कदर ! वाटेंत गांठून भडिमार करावा व रावजी राण्यांस सोडवून आणावं, हा इरादा ! पण वेळ फिरली कीं होऊं नये त्या गोष्टी होतात. होडी कोलवाळच्या तडीस लागते, तों एक ओळखीचा बामण भेटला व त्यानें 'आम्नेश्ती झाली आहे. रावजी राण्यांस कसलाही धोका नाहीं !' अशी मसलत देऊन होडी मागें परतविली !

इकडे करवालीला व रावजी राण्यांना घेऊन सरकारी फोर्स कामुर्लीहून म्हापशाला यायाला निघाला. करवालीला पुढं घोड्याच्या गाडींत बसवलं. मागं कांहीं अंतरावर रावजी राण्यांना चालवलं. सूर्य वर येतो आहे तों कुंचेलीची घांटी चढूं लागले. या वरंड्याकडे येऊन पोंहोंचले. पांग्याचा मुलगा, सार्जेंत, चालतां चालतां जबरदस्तीनें रावजी राण्याच्या खिशांत भरलेलं पिस्तूल कोंबूं लागला. राण्याचे हात मागें बांधलेले. पण तशाही स्थितींत आपल्या खिशांत ते त्याला पिस्तूल कोंबूं देईनात. त्याच्या खिशांत पिस्तुल असल्याचा खोटा पुरावा तयार करावा हा त्या मेल्याचा दुष्ट डाव ! तो साधेना. तेव्हां शंकर तुर्येकर नांवाच्या शिपायास दिला इषारा ! सर्व कारस्थान आधीं ठरलेलं ! त्या कसाबानें धरला नेम ! आपण नरकाची वाट धरतों आहों हें त्याला भान राहिलें नाहीं ! दाबला घोडा ! खाशांच्या छातींतून आरपार गोळी निघून गेली !—तो राजबिंडा पुरुष !—माडासारखा त्याचा उंच भक्कम देह ! हा वरंडा—हा दगडांचा ढीग दिसतो आहेना ? या ठिकाणीं धाडकन् भुईवर आदळला !—

आणि एवढयानें त्या पांग्याच्या मुलाचं समाधान झालं? नाहीं! प्राण चालले आहेत, तर त्या चांडाळानें येऊन निर्भर्त्सना केली! खाशांचं डोकं दगडानें ठेंचलं!—"

माझ्या अंगावर शहारे आले!

कांहीं वेळ त्या दगडांच्या ढिगावर आपली दृष्टि लावून तो स्तब्ध राहिला. नंतर किंचित् गहिंवरलेल्या क्षुब्ध आवाजांत त्याच्या तोंडून शब्द निघूं लागले—

"शंकर तुर्येकरानें ही अशी करणी केली व त्याचं फळ त्याला काय भोगावं लागलं? वेड लागून व हाल अपेष्टा होऊन एका महिन्याच्या आंत किडे पडून मेला! आणि पांग्याचा मुलगा?—

रावजी राणे वाटेंत आडदांडपणा करून पळून जाऊं लागले म्हणून त्यांजवर गोळी घातली, अशी खोटीनाटी गोष्ट सांगून सरकार दरबारांत आपण केलेल्या खुनावर त्यानें पांघरूण घातलं. पण पुढ?—ऐका!—

रावजी राण्याचा हा असा शेवट झाला, ही बातमी जुंव्यावर कळतांच तेथली स्थिति कांहीं पुसूं नका! रावजी राण्याची आई बाईल-माणूस! पण काय तिचा तेजस्वीपणा! आपल्या इतर मुलांस समोर आणवलं! तिच्या तोंडून शब्द निघाले!—'तुम्ही आतां काय नुसतं रडत बसणार? आजच्या आज टाका घराबाहेर पाऊल! त्या पांग्याच्या पोरांस मसण दाखवा! मग तुमचं तोंड पाहीन! तोंवर नाहीं! माझ्या पोटचे असाल, तर एवढं करा! नाहींतर तुम्ही व पोटचे जंत सारखे!' पाठीस पाठ लावून आलेले रावजी राण्याचे ते भाऊ! अस्सल राण्यांच्या कुळांतलें तें खरं बीज! त्यांत आईचे हे असे शब्द! त्याच घटकेला तिघेही भाऊ व इतर भाऊबंद मनाचा निर्धार करून घर सोडून निघाले!

## वरंडा

रावजीराण्याच्या खुनाची हकिकत कळतांच इतर सर्व राण्यांचेंही रक्त खवळलं ! आम्नेस्ती जाहीर झालेली. पण आठ दिवसांत पुनः बंड पेटलं. बंडांतले इतर सारे लोक पूर्ववत् धुमाकूळ घालूं लागले ! पण रावजीराण्याचे भाऊ व त्यांच्या हाताखालच्या आम्हां इतर पन्नास-साठ असामीच्या मनांत मात्र अहोरात्र निराळ्याच विचाराची आग पेटलेली ! एकाच गोष्टीचा ध्यास लागलेला ! अन्न गोड लागेना ! घरादाराची, बायकोपोरांची आठवण होईना ! स्वतःच्या प्राणांची तर परवाच नव्हती !

पांगा थोड्या दिवसांपूर्वीच वारला होता. त्याचे तिघे मुलगे राण्यांच्या धाकानें रेवोड्याचें आपलें घर सोडून म्हापशास राहात होते. पण बापाच्या मरणाचा दिवस पाळण्यासाठीं बऱ्याच नातलग मंडळीस कडेकोट बदोबस्तानिशीं ते नांदोड्यास आपल्या घरीं आल्याची एक इसम तांतडीनें बातमी घेऊन आला. इतके दिवस आम्ही वाट पाहात होतों तो दिवस आला !

आम्ही अवघे पन्नास असामी. आणखी मनुष्यबळ हवं होतं. दादाराण्याकडे लोक मागितले. त्यांनीं कमांदांत सावंतास पन्नास लोक देऊन मदतीस पाठवलं. पण तो ×××चा ऐनवेळीं उलटला. म्हणाला 'तुमच्याबरोबर पाठवून माझे लोक मी मरणाच्या तोंडीं काय म्हणून देऊं ?' व आपल्या लोकांसहित गेला निघून तोंड घेऊन ! संधी हातची जाते म्हणून बाळासाहेब त्यावेळीं ढळढळां रडले ! पण आम्ही म्हणालों, 'बलाय गेली सावंताचे लोक नसले तर ! आमच्यापैकीं एकूणएक मरूं, पण मागं पाऊल घेणार नाहीं.' तेव्हां बाळासाहेबांना धीर आला. संध्याकाळीं निघालों. त्रेपन्नजण होतों. रात्रीं नांदोड्यास पोंचलों. एका कपेलांत थांबलों व कोंबडा आरवतो आहे, तों पांग्याचं घर वेढलं. दरवाजा फोडून आंत गेलों, तोच आंतील मंडळीनें चपळाई

केली ! तळमजला सोडून माडीचा आश्रय घेतला; व माडीच्या दगडी तक्तपोशीला ठेवलेल्या मारांमधून खालीं आम्हांवर एकसारखा गोळयांचा भडिमार चालू केला. काय ती बेट्यांची जय्यत तयारी ! किती बंदुका ! किती काडतुसांच्या पेट्या ! जिवावर उदार होऊन आम्ही शर्थ केली ! पण इलाज चालेना. आमचा एक इसम दगावलामुद्धां. विष्णुलो त्याचं नांव ! मिसरूटही फुटली नव्हती ! वीस वर्षांचा कोंवळा पोर ! पण जसा काय केळीचा खांब ! बिचारा चुकून माराखालीं उभा राहिला ! नेमकी आली वरून गोळी व टाळू फोडून आंत रिघली ! खालीं पडतां पडतां बाळासाहेबांनीं झेलून धरलं. प्राण कंठाशीं आला आहे, तर म्हणतो आहे ' खाशांनों, काम शेवटास न्या ! मग झालं माझ्या मरणाचं सार्थक !' असा गुणी पोरगा ! त्याची आठवण होतांच अजून काळीज कालवतं !—"

तो किंचित् थांबला. त्याच्या डोळयांच्या कडा यावेळीं खरोखरच पाण्यानें भिजल्या होत्या !

"अशा रीतीनें माराखालीं आम्ही सांपडलों. आमच्या गोळयांनीं पांग्याच्या मंडळीस यत्किंचितही धोका पोंचेना ! पण त्यांनीं मारांमधून चालविलेल्या गोळयांच्या वर्षावाखालीं मात्र आमच्यापैकीं कोणाचा कोण्या घटकेला प्राण जाईल, याचा नेम नव्हता ! मोठी कठीण वेळ आली !

शेवटीं अखेरचा उपाय म्हणून घरासभोंवतीं गवत पसरून पेटवून दिलं. पण वरून पांग्याच्या लोकांनीं घसाघस पाण्याच्या घागरी ओताव्या ! आग पेटेना ! मारूं किंवा मरूं या इर्ष्येनें आम्ही आलेलों. पण दुपार उलटली तरी मात्रा चालेना ! म्हापसें शहर दीड कोसाच्या अंतरावर ! तेथून सरकारी फोर्स निघाल्याची बातमी आली !



"त्या कसाबानें धरला नेम !........दाबला घोडा ! खाशांच्या
छातींतून आरपार गोळी निघून गेली !—" [ पृ. १७१ ]

फोर्स इगर्जेकडे येऊन पोंचला, म्हणजे अवघ्या पाव कोसावर! आतां मात्र सर्वांचा धीर सुटला! सगळं साहस फुकट गेलं! नादोडें सोडून अपेशी तोंडानें परतण्याची पाळी आली! तोंच, काय सांगणार तो प्रसंग!—

सहासात राणे एक झाले व जेव्हां त्यांनीं 'सायल्यांतल्याच्या' नांवानें साद घातला व धांवा सुरू केला—

"सायल्यांतला?" मी पुटपुटलों.

"होय! उठतां बसतां त्याचें सबंध नांव आम्ही उच्चारीत नसतों! पण तुम्हांला कळावं कसं? सायल्यांतला देवचार!! आलं लक्षांत? सबंध सत्तर महालाची राखण आज कैक काळ तो करीत आला आहे! केरीजवळच्या डोंगरावरील सायल्याचं रान हें त्याचं स्थान! कसलंही अरिष्ट येवो! भावार्थानें त्यास हांक मारली व त्याचं त्याजकडून निवारण झालं नाहीं, असं कधीच घडलं नाही!

—आणि तशा त्या संकटांत राण्यांनीं त्याचा आठव करतांक्षणींच काय तो चमत्कार!

'सायल्यांतल्या देवचारा! आमची राण्यांची अब्रु राख गा! पाव गा बाबा वाडवडिलांच्या राखणदारा!' डोळयांत पाणी आणून खाशांनीं टाहो फोडला!

हे शब्द त्यांच्या तोंडून निघण्याचाच अवकाश, तीन चार तास पेट घेत नसलेली आग तत्क्षणीं भडकली! चहू बाजूंनीं ज्वाला धांवूं लागल्या! हां हां म्हणतां घरानें पेट घेतली! माडीवर पांग्याच्या मुलांनीं काडतुसांच्या पेट्यांचा सांठा केला होता. त्या आगीनें पेटून शेंकडों काडतुसांच्या बारांचा जंगी धडधडाट एकसारखा सुरू झाला.

सरकारी फोर्स हांकेच्या अंतरावर येऊन पोंचलेला ! पण काडतुसांचा धडाका ऐकूं जातांच त्यांना वाटलें, राणे जंगी जमावानिशीं आले असावेत व त्यांच्याच बंदुकांच्या या फैरी झडताहेत ! मग फोर्स कसचा पुढें येतो आहे ! तिथंच थांबला !

पांग्याच्या मुलांचें आतां धाबें दणाणलें ! अगदीं गर्भगळित झाले ! ते व नातलग, पाहुणे मिळून एकंदर पन्नास पाऊणशें मंडळी ! सर्वांवर आगींत होरपळून मरण्याची पाळी आली !

'खाशांनो, गुन्यांव भोगोसा ! पेर्दाव !' पांग्याच्या एका मुलाचे शेवटीं माडींतील खिडकींतून काकळूतवाणे शब्द निघाले !

नंतर त्या सर्वांस घराबाहेर येऊं दिलं. पांग्याच्या मुलांचीं बायका-मुलें व पाहुणेमंडळी यांच्या केंसांसही धक्का लावला नाहीं ! बायका-मंडळीच्या अंगावर हजारों रुपयांचे दागिने ! एका मळसूत्रासही शिवलों नाहीं. पांग्याच्या तिघां मुलास तेवढे घेऊन निघालों ! काय तो त्यांच्या बायकामुलांचा त्या वेळचा आक्रोश ! त्यांना सोडून द्यावें म्हणून दागिन्यांचा ढीग त्यांनीं आमच्यापुढें ओतला ! त्यांच्या प्राणांच्या मोबदला मागूं ती रक्कम पुरवण्यास नातलग तयार झाले ! पण आम्हांला त्या वस्तू नको होत्या ! पैशासाठीं वाटमार करणारे आम्ही चोर लुटारू नव्हतों !

पांग्याच्या तिघांही मुलांस घेऊन निघालों—"

"पुरे ! पुढचं बोलूं नकोस !"—कातरस्वरानें मध्येंच माझ्या तोंडून उद्गार निघाले ! त्याचे पुढील शब्द ऐकण्यास माझें मन तयार नव्हतें !

"आणखी तें बोलण्यासारखें नाहींही ! या वर्षाची ही एव-ढीच हकिकत. अशा रीतीनें खाशांच्या मरणाचा आम्ही सूड घेतला !

त्यानंतर लवकरच नवीन माशाद गव्हर्नर आला. तो मनाचा मऊ. डोक्यानें थंड. त्यानें पुनः आम्नेश्ती जाहीर केली. बंडवाल्यांच्या कांहीं मागण्या मान्य केल्या. जगद्‌गुरूस गोंयांत बोलावून आणून त्याच्या मध्यस्थीनें राण्यांची समजूत पाडली. बंड थांबलं. सगळीकडे स्थिरस्थावर झाली. वर्षांमागून वर्षें जाऊं लागलीं. जुनी पिढी मरून गेली. माझ्यासारखीं कांहीं खोडं अजून राहिलीं आहेत, तेवढींच! बंडांतील इतर सर्व गोष्टी लोक हळुहळू विसरून गेले. पण या कुंचे-लीच्या घांटीवर घडलेल्या त्या प्रसंगाची आठवण मात्र लोकांना अजून कायम आहे !

रावजी राण्याच्या रक्तानें भिजलेल्या या जागेवर दगड, फूल, पान काय हाताला मिळेल तें भावार्थानें टाकल्यावांचून येथून येणाराजाणारा कोणीही वाटसरू पुढं पाऊल टाकीत नाहीं. आधी-व्याधी, अडीअडचण आली असतां या वरंड्यास येऊन लोक नवस करतात. रावजी राणे होताच तसा थोर पुण्याईचा माणूस ! दरसाल तीस चाळीस कुंभ भात येऊन त्याच्या खळ्यांत पडे ! राजाप्रमाणें बसून खावें अशी त्याची स्थिती ! कपितासारख्या मोठ्या हुद्द्याची सरकारी चाकरी ! पण आम्हां गोरगरीब रयतेच्या तोंडचा घांस निघाला, शिपायांची बाटवण होऊं लागली, हें पाहून त्यानें आपल्या सुखावर लाथ मारली ! घरदार सोडलं ! आम्हांबरोबर वनवास भोगले व शेवटीं आपले प्राणही गमावले ! आज पस्तीस वर्षं त्याचा हा वरंडा येथें उभा आहे व पुढेंही कैक काळ हा असाच राहील !"

हे शेवटचे शब्द बोलून त्यानें आपलें बोजकें उचललें व तो रस्त्याकडे वळला.

" हो ! सर्वभक्षक काळालाही आम्हां मानवांच्या विभूतीपूजेपुढें मान वांकवावी लागते ! ' माझ्या तोंडून उद्‌गार निघाले.

शेजारच्या वेलीवरील रानफुलांचा एक तुरा खुडून तो मी वरंड्यावर वाहिला ! व अंतःकरणांत खळबळून आलेल्या निरनिराळ्या अननुभूत भावनांचा विचारशक्तीशीं मेळ घालण्याचा प्रयत्न करीत त्याजबरोबर पुनः चालावयाला सुरवात केली.†

---

† The Commander-in-Chief decided to destroy the villages by fire to annihilate the enemy...innocent victims were burnt in conflagration......The ferocious instincts of the semicivilized people of Satary hitherto kept under control in homage to the Royal Prince burst out with a savagery that understands no fear !—

.........The Prince with his expeditionary force was allowed to pass through Satary as far as Nanuz, without firing a shot......then the revolters advanced in a body and attacked the force. The garrison was surprised and losing their presence of mind the soldiers began to flee in every direction......25 soldiers were killed and 12 wounded !"

[ "शत्रूचें निर्मूलन करण्यासाठीं त्यांच्या गांवांचा जाळून पोळून नाश करण्याचें कमांडर-इन-चीफनें ठरवलें.......निरपराधी माणसें आगीमध्यें जळून मेलीं......राजघराण्यांतील व्यक्तीचा मान राखावा या हेतूनें आवरून धरलेला आपला क्रूर स्वभावधर्म व भीतीची यत्किंचित्‌ही ओळख नसलेला आपला रानटीपणा त्या सत्तरीच्या लोकांनीं आतां प्रकट केला !—

......एकही बार काढल्याशिवाय सत्तर महालामध्यें नाणसापर्यंत राजपुत्राला येऊं दिलें.......नंतर बंडवाल्यांनीं जमावानिशीं पुढें सरसावून अकस्मात छापा घातल्यामुळें सरकारी फौजेस प्रसंगावधान राहिलें नाहीं व ती वाट फुटेल तिकडे पळत सुटली.......पंचवीस सोल्जर मारले गेले व बारा जखमी झाले ! ]

—The Bombay Gazette, January 15, 1896.

"Os revoltosos fizeram levantar os roitos de Satary, que estavam descontentes por terem sido espoliados, com capa de legalidade, pelos *narcornins e culcornins*, das terras que cultivavam..." .....

[ "आपण लागवडीला आणलेल्या जमिनी कायद्याच्या नांवाखालीं नाडकर्ण्यानीं व कुळकर्ण्यानीं लुबाडल्यामुळें नाखुष झालेल्या सत्तरींतल्या रयतेस बंडवाल्यांनीं उठावणी दिली. ......"

—Gôa sob a Dominaçao Portugueza.

# दुबळी श्रीमंती

संध्याकाळचे साडेचार वाजून गेले होते. पणजीच्या वाफोराच्या धक्क्याबाहेर बराच वेळ दिसून येणारी गर्दी आतां नाहींशी झाली होती. कारण बहुतेक सर्व उतारू इतक्यांत वाफोरांत चढले होते. शेवटची घंटा होऊन वाफोर सुटण्यास दोनतीन मिनिटांचाच अवकाश होता, तोंच धक्क्यावर एक मजेदार दृश्य दिसून आलें !

एक तीस बत्तीस वर्षांचे तरुण हिंदु गृहस्थ, त्यांच्या मागोमाग त्यांची पत्नी, तीन मुलें, एक कुळंबीण व एक गावडा एवढी मंडळी लगबगीनें तेथें येऊन पोहोंचली. ते तरुण गृहस्थ धोतर नेसले असले, तरी कॉलर, नेकटाय, बूट व सिगारेट हीं गोव्यांतील हिंदुसमाजांतील लझो-विद्या-विभूषित वर्गाचीं सन्मान्य प्रतीकें त्यांनीं धारण केलीं होतीं. त्यांची पत्नी मात्र अस्सल बाळबोध वळणांतील हिंदु स्त्रियांचा एक उत्कृष्ट नमुनाच होती. तिच्या पायांत साखळदंडवजा तोडे व पायांच्या बोटांत मासे हे रुप्याचे अलंकार असले तरी पादत्राणें मात्र तिनें वापरलीं नव्हतीं. एक उंची जरीकांठी महेश्वरी साडी ती नेसली होती, पण

अनेक रीतीनें तिच्या हालचालीच्या व गतीच्या आड येऊन शरीराच्छादनाऐवजीं शरीरबंधनाच्या कार्यालाच त्या साडीचा जास्त उपयोग होत होता! नाक, कान, गळा, हात, पाय इ० शरिराच्या निरनिराळ्या अवयवांचे हाल व ओढाताण करणाऱ्या तिच्या अंगावर दिसून येणाऱ्या अनेक दागिन्यांचें ओझें म्हणजे हिंदु स्त्रियांच्या सहनशीलतेचा तो प्रत्यक्ष पुरावाच होता. फुलांच्या वेण्यांनीं तिच्या डोक्याचा एवढा मोठा भाग व्यापला होता कीं, प्रथमदर्शनीं तिच्या डोक्यावर जणू एखादी फुलांची परडी असल्याचा भास होई! तिच्याबरोबर असलेल्या कुळंबिणीनें या सर्व बाबतीत आपल्या धनिणीचेंच अनुकरण केलें होतें. अंतर एवढेंच कीं तिची साडी जाडीभरडी असून तिच्या अंगावरील दागिन्यांचें ओझेंही थोडें कमी भरलें असतें. गावड्याची मात्र निसर्गाकडे बरीच दोस्ती असावी, असें दिसे. डोक्यावर एक भलें थोरलें मुंडासें, कमरेभोंवतालीं रुप्याचें कांड व तें कांड वर दिसेल अशा बेतानें ढुंगणाभोंवतीं गुंडाळलेलें लंगोटीवजा फडकें, कानांत पितळेचीं वळीं, या व्यतिरिक्त आणखी कोणतेंही कृत्रिम बंधन त्यानें आपल्या शरिरावर लादून घेतलें नव्हतें!

भुतेबाब, सीताबाई, जनगी व कामणू यांचें हें चतुरंगी दृश्य आधींच आकर्षक! तशांत सुटण्याच्या बेतांत असलेला वाफोर गांठण्याच्या बाबतींत त्यांची तारांबळ उडाल्यामुळें त्यांत भर पडलेली! मग वाफोरांतील सर्व लोकांचें, विशेषतः क्रिस्तांव उतारूंचें, तें एक थोडा वेळ चांगलेंच करमणुकीचें साधन बनलें, यांत नवल कसलें?

नेमक्या याच वेळीं मुलांपैकीं सात वर्षाच्या थोरल्या विसूनें पायाला बूट लागल्याच्या निमित्तानें आक्रोश सुरू केला व धक्क्यावरच बैठक दिली! मोठ्या कष्टानें त्याची समजूत करून भुतेबाब त्यास गतिमान्

करतात, तोंच जनगीच्या कडेवर असलेल्या चार वर्षांच्या छोट्या उपीनें तिच्या हातांतील बटवा मिळवण्याबद्दल रडरडून एवढा आकांत केला कीं, तो त्याच्या हातीं लागूं न देण्याच्या प्रयत्नांत शेवटीं बटवाच तिच्या हातांतून गळून धक्क्याच्या कडेवरून खालीं पाण्यांत पडला ! बटवा म्हणजे जनगीचें जीवन ! दर पांचदहा मिनिटांनीं तिला त्याची जरूर लागायाची, म्हणून ती तो नेहमीं हातांतच वागवी. अर्थात् वाफोरची शेवटची घंटा झाली, तरी खालीं पाण्यावर तरंगणारा बटवा परत मिळण्याची व्यवस्था झाल्याशिवाय ती धक्क्यावरून पाय उचलीना ! ‘ चल गे पापणी ! ’ असे तिच्या कानांशीं रागाचे शब्द कुजबुजून शेवटीं जेव्हां तिच्या धनिणीनें, सीताबाईनें, तिच्या दंडाला जोराचा चिमटा घेतला, तेव्हांच मोठ्या दुःखानें ती वाफोरांत शिरली. आतांपर्यंत घडलेल्या या प्रकारामुळें वाफोरांतील उतारूंमध्यें उठलेला हास्यध्वनी कानांवर येऊन बावरून गेलेली सीताबाई कडेवर असलेल्या तान्ह्या मुलासह घाईघाईनें जनगीमागोमाग जों वाफोरांत चढण्याचा प्रयत्न करते आहे, तोंच तिच्या पदराचा सोगा मागच्या बाजूला असलेल्या वाफोराच्या अरुंद दारांतील कडीला अडकला व तिला पुढें जातां येईना व मागें वळून सोगाही सोडवून घेतां येईना ! यावेळीं भुतेबाबांना पुढें होऊन चटकन् तो सोडवतां आला असता, पण भर चवाठ्यावर इतक्या लोकांसमक्ष आपल्या बायकोच्या पदराला स्पर्श करण्याइतका निर्लज्जपणा भुतेबाबांसारखा थोर, खानदानी व श्रीमंत घराण्यांतील हिंदु गृहस्थ कसा करील? कडींतून सोगा सोडवून घेण्याची आपल्या पत्नीची निष्फळ धडपड पहात व तिच्या गबाळपणाबद्दल मनांतल्या मनांत जळफळत ते स्वस्थ उभे होते ! सुदैवानें थोड्या वेळानें वाफोरावरील एक खलाशी पुढें झाला व त्यानें तिच्या पदराला दिलेल्या एका हिसक्यासरशीं सीताबाईची त्या अडचणींतून

मुक्तता झाली! इतक्यांत वाफोर सुटलाच व कशींबशीं भुतेबाब व डोक्यावर पाटी घेतलेला कामणू यांनीं वाफोरांत आपलीं शरिरें लोटून दिलीं!

कामणू व जनगी यांना तळमजल्यावरील दुसऱ्या वर्गात बसवून भुतेबाब सीताबाई व मुलें यांसहित वरच्या मजल्यावर पहिल्या वर्गात जाऊन तेथील खुर्च्यांवर बसले. वाफोर मिळाल्याबद्दल जरी त्यांना अत्यंत समाधान वाटत होतें, तरी सीताबाईविरुद्ध त्यांचें मन बरेंच खवळलें असल्याचें त्यांच्या मुद्रेवरून स्पष्टपणें दिसून येई!

तिच्याकडे पाठ करून व दुसऱ्या बाजूला तोंड फिरवून बराच वेळ ते स्वस्थ बसले होते. नंतर जणूं मनांतला संताप आवरत नसल्या-मुळेंच कीं काय ते एकाएकीं तिच्याकडे वळून व भुंवया वर चढवून हलक्या पण क्षुब्ध आवाजांत म्हणाले, "तुम्हां बेअकली बायकांचं हें नेहमीं असंच! एका मागोमाग एक गेले तीन दिवस तुझ्या मथराव-ण्यांमुळें वाफोर चुकला व योग्य वेळीं घरून निघण्याची तयारी ठेव-ण्यासाठीं मी आज सबंध दिवस यातायात केली नसती, तर आजही तो चुकला असता! गुरांचा सबंध तांडा हांकून नेणं सोपं! पण तुझ्या सारख्या एका अडाणी बायकोला घेऊन घराबाहेर निघणं म्हणजे महासंकट! कानाला वळ घालून घेतों, गळ्यांत तुझं हें लोढणं घेऊन आज पासून केव्हांही बाहेर गांवीं जायचं नाहीं!"

"पण सगळ्या दोषांचें खापर माझ्यावर कां फोडतां? मी काय करायचं होतं म्हणतां? आप्तांच्या घरीं गेलेलों! तेथें सर्व गोष्टी त्यांच्या कलानें घ्याव्या लागतात! काल सर्व तयारी झाली व अगदीं निघण्याच्या वेळीं मामींनीं शेंवत्यांच्या वेण्या आणल्या, त्यामुळें उशीर झाला. त्या न माळतां का निघायचं? परवांच्या दिवशीं घरून निघ-

तांना ओटी भरण्यासाठीं पेटींतून खण शोधून काढण्यांतच त्यांचा किती तरी वेळ गेला ! शिवाय आम्हां बायकांचा सारा जन्म स्वयंपाक घरांत गेलेला ! आम्हांला त्या तुमच्या घड्याळाच्या व वाफोराच्या वेळा कशा समजाव्या ?" भीत भीत एवढें बोलून आपल्या नवऱ्याच्या रागीट नजरेला नजर भिडविण्याचा हिय्या करवत नसल्यामुळें सीताबाईनें खालीं मान घातली !

तिच्या अपराधाचें व मूर्खपणाचें माप तिच्या पदरांत घालून पुनः तिच्यावर ताशेरा झाडण्याच्या विचारानें भुतेबाब आपली खुर्ची किंचित् तिच्याजवळ सरकवतात, तोंच खदखदां हंसण्याचा आवाज त्यांच्या कानीं आला ! त्यांनीं समोर पाहिलें, तों तेथें बसलेलें एक क्रिस्तांव तरुण जोडपें आपल्याकडे हेटाळणीच्या दृष्टीनें पहात व आपसांत कुजबुजत उपहासपूर्वक हंसत असल्याचें त्यांना आढळून आलें. त्या दोघांच्याही उंची व भपकेदार पोषाखावरून व त्यांच्या सफाईदार पुर्तुगेझ भाषेत चाललेल्या संभाषणावरून तो तरुण क्रिस्तांव गृहस्थ कोणी तरी बडा सरकारी अधिकारी असावा, हें कोणालाही ताडतां आलें असतें. आजूबाजूला बसलेल्या उतारूंना आपलें बोलणें ऐकूं न जावें म्हणून भुतेबाब व सीताबाई यांनीं जरी हळू बोलण्याची सावधगिरी घेतली होती, तरी त्यांचें भाषण त्या क्रिस्तांव जोडप्याच्या कानांवर गेल्यावांचून राहिलें नाहीं, ही गोष्ट लक्षांत येतांच तीं दोघेंही-जणें खजील झालीं.

*　　　*　　　*

" या इस्येंतीयांचें अस्मानी सुलतानी गाजवण्याचं सारं क्षेत्र म्हणजे त्यांच्या या स्त्रिया ! त्या क्षेत्राबाहेरील जगांत मात्र छाती पुढें करून चालण्याची यांच्यांत ताकद नाहीं ! हा कोणीतरी बडा प्रोप्रियेतायु

दिसतो ! पाहा कसा गुरकावून बोलतो आहे, आपल्या बायकोला ! जणूंकाय दिल्लीचा ग्रांव मोगोल किंवा आफ्रिकेचा गुंगान्यामाच ! ”

भुतेबाबांचें सीताबाईला उद्देशून चाललेलें रागाचें बोलणें ऐकल्यावर तो क्रिस्तांव गृहस्थ आपली पत्नी आलीस इच्या कानांशीं हे शब्द कुजबुजला.

“ खरंच ! ती कशी गोरंमोरं तोंड करून बसली आहे ! Coitada ! ( गरीब बिचारी ! ) ” आलीस उद्गारली.

“ ऐकलंस ! आपल्या बायकोची गुरांशीं तुलना करतो आहे ! पण बेट्याला माहीत नाहीं कीं अशा बायकांच्या नवऱ्यांची लायकीही गुराख्यांइतकीच ! हिंदुसमाजांतले हे श्रीमंत प्रोप्रियेतार्युसुद्धां आपल्या मुलींच्या लग्नसमारंभांत कलावंतिणीच्या नाचासाठीं व दारूकाम उडवण्यांत जेवढा पैसा उधळतात, त्याचा दहावा हिस्साही त्यांना शिक्षण देण्यांत खर्च करीत नाहींत ! fortes asnos ! (शुद्ध गद्धे !)”

आपल्या नवऱ्याचे उद्गार व त्याबरोबर त्याच्या तोंडून निघालेला तिरस्कारयुक्त हास्यध्वनि भुतेबाब व सीताबाई यांच्या कानीं गेलेला पाहून आलीस हलक्या आवाजांत त्याला म्हणाली “ जुवांव पुरे आतां ! आपण त्यांच्यासंबंधींच बोलतों आहोंत व त्यांनाच हंसतों आहोंत, हें त्यांच्या लक्ष्यांत आलं असावं. ती बाई तर बिचारी फारच नेर्व्होझ झालेली दिसते ! ” व दुसऱ्या बाजूला तोंड फिरवून अर्धवट स्वतांशीं व अर्धवट उघड,

Ninho de águia fica alto [ घरटें घारीचें उंच ।
Ninguém o pode alcançar तेथ न कोणाचा पोंच ! ।
Mais alto fico o meu bem परि माझा प्रीतीविषय ।
Custa tanto a la' chegar... उंच त्याहुनी ! दुष्प्राप्य ! ।]

हें आपल्या आवडत्या पुर्तुगेज गाण्यांतील कडवें गुणगुणण्यास तिनें सुरवात केली. जुवांवही बारीक शीळ वाजवीत तिची साथ करूं लागला.

नदीचें खाडीजवळचें विस्तृत मुख मागें टाकून अंतर्भागांतील नागमोडी वळणाच्या तिच्या अरुंद पात्रामधून वाफोर संथ गतीनें मार्गक्रमण करीत चालला होता. सूर्याचे कांहीं पळते किरण झाडांच्या शेंड्यांवर दिसत होते तेवढेच ! इतरत्र सर्व ठिकाणीं संधिप्रकाशाची रम्य झालर पसरायाला सुरवात झाली होती, व त्यामुळें नदीच्या दोन्ही बाजूंना दिसणाऱ्या नारळींनीं वेढलेल्या लहान लहान झोंपड्या, ठिकठिकाणच्या उंचवट्यांवर पायऱ्यापायऱ्यांनीं उभीं असलेलीं चिमुकलीं पण रेखींव शेतें, किनाऱ्याच्या बाजूला माळावरून सावकाश झोंपड्यांकडे चाललेले गुरांचे कळप व बांधांवरील कांदळीच्या झाडांच्या रांगेवर निरनिराळे टप्पे करीत घरट्यांकडे वळलेले पक्ष्यांचे जमाव, या सर्व सुंदर दृश्यांना विशेषच मोहकता प्राप्त झाली होती ! त्या रविवारीं केवळ करमणुकीसाठीं वाफोरांतून संध्याकाळची सहल करण्यासाठीं निघालेल्या जुवांव व आलीस यांची सौंदर्यपिपासु दृष्टि या आजूबाजूच्या देखाव्यावर स्थिर झाली होती. कांहीं वेळानें जुवांवच्या एका खांद्यावर आपले दोन्ही हात व त्यांवर आपली हनुवटी ठेवून आलीस म्हणाली, "ठिकठिकाणीं पसरलेल्या ह्या नद्यांच्या जाळयामुळें आपल्या गोव्याच्या सौंदर्यामध्यें केवढी भर पडली आहे, नाहीं जुवांव ?"

"हो ! तें खरं आहे. पण नदीभोंवतालच्या प्रदेशाची शोभा विचारशील, तर तुझ्या या प्रांताला मेत्रोपोलीची सर कधींही येणार नाहीं ! तेझ्यु नदीभोंवतालच्या सोब्रैरु व आझींज्यु झाडांच्या राई व गव्हांच्या व जोंधळयांच्या शेतांनीं व हिरव्याचार गवतानें आच्छाद-

लेल्या जमिनी किंवा दौरु नदीच्या दोन्ही तीरांवर दिसणारे ते द्राक्षांचे मळे, तुझ्या या माडांना सौंदर्याच्या बाबतींत केव्हांही चीत करतील!"

"छेः! मला नाहीं तसं वाटत! पुर्तुगालमधील देखाव्यांचीं अनेक चित्रें मीं पाहिलीं आहेत त्यांवरून कल्पना करणें कठीण नाहीं! माड म्हणजे सर्व वनस्पतींचा राजा! या माडांच्या सौंदर्यामध्यें दिसून येणारी भव्यता व मोहक साधेपणा त्या द्राक्षांच्या वेलींच्या मळयांमध्यें व गहूंजोंधळयांच्या शेतांमध्यें आढळून येणें मुळीच शक्य नाहीं. आतां तुमच्या दृष्टीला अतिपरिचित झाल्यामुळें बिचाऱ्या माडांचें सौंदर्य कमी प्रतीचें ठरतें ही गोष्ट वेगळी!"

"Valha-te Deus, (काय हा तुझा विलक्षण वेडेपणा,) आलीस! येथील प्रोप्रितार्यु वर्गांतील खुळया समजुतींचें व संकुचित वृत्तीचें तुला बाळकडूंच मिळालें आहे! जगांतील सौंदर्याचें, वैभवाचें व समृद्धीचें जणूं सारसर्वस्व म्हणजे हे माड ही तुमची ठाम समजूत! कारण त्यांच्या पलीकडे तुमच्या दृष्टीचा टप्पा कधींही जात नाहीं! अग, स्पेनमधून वाहात येणारी तेझ्यु नदी पुर्तुगालच्या हद्दींत शिरतांच तेथून 'इश्त्रे-मादूर पुर्तुगेझ' या नांवानें ओळखला जाणारा, अखंड वसंतऋतूनें नटलेला व दक्षिण युरोपाचा अत्यंत सुंदर भाग म्हणून नांवाजलेला जो प्रदेश सुरू होतो, त्याचें सतत पांच वर्षें दृष्टिसुख उपभोगलेल्या माझ्यासारख्या व्यक्तीसमोर का तूं आपल्या या भिकार माडांची महती गावीस? Que absurdo! (काय हा मूर्खपणा!)

लिस्बनपलीकडील सांतारेंच्या त्या उच डोंगरावर तूं उभी राहिलीस व तेथून लिस्बनच्या एका बाजूला समुद्रकिनाऱ्यापर्यंत उतरत आलेले लहान लहान डोंगर व मोंतिझ्युंतु पर्वत, तेर्मु, कार्कोव्हेलुश्-सारख्या नजीकच्या गांवांतील द्राक्षांचे मळे, नारिंगाच्या मळयांच्या

गर्द छायेनें झांकलेली व गुलाबाच्या ताटव्यांच्या सुगंधानें दरवळणारी कोलारिश्चची दरी व या सर्वापलीकडे पसरलेला तो अफाट समुद्र, यांवर तूं एकदां दृष्टि फेंकलीस तर गोव्यांतील निसर्गश्रीसंबंधींचा तुझा हा भलताच गर्व पार नाहींसा होईल !

त्याचप्रमाणें एका उंच टेकडीवर वसलेलें लिस्बनमधलें तें उपनगर सींत्र ! Um esplendor e um regalo para os olhos ! (ती आल्हादजनक शोभा कोणाच्याही डोळ्यांचें पारणें फेडील !) त्या टेकडीच्या पायथ्यापासून शेंड्यापर्यंत वळणावळणानें गेलेला व घनदाट तरुराजीच्या हिरव्या मांडवामुळें नेहमींच छायाच्छादित असणारा तो रस्ता ! Oh ! que linda ! ( अहाहा ! किती रमणीय ! ) त्या रस्त्याच्या दोन्ही बाजूंना शोभणारे फुलांचे सुंदर मळे ! ठिकठिकाणीं दिसणारे अनेक जलाशय व त्यांत क्रीडा करणारे ते हंस ! “ Fonte dos passarinhos' ('पांखरांचा निर्झर' ) नांवाचा तो मनोवेधक झरा ! सातशें वर्षांमागील पुर्तुगालच्या मूर जेत्यांच्या अद्भुतरम्य प्रेमविलासांच्या दंतकथांतून प्रचलित असलेल्या वर्णनांची पुनः पुनः आठवण करून देणारे त्यांच्या प्रासादांचे अजून कायम असलेले ते भव्य अवशेष ! गामा, आल्बुकेर्केसारख्या पुर्तुगालच्या राष्ट्रीय वीरांनीं जगाच्या निरनिराळ्या भागांतून आणलेल्या चार पांच शतकांमागील विजयचिन्हांपासून, तों अगदीं अलीकडील पदच्युत झालेल्या राजघराण्यांतील हतभागी दोना आमेलिया राणीनें आपल्या राज्ञीपदाच्या शेवटच्या रात्रीं उपयोग केलेल्या अर्ध्या जळालेल्या मेणबत्तीपर्यंत, विविध स्वरूपाच्या नव्याजुन्या मौल्यवान् वस्तू जेथें राखून ठेवल्या गेल्या आहेत, असें तें म्यूझियम् ! सींत्रचें नांव उच्चारलें, कीं कांहीं दिवसांमागें अतृप्त नेत्रांनीं पुनः पुनः पाहिलेलीं हीं सर्व दृश्यें डोळ्यांपुढें उभीं रहातात ! Que saudades que eù sinto ! ( त्यांसं-

बंधींच्या आठवणी किती गोड ! ) युरोपांतील सृष्टिसौंदर्याचीं सर्वोत्कृष्ट स्थानें धुंडाळलेल्या बायरनसारख्या सुप्रसिद्ध इंग्लिश कवीनें या सींत्रला ‘ Eden terreal ’ ( ‘ भूलोकावरील नंदनवन ’ ) म्हटलें आहे व अशा अनेक सौंदर्यसंपन्न स्थळांची देणगी निसर्गाकडून आमच्या मायभूमीला—पुर्तुगालला—लाभली आहे लक्षांत ठेव !”

“ पण बिचारा बायरन या आमच्या गोव्याला कुठं आला होता ? त्यानें हा प्रांत पाहिला असता तर सींत्रला दिलेली पदवी त्यानें या गोवाप्रांताला व विशेषतः आमच्या सोनकळी गांवालाच दिली असती !” जुवांवच्या बाहीला लागलेला एक डाग आपल्या हातरुमालानें पुसण्याचा प्रयत्न करीत विनोदी स्वरांत आलीस उत्तरली.

“ बायरन म्हणजे कविकोहिनूर ! पण त्याच्याही शब्दांवर तुझा विश्वास नाहीं ! असला वेडगळपणाचा दुराग्रह तुझ्यासारख्या घरकोंबड्या स्त्रीला चांगलाच शोभतो !” रागाचा आव आणून जुवांवनें लगेच तिला टोमणा दिला.

“ बायरनचें व त्याच्या काव्याचें श्रेष्ठस्थान मी तरी कुठें नाकबूल करतें ? त्याच्या ‘ Childe Harold’s Pilgrimage ’ या काव्यांतल्या कांहीं ओळी, कांहीं दिवसांमागें मी व्हितोरीनकडे गेलें होतें, तेथें त्यानें मला वाचून दाखवल्या. त्या मला फारच आवडल्या. पुर्तुगाल व पुर्तुगेज लोक यांसंबंधींचे बायरनचे त्यांतील उद्गार तुला मान्य असतीलच !

“ Poor, paltry slaves ! yet born ’midst noblest scenes
Why Nature waste thy wonders on such men ?”

(" दीन, दरिद्री गुलाम ! सृष्टिश्रीमधिं परि यां वसती ! ·
उधळिसि कां बा ! निसर्गा, तुझ्या चमत्कृती यांवरती ?")

—०— —०—

" A nation swollen with ignorance and pride
Who lick yet loathe the hand that waves the sword !"

(" अज्ञानामधि बुडे राष्ट्र हें, दर्पोन्मादें ग्रस्त !।
विद्वेषिति परि चुंबिति जन हे, खड्गधारि जो हस्त !"।)

—०— —०—

......" This purple land where law secures not life "

[........" वैभवभू ही जेथ न शासननीतिहि जीवित रक्षी !" ]

भिवया उडवीत, किंचित् हस्तविक्षेप करीत व मधून मधून कांहीं विशिष्ट शब्दांवर जोर देत चेष्टेखोर सस्मित मुद्रेनें आलीसनें येथवर बायरनच्या काव्यांतील चरण म्हटले न म्हटले तोंच.जुवांवच्या तोंडून रागाचे शब्द निघाले, " Basta ! (बस्स कर !) त्या मूर्ख बायरनचे हे उद्गार साफ खोटे आहेत ! त्यांत तथ्य असतं, तर युरोपच्या एका कोंपऱ्यांतील मूठभर पुर्तुगेज लोकांना चार शतकांमागें जगांतील आधुनिक सुधारणेच्या नव्या युगाला आरंभ करण्याचा अपूर्व मान मिळाला नसता व चारी खंडांवर त्यांचें स्वामित्व गाजलं नसतं ! वास्तविक यांतली 'अंदरकी बात' अशी आहे कीं, हा बायरन कवि म्हणजे एक रंगेल गडी होता ! फुलपांखराप्रमाणें युरोपांतील निरनिराळ्या देशांत भटकून इष्काचे नाजूक खेळ खेळण्याचा त्याला भारी नाद ! पण त्याच्या लंगडेपणाच्या शारीरिक व्यंगामुळें पुर्तुगालांत मात्र त्याची कोणा प्रियपात्रानें चांगलीच निराशा केली असावी ! आपल्या

काव्यांतून पुर्तुगेज लोकांवर त्यानें आग पाखडण्याचें कारण हेंच ! तुझ्या डोक्यांत या कांहींतरी वेड्या गोष्टी भरवून देणारा तो तुझा मामेभाऊ व्हितोरीनु म्हणजे शुद्ध नंदीबैल आहे ! शिगे मोडून अलीकडे नासि-योनालिश्तांच्या गोटांत शिरल्यापासून लुझो-फोबियानें त्याला पछाडल आहे ! नासियोनालिश्त म्हणवून घेणं ही इकडच्या सुशिक्षित ख्रिस्ती लोकांमधील एक नवीन फ्याशनच होऊं पाहात आहे ! "

" हें तुझं कांहीं तरीच ! व्हितोरीनु अलीकडे खराखुरा नासियोना-लिश्त बनला आहे ! गेल्या आठवड्यांत त्यानें दांस दिला होताना ? त्यावेळीं स्वारी धोतर नेसूनच सालांत आली, व त्यावेळीं मंडळीमध्यें त्यानें इतका हंशा पिकवला, कीं पुसण्याची सोय नाहीं ! त्यानें आपल्या शेवटच्या तान्ह्या मुलीला शकुंतला हें हिंदु नांव ठेवलें आहे, तुला माहीत आहेना ? "

" अग, सरड्याचा रंग तीन दिवस ! व्हितोरीनचे हे नासियोना-लिश्मुचे ढंग सध्यांचा त्याच्या खात्यांतील मवाळ वरिष्ठ अधिकारी जाऊन, पुर्तुगालहून येऊं घातलेला लष्करी बाण्याचा नवीन मुख्याधिकारी आला, म्हणजे पार नाहींसे होतील ! त्याचा ढोंगीपणा मी पुरा जाणून आहें, धोतर नेसतो ! मुलांना हिंदु नांवें ठेवतो, पण दारू झोंकून गटा-रांत लोळणं मात्र चालूच आहे ! "

इतक्यांत, जुवांवच्या रागाचा पारा बराच वर गेला आहे व तो आतां व्हितोरीनवर भरपूर तोंडसुख घेतल्याशिवाय राहात नाहीं हें जाणून तें टाळण्यासाठीं मध्येंच आलीस म्हणाली, " जेव्हां तेव्हां बिचाऱ्या व्हितोरीनवर तुझा दांत ! आणि तें साहजिक आहे ! व्हितोरीनु इंदि-याविषयीं मनांत प्रेमाची भावना बाळगणारा व ती उघडपणें बोलून दाखवणारा ! तर स्वतःच्या खऱ्याखुऱ्या मायभूमीला विसरून जाऊन, पुर्तुगालला मायभूमी मानण्याइतका त्या देशाचा व तेथील लोकांचा

तुला दांडगा अभिमान ! इंदियामध्यें तुझ्या दृष्टीला अशी एकही गोष्ट दिसावयाची नाहीं कीं, जिचा तुला अभिमान वाटेल, जी तुला आवडेल ! !"

" हो बुवा ! तें कबूल करतों. इंदियामधील एकुणएक गोष्टींबद्दल माझ्या मनांत तिरस्काराशिवाय दुसरी कोणतीही भावना नाहीं ! खरं आहे ! " किंचित् वरमून जाऊन हे शब्द उच्चारीत असतां जुवांवच्या चेहऱ्यावर सौम्यतायुक्त स्मित झळकू लागलें व तो पुढें म्हणाला, " नाहीं म्हटल्यास याला एक अपवाद आहे ! इंदियामधील एकच वस्तू मला मनापासून आवडते ! तिच्यामध्यें अशी मोहक जादू भरली आहे "—

" ती वस्तू कोणती ? " आलीसनें उत्सुकतेनें प्रश्न केला.

जुवांवनें हातांतील चिरूटाचा एक झुरका घेतला व धूर सावकाश बाहेर सोडल्यावर किंचित् थांबून हंसत हंसत तिला उत्तर केलें, " तूं ! "

आलीसच्या तोंडावर लगेच लज्जेची तांबुस छटा व्यक्त झाली.

" Que lisogeiro ! " ( " काय पण स्तुतिपाठकपणा ! " ) असे दोनचार तुटक शब्द तिच्या तोंडांतून निघाले व उल्लसित वृत्तीनें आपल्या हातांतील पंख्याचा एक नाजूक फटकारा तिनें आपल्या वल्लभाच्या नाकावर मारला !

अशा रीतीनें एवढा वेळ त्यांच्यामध्यें चाललेल्या वादविषयाचा जुवांवनें आपल्या या गोड विनोदानें केलेला शेवट म्हणजेच आपोआप झालेला त्यांच्या प्रेमकूजनाचा आरंभ होता. त्यानें आपल्या हातांतील चिरूट झटकन् बाहेर फेंकला, तिला किंचित् बिलगून तिच्या हाताचीं बोटें हलकेच आपल्या हातांत गुंफलीं व तिच्या खांद्यावर वांकून व तिच्या हंसऱ्या तोंडावर आपली नजर स्थिरावून तो बोलला,

“आलीस ! Meu amor ! (जिवलगे !) बोल हें मी म्हणालों तें खरं ना ? मेनेझिसच्या घरीं सुओरेच्या प्रसंगीं तुझी माझी पहिल्यांदाच भेट झाल्यावेळीं प्रफुल्लित मनानें व्हाल्सा नाचाचा रंगबहार लुटतां लुटतां इतर मंडळीची नजर चुकवून मी तुझ्या कानांत उच्चारलेले ते शब्द, तुला आठवतात का ?”—

पण एवढे शब्द जुवांवच्या तोंडून निघाले नाहींत, तोंच शेजारीं भुतेबाबांच्या दोघां मुलांनीं एकाएकीं आपल्या रडण्याचा एवढा मोठा कल्लोळ माजवला कीं, त्यामुळें जुवांव व आलीस यांना आपल्या कानगोष्टी चालू ठेवणें मुळींच शक्य होईना ! जुवांवच्या चेहऱ्यावरील सौम्यता व प्रफुल्लता पार नाहींशी होऊन त्याच्या कपाळावर आतां आंठ्यांचें जाळें पसरलें ! आलीसपासून बाजूला होऊन व ताठ बसून तो स्वतःशींच पुटपुटला, “ शेजारीं असे हे हिंदु उतारु असणें म्हणजे काय शिंचा त्रास आहे !”

इतक्यांत वाफोराच्या कठड्याजवळ नेण्याबद्दल हट्ट धरून बसलेल्या उपीनें तोंड मिटावें, म्हणून भुतेबाबांनीं खालच्या मजल्यावरून कामणूला वर बोलावलें व त्याला त्याच्या स्वाधीन करून त्याची मागणी पुरी केली. उपीच्या तान्ह्या बहिणीच्या केंकाटण्यावर मात्र भुतेबाबांना कोणताही तोडगा सांपडेना ! गेला तास दीड तास मधून मधून व आतां एकामागून एक तिच्या तोंडून निघणाऱ्या किंचाळ्यांना तसेंच सबळ कारण होतें व त्याची सीताबाईला जाणीवही होती. पाजण्याची वेळ टळून गेल्यामुळें त्या लहानग्या जीवाची होत असलेली तळमळ हाच त्या रडण्याचा अर्थ हें तिच्या आईला कळल्यावांचून कसें राहील ? पण मुलाला पाजण्यासारखी गोष्ट अशा सार्वजनिक स्थळीं आजूबाजूला बसलेल्या पुरुषमंडळीच्या देखत करण्याचा प्रसंग आल्यावर त्यांतून

पार पडण्याइतका धीटपणा व चातुर्य सीताबाईसारख्या पांढरपेशा वर्गातील एका हिंदु स्त्रीच्या अंगीं दिसून येतें, तर ती एक मोठीच आश्चर्याची गोष्ट म्हणावी लागली असती. स्त्रियांचें जग त्यांच्या स्वयंपाकघरापुरतेंच मर्यादित करून त्यांच्या रक्षणाची स्वतःवरील जबाबदारी पार पाडणें हाच ज्या हिंदुसमाजांतील पुरुषार्थ, त्या समाजांत सीताबाईचें सबंध आयुष्य गेलेलें ! भुकेमुळें तान्ह्या मुलीचे होत असलेले हाल पाहून जरी तिचें अंतःकरण तुटत होतें, तरी त्या वेळीं त्याला पाजणें म्हणजे तिला एक जिवावरचें संकटच वाटल्यामुळें त्या गोष्टीची तिनें गेले दोन तीन तास एकसारखी टाळाटाळ चालवली होती ! वाफोरांत बाजूला आडोशाची जागा नव्हती असें नाहीं. पण ती तिच्या कशी लक्ष्यांत यावी ? व आली असतीही तरी आपली खुर्ची सोडून त्या ठिकाणीं जाऊन मुलीला पाजण्याइतकें, परक्या व त्यांतही क्रिस्तांव पुरुषमंडळीदेखत मोकळेपणानें वावरण्याचें धाडस तिच्या अंगीं कसें यावें ?

पण कितीही झालें तरी आईचें हृदय ! मुलीच्या किंचाळयांमधील स्वर अधिकाधिक केविलवाणा होऊं लागतांच तिच्या अपत्यप्रेमाची भावना अखेरीस तिच्या हिंदु शालीनतेहूनही प्रबळ ठरली ! त्या भावनेच्या उचलीसरशीं तिनें आपली खुर्ची उलट दिशेला फिरविली, कारण त्या बाजूला उतारू नव्हते, व एकदांची मुलीला पाजायाला सुरवात केली ! एवढयानेंही संकोचातिशयामुळें तिचा चेहरा लगेच आरक्त झाला व घामानें डबडबून गेला !

खुर्ची दुसऱ्या बाजूला फिरवून समोरच्या उतारूंकडे पाठ फिरवून बसण्याची क्षुल्लक गोष्ट ! पण त्यामुळें, बसतां उठतां 'एतिकेत'चे लहानसहान नियम पाळण्यांतही दक्षता बाळगणें, हें ज्यांच्या पाश्चात्य

सुधारणेचें प्रमुख अंग, त्या जुवांवसारख्या उच्च विलायती वर्गातील क्रिस्तांव गृहस्थाच्या दृष्टीनें सीताबाईकडून एक अक्षम्य प्रमाद घडला! त्या बिचारीला मात्र त्याची कल्पनाही नव्हती!

आलीस बरोबर नुकत्याच सुरू झालेल्या आपल्या गोड संभाषणांत व्यत्यय आल्यामुळें जुवांव आधींच चिडलेला! त्यांत आणखी सीताबाईकडून झालेल्या या शिष्टाचारातिक्रमाची भर पडली!

" Apre! Isto é demais! (हा तर अतिरेक झाला!) पाहा हा इंदियेंतील शिष्टाचाराचा मासला! अंगावर सोन्याच्या दागिन्यांचें मणभर ओझें वागवणारी ही Senhora (बाईसाहेब) माझ्याकडे बिनदिक्कत पाठ फिरवून बसली आहे! हा प्रकार पुर्तुगालमध्यें घडता तर!—" आलीसकडे वळून हलक्या आवाजांत तो चडफडत बोलला, व सीताबाई व भुतेबाब यांजकडे डोळे वटारून पाहात अर्धवट स्वतःशीं व अर्धवट उघडपणें इंदियेवर व हिंदुसमाजावर मधून मधून शेलक्या विशेषणांची सरबत्ती त्यानें चालू ठेवली.

आपल्या धनिणीकडे रोखून पहात फिरंगी भाषेत रागानें कांहीं शब्द पुटपुटणाऱ्या क्रिस्तांव गृहस्थाकडून तिचा उपमर्द होतो आहे ही गोष्ट कांहीं अंतरावर उपीला खेळवीत उभ्या असलेल्या कामणूच्याही लक्षांत आली, मग भुतेबाबांना तिची भरपूर जाणीव होती, हें सांगावयाला नकोच! पण कानांवर केंसट्या ओढून जुवांवच्या तोंडून निघणारे शब्द मुळींच ऐकले नसल्याची बतावणी करणें हाच मार्ग त्यांना या बाबतींत शहाणपणाचा वाटला. आश्चर्याची गोष्ट ही कीं, कामणूला मात्र जुवांवचें हें वर्तन सहन होईना! भुतेबाबांप्रमाणेंच त्याच्याही मनावर फिरंगी बूटपाटलुणीच्या दराऱ्याचें दडपण नव्हतें असें नाहीं, पण कामणू म्हणजे एक अडाणी कुणबी! स्वाभिमानाचा लवलेशही

राहूं न देणारे सुधारणेचे संस्कार त्याच्या धन्याप्रमाणें त्याजवर झालेले नव्हते.

"तूं एवढा बडा दोतोर ! आणि बायकांना उणेवांकडे शब्द बोलतोस ? मोठमोठीं फिरंगी पुस्तकें वाचलींस त्यांचा हाच का उपयोग ?" जुवांवला उद्देशून उच्चारलेल्या या शक्य तितक्या सौम्य शब्दांनीं शेवटीं कामणूनें आपला राग व्यक्त केलाच !

जुवांव असें कांहीं कुमपट निघण्याची वाटच पाहात होता ! त्याला एवढेंच पुरे झालें ! "Ora o insolente ! o petulente !" (बेमुर्वतखोर, उद्धट !) असें मोठ्यानें ओरडून दांत ओंठ चावीत त्यानें कामणूकडे धांव घेतली व त्याजवर लाथाबुक्क्यांचा वर्षाव सुरू केला ! पण त्याच्या क्रोधाची मजल एवढ्यावरच थांबली नाहीं !

"Perdoe senhor Doutor !" ("दोतोर माफ करा !") असे आपल्या नोकराच्या वतीनें गयावया करीत भुतेबाब उभे राहून जों दोनचार शब्द उच्चारण्याचा हिय्या करतात, तोंच जुवांव त्यांच्याकडे वळला व "या गावड्यासारखें जंगली जनावर आमच्यासारख्या सिव्हिलिझाद समाजांत येतेवेळीं बरोबर न आणण्याबद्दल तुलाही आठवण राहाणें जरूर आहे !" असे त्वेषानें उपहासयुक्त उद्गार काढून त्यानें त्यांजवरही एक जोराची थप्पड लगावली !

"कोणताही अपराध नसतां मज गरिबावर लाथा हाणल्यास ! देव असला तर ही गोष्ट पाहून घेईल !" या शापवाणीनें व त्या मागोमाग जुवांवला ऐकूं न येईल इतक्या अस्पष्ट आवाजांत उच्चारलेल्या एक दोन इरसाल कुणबाऊ शिव्यांनीं तरी कामणूनें आपल्यावर बसलेल्या लाथांचें उसनें फेडलें. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, गर्भश्रीमंत घराण्यांतील व सुशिक्षित अशा त्याच्या धन्याकडून जुवांवला तेवढा शाब्दिक प्रतिकारही झाला नाहीं !

झालेल्या प्रकाराबद्दल भुतेबाबांना दुःख व शरम वाटली नाहीं, असे नाहीं, पण त्या दोन्ही गोष्टींपेक्षां एवढें मोठें संकट एक थप्पड खाण्यावरच निभावलें, याबद्दल मनांत वाटत असलेल्या समाधानाची भावनाच त्यांच्या चेहऱ्यावर जास्ती मुद्रित झालेली दिसत होती !

आपल्या पतीवर व कामणूवर इतका वाईट प्रसंग येण्यास स्वतः-कडून झालेली कांहींतरी चूकच कारण झाली आहे, हें एवढ्या वेळांत सीताबाईच्या लक्षांत आलें असल्यामुळें तिची मात्र यावेळीं अत्यत करुणास्पद स्थिति झाली ! भीतीनें ती जागच्या जागीं थिजून गेली ! एवढा वेळ खालीं वांकलेल्या तिच्या मानेनें आतां तर तिची हनुवटी छातीलाच नेऊन भिडविली ! दुःखानें तिच्या डोळ्यांतून वाहाणारीं आंसवें पोटाशीं धरलेल्या तिच्या तान्ह्या मुलीवर गळूं लागलीं !

आजूबाजूच्या दोघां चौघां क्रिस्तांव स्त्रीपुरुषांच्या मनांत यावेळीं त्या पतिपत्नीबद्दल सहानुभूतीचा ओलावा उत्पन्न झाल्याशिवाय राहिला नाहीं. त्यांपैकीं एकजण जुवांवच्या कृत्याचा निषेध व भुतेबाबांचें शांतवन या दोन्ही अर्थांनीं भरलेले कांहीं शब्द पुटपुटला. दुसऱ्या एक-दोघांनींही आळीपाळीनें जुवांवकडे तिरस्काराचा व भुतेबाबांकडे दयार्द्रतेचा दृष्टिपात करून आपल्या मनांतला भाव व्यक्त केला. एका पोक्त वयाच्या बाईनें तर जुवांवला उद्देशून " सायबा भोगोस ! " असे उद्गार काढले व सीताबाईजवळ आपली खुर्ची सरकवून "माझे मुली ! बहिणी ! " या मायेच्या शब्दांनीं तिला संबोधित ती तिची समजूत करूं लागली.

शहरांतील फिरंगी वातावरणांतील दूषित संस्कारांचा मनावर पूर्ण-पणें पगडा बसलेल्या इतर बऱ्याच क्रिस्तांव उतारूंनीं मात्र जुवांवच्या या बहादुरीबद्दल हंसऱ्या व सूचक नजरेनें कौतुक व्यक्त केलें. मिलि-

टरी पेशाच्या दोघां देस्सेंदेंत बच्चांनीं तर " Bravo!" असें ओरडून त्याला शाबासकी बहाल केली !

पहिल्या वर्गाच्या त्या मजल्यावर तिघेचौघे हिंदु उतारूही होते. त्यांचें मात्र या वेळचें वर्तन नमुनेदार होतें ! त्यांच्या डोळ्यांदेखत घडलेली गोष्ट, पण ती बेट्यांच्या लक्षांतच आली नाहीं ! एकाला नेमकी याच वेळीं डुलकी आली व त्यानें आपले डोळे मिटले ! दुसऱ्याची मान विरुद्ध दिशेकडील सृष्टिसौंदर्याकडे वळली व बराच वेळ तिकडेच खिळून राहिली ! तिसऱ्याचें मन त्याच्या हातांतील भगवद्गीतेच्या वाचनामुळें बाह्य जगाला पूर्णपणें विसरून गेलें होतें, याला त्याच्या तोंडून त्याच वेळीं उच्च कंठानें श्लोकपाठ सुरू झाला, याहून दुसरा कोणता पुरावा हवा होता ? भुतेबाबाला लागून बसलेल्या चौथ्या एका भाटकाराच्या अंगाला मात्र शेजारीं घडलेल्या या प्रकाराच्या अस्तित्वाची जाणीव चिकटलीच ! कारण जुवांवच्या थप्पडीमुळें तोल जाऊन भुतेबाब प्रत्यक्ष या भाटकाराच्याच अंगावर आदळले होते ! अर्थात् 'सत्तेपुढें शहाणपण चालत नाहीं !' 'बळी तो कान पिळी !' या व अशाच प्रकारच्या आणखी एक दोन वचनांचा मोठ्या कष्टानें हलक्या आवाजांत उच्चार करण्याचें भुतेबाबांसंबंधींचें आपलें कर्तव्य बजावण्यावांचून त्यास गत्यंतर नव्हतें !

आश्चर्याची गोष्ट ही कीं, जुवांवच्या या पशुतुल्य वर्तनाविरुद्ध खरोखरी तीव्र तिरस्कार कोणी दाखवला असेल, तर तो प्रत्यक्ष त्याची पत्नी आलीस इनें !

आपलें शतकृत्य आटोपून जुवांव विजयी मुद्रेनें आलीसकडे पाहातो तों ती त्याला संतापलेली दिसून तो किंचित् खजिल झाला. तो आपल्या खूर्चीवर जाऊन, बसला व कांहीं वेळानें आलीसकडे पुनः

संभाषणास सुरवात करण्याच्या उद्देशानें तिजकडे वळून आपला हात त्यानें हलकेच तिच्या खांद्यावर ठेवला, तोंच आलीसच्या तोंडून शब्द निघाले, " Deixa-me !" (" चल, जा ! ") व झिडकाऱ्यानें तिनें त्याजकडे आपली पाठ फिरविली. तिचे हे दोनच साधे शब्द ! पण त्यांत भरलेला गर्भितार्थ जुवांवच्या मनाला झोंबल्यावांचून राहिला नाहीं ! त्याचा चेहरा लगेच काळवंडून गेला !

थोड्यावेळानें वाफोर एका बंदरावर येऊन पोंहोंचला. येथेंच भुतेबाबांना उतरावयाचें होतें. वाफोर धक्क्याला लागला न लागला, तोंच भुतेबाबांच्या घरचे कारभारी, एक कारकून व दोघेतिघे गडी घाईघाईनें वाफोराच्या पहिल्या मजल्यावर घुसले.

"घ्यारे मुलांना खालीं. नीट सांभाळा त्यांना !" कारभारी गड्यांना म्हणाले. "या सूनबाई ! अंगावरचे दागिने वगैरे सर्व व्यवस्थित आहेतना ? धक्यावर पाय जपून ठेवा बरं ! हा वाफोरांतील संबंध अडीच तीन तासांचा प्रवास म्हणजे बायकांवर तर मोठाच बिकट प्रसंग ! किती धोका ! किती त्रास ! तरी बरं ! आमच्या सूनबाई इतर बायकांसारख्या नाहींत ! चार ठिकाणीं फिरलेल्या ! धीट ! सुटसुटीत ! म्हणून तर कुठंही त्यांना बरोबर घेऊन जायाला भुतेबाबांना जड नाहीं वाटत !" भुतेबाब व सीताबाई मुलांसहित वाफोरांतून उतरेपर्यंत कारभाऱ्यांची ही अशी गोड टकळी चालली होती ! त्यांची कर्तव्यतत्परता त्यांस गप्प कशी राहूं देईल ? व भुतेबाबांसारख्या भाटकाराच्या कारभाऱ्यांना धन्याच्या खुषामतीवांचून अधिक महत्वाचें असें दुसरें कोणतें कर्तव्य बजावायाचें असतें ?

बंदरावर भुतेबाबांना न्यायाला भोई माचील घेऊन आले होते. बंदरापासून भुतेबाबांचा वाडा दहाच मिनिटांच्या अंतरावर होता. नुकताच दिवस मावळला होता. रस्त्यावर भरपूर रहदारी होती.

संध्याकाळच्या वाऱ्याची आल्हाददायक शीतळ झुळूक मधून मधून अंगाला स्पर्श करीत होती.

पण कारभाऱ्यांनीं हुकूम दिला, " पेटवारे चुड्या ! माचिलाच्या दोन्ही बाजूंस दोन दोन ! कुठं आहेत भोई? उचला माचील! पळा! वेळ पडली ही अशी अपरात्रींची ! लेकांनो एक एक कट्टी फेणी तर आगाऊच वसूल केली आहांत ! मग दिरंगाई कां ?—एऽ कामणू? तुझं डोकं ठिकाणावर आहे कीं नाहीं? भुतेबाबांना व सूनबाईंना हा गार वारा बाधेल ना? सोड तो माचिलाचा पडदा नीट खालीं ! "

लगेच माचील चालू झालें, व थोड्या वेळानें भोयांनीं भुतेबाबांचा वाडा गांठला.

*          *          *

वरील हकिकत घडून सात आठ दिवस लोटले. भुतेबाब आज त्यांच्या गांवापासून अर्ध्या पाऊण कोसांच्या अंतरावर असलेल्या कोंसेल्याच्या शहरांत जावयाला निघाले होते. गेले तीन चार तास त्यांच्या वाड्यासमोर एक माचील व भोई दिसून येत असून मैंडोळया केळ्यांचा घड व आंबे यांनीं भरलेली आपली भली थोरली पाटी माचिलाच्या शेजारीं ठेवून कामणूही तेथें उभा होता.

संध्याकाळीं चारांच्या सुमारास भुतेबाब वाड्याबाहेर निघाले. रडतराउती मुद्रा त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्टपणें दिसून येत होती. त्यांच्या इच्छेविरुद्ध त्यांना न झेंपणारी एखादी जोखीम आज त्यांच्यावर कोणी तरी लादली होती खास.

ते माचिलांत बसले व त्रासिक स्वरानें ' हं ! ' असा शब्द उच्चारून त्यांनीं भोयांना निघण्याबद्दल इशारा दिला. भोई माचील उचलणार तोंच वाड्याच्या बल्कांवावरून क्षीण पण उंच आवाजांत कोणीं हांक मारली, " भुतोऽ !—"

भोई थांबले व आपसांत पुटपुटले, "थोरले भाटकार थांबायाला सांगताहेत !"

एक दोन मिनिटांत साठपांसष्ट वर्षें वयाचे भुतेबाबांचे वडिल झिलुबाब लगबगीनें बल्कावांच्या पायऱ्या उतरून बाहेर माचिलाजवळ आले. शहरांतील एका अत्यंत महत्वाच्या कामगिरीवर त्यांनीं आज भुतेबाबांची योजना केली होती. गेले दोन तीन दिवस त्या कामगिरी-संबंधींचा अष्टौप्रहर खल चालवून त्यांतील सर्व खांचाखोंचा आपल्या चिरंजीवांच्या गळीं उतरवण्याचा झिलुबाबांनीं शिकस्तीचा प्रयत्न केला असला तरी अगदीं शेवटच्या क्षणाला कांहीं नाजूक मुद्दे पुनः भुते-बाबांच्या मनावर ठसवण्याची आवश्यकता त्यांना भासलीच !

असलेलें नसलेलें गांभीर्य आपल्या तोंडावर व्यक्त करून ते म्हणाले, "भुतोऽ, देलेगादसाहेबांस एक गोष्ट मात्र अवश्य सांग ! म्हणावं, केळ्यांबरोबर थोडे चांगलेसे मासेही पाठवायाची फार इच्छा होती व म्हणून आज सकाळीं इकडे तिकडे माणसें दवडून मासे पैदा करण्याची शर्थ केली !—पण कालपासून जोरगत सुरू झाल्यामुळें एकाही खारव्याच्या जाळ्यांत मोठी मासळी तर सोडाच, पण वेल्ली-बुरांटोसुद्धां सांपडला असल्यास शपथ !—तसेंच हें पाहा ! त्यांचा बाप दियोग आंद्राद याचा व आमचा कांहीं वर्षामागें किती घरोबा होता, याची त्यांना नीट जाणीव करून दे !—"

"पण आपल्या लहानपणांतील त्या गोष्टींची त्यांनीं मुळीं आठवणच ठेवली नसली तर !" भुतेबाबांनीं घाबरट स्वरांत विचारलें.

"असं कसं होईल ? दियोग आंद्रादला आतां चांगले दिवस आले आहेत ! थोरला मुलगा आफ्रिकेमध्यें व्यापारांत खोऱ्यानें पैसा ओढतो आहे व दुसरा तर हा आतां पुर्तुगालहून देलेगादच होऊन आला आहे !

पण हें सारं अलीकडे ! या पांचदहा वर्षांपासून शहरांत जाऊन तो थाटामाटानें राहूं लागला आहे म्हणून सोडा, नाहींतर मूळचा तो आमचा आश्रित ! त्या आमच्या गोडआवळी भाटांतल्या जुन्या पडक्या घरात तो सतरा वर्षे राहिलेला ! मेणबत्त्या करण्याचा त्याचा तुटपुजा धंदा ! बिचाऱ्याची इतकी ओढघस्तीची स्थिती की, महिन्या दोन महिन्यांनीं माझ्याकडून पांच दहा रुपये मागून न्यावे, हा त्याचा नेहमीचा प्रघात ! शिवाय हा देलेगाद होऊन आलेला त्याचा मुलगा म्हणजे सुरवातीपासून तुझा शाळेतला सोबती ! तुला आठवत नाहीं का ? पणजीला तुम्ही एकाच वर्षी लिसेवांत दाखल झालां. बाकी पुढं तुझं लग्न होऊन संसाराचा भार शिरावर पडल्यामुळें एक दोन वर्षांत लिसेव सोडून तुला घरीं यावं लागलं व इकडचा कुर्स पुरा करून तो पुर्तुगालला गेला ही गोष्ट सोडून द्या, पण कांहीं झालं तरी त्यांना तुझी ओळख पटल्यावाचून राहाणार नाहीं. निदान त्यांना एवढं तरी आठवत असेल, कीं ते पुर्तुगालला जावयास निघाले त्यावेळीं त्यांच्या पोशाखासाठीं म्हणून दियोगानें गयांवयां करून माझ्याकडून शंभर रुपये उसनवार नेले होते—ते मग त्यानें कधींही परत केले नाहींत, म्हणा—! ''

“ बडा अधिकार प्राप्त झाला म्हणजे या मंडळीला या अशा मागील गोष्टींची थोडीच आठवण राहाते ! ”

भुतेबाबांच्या या शब्दांत त्यांच्या वडिलांना भरपूर तथ्यांश दिसला. तशाप्रकारचे अनुभव त्याना आपल्या आयुष्यांत कितीतरी आले होते. पण तें कबूल करून आपल्या चिरंजीवांच्या या निराशावादास उत्तेजन देणें त्याना इष्ट वाटलें नाहीं. किंचित् कानउघाडणीच्या स्वरांत ते म्हणाले, “कुठल्याही कामाला निघालास कीं आधीं तुझीं हीं रडगाणीं ठेवलेलीं ! समजा, तूं म्हणतोस तसंच झालं ! देलेगादसाहेबांनी पूर्वपरिचय अजिबाद गुडाळून बाजूला ठेवला ! पण ही भेट तर तूं बरोबर

नेतो आहेसना ? चांगला हातभर लांबीच्या मैंडोळया केळयांचा घड पाटींत! मग त्यांच्याशीं पुनः नवीन स्नेहसंबंध जोडणें कठिण का आहे ?"

"आणि गेल्या वर्षासारखा प्रकार घडला तर ? तुमच्या सांगण्या-वरून त्या जुवीजाला अशीच भेट घेऊन भेटायाला गेलों होतों. तों त्यांनीं भेटीचा स्वीकार केला नाहीं, इतकंच नव्हे तर आपल्या बागेच्या फाटकांतूनच मला परत फिरवलं !"

"तुला व्यवहारज्ञान कमी म्हणतों, तें एवढयाचसाठी ! तो जुवीज एक तसा आडमुठा भेटला ! तो होता युरोपियन ! युरोपियनांत-सुद्धां तशी व्यक्ति क्वचितच आढळायाची ! पण आमच्या या नेटिव्ह अधिकाऱ्यांपैकीं कोणी अशा प्रकारें एखाद्याकडून आलेली भेट स्वीका-रली नाहीं, असं घडलेलं कधीं ऐकलं आहेस का तूं ?"—

"शिवाय गेल्या वर्षी त्या जुविजानें काय काम आहे, असा प्रश्न केला व कामकाज नसतां निष्कारण भेटायला आल्याबद्दल, ते त्यावेळी माझ्यावर असे कांहीं संतापले !—तसंच या देलेगादसाहेबांनींही आज केलं म्हणजे चांगलीच शोभा व्हायची ! !—"

"पण त्यांनीं कामासंबंधीं प्रश्न केलाच तर तेवढया वेळेपुरती एखादी दुसरी सबब सांगण्याइतकेंही प्रसंगावधान तुझ्या अंगीं नाहीं का ?" झिलुबाबा थोड्याशा उद्वेगानें म्हणाले ! "तो गेल्या आठ-वड्यांत वाफोरांत घडलेला प्रसंग !—म्हणावं आम्ही थोरामोठ्या घराण्यांतील माणसं ! त्या क्रिस्तांव गृहस्थाच्या दंडेलीविरुद्ध खटला भरून त्यास अद्दल ही घडवलीच पाहिजे ! त्या बाबतींत कायद्याचा सल्ला विचारायाला आलों आहें—बाकी तसल्या त्या क्षुल्लक कारणासाठीं खटल्याच्या फंदांत कोण पडतो आहे म्हणा ! या शिरजोर भाऊ-

बंदांना वठणीवर आणण्यासाठीं कोर्टकचेऱ्यांची यातायात नेहमींचीच मागं लागली आहे तेवढी पुरे झाली !—"

एवढ बोलून आपल्या चिरंजीवांच्या वाढत्या शंकाकुशंकांना आणखी वाव देऊं नये, या हेतूनें त्यांनीं भोयांना निघण्याबद्दल सूचना दिली.

माचिल चालू झालें. तोंच माचिलामागोमाग डोक्यावर पाटी घेऊन चालणाऱ्या कामणूकडे झिलुबाबांची नजर गेली.

"कामणूऽ!" ते दरडावून ओरडले! "बेट्या लक्ष्यांत ठेव! त्या दिवशींचा वाफोरांतला अनर्थ घडून यायला तुझा वाचाळपणा कारण! कुठं काय बोलावं, कसं वागावं, आहे कांहीं तुला माहित? जातीचा गावडाच तू! बेअकली! याद राख! पुनः असा बोलभांड-पणा कुठं केलास, कीं त्याच दिवशीं तुझी भाटांतून हकालपट्टी!"

बिचाऱ्या कामणूच्या तोंडून एक चकार शब्दही निघाला नाहीं! धाकट्या भाटकाराबरोबर एका महत्वाच्या कामगिरीवर निघण्याचा मान आपल्याला मिळाला आहे, या विचारानें एवढा वेळ टवटवलेला त्याचा चेहरा खर्रकन् उतरला व डोक्यावरील ओझ्याला दाद न देतां ताठ असलेली त्याची भक्कम मान दुःखानें किंचित् खालीं वांकली!

* * *

एका तासाच्या आंत माचील देलेगादसाहेबांच्या बंगल्यासमोर येऊन थांबलें. माचिलांतून बाहेर निघून भुतेबाबांनीं आपली कॉलर नीट-नेटकी केली. कोटाच्या सुरकुतलेल्या बाह्या खालीं ताणल्या. खिशांतील रेशमी रुमालाचें टोंक व घड्याळाचा सोन्याचा छडा हीं किंचित् जास्ती बाहेर ओढलीं. व हातांतील काठी तिची रुप्याची मूठ दुसऱ्यांना दिसेल अशा व्यवस्थित रीतीनें धारण करून त्यांनीं बंगल्यांत प्रवेश केला. कामणूही अर्थात् त्यांच्या मागोमाग आंत शिरला.

बंगल्यांसभोंवतालील बाग ओलांडून भुतेबाब बंगल्याच्या दाराशीं जाऊन पोहोंचले, तोंच त्यांस दिवाणखान्यांतून पियानोचे सुस्वर नाद व मधून मधून गाण्याची एखादीदुसरी लकेर ऐकूं येऊं लागली, एकदोनदां पियानो मध्येंच थांबला व स्त्रीपुरुषाच्या संमिश्र आवाजांतील हास्यध्वनी तेथून भुतेबाबांच्या कानांवर आले. देलेगादसाहेब व त्यांची पत्नी गाण्याबजावण्यांत व थट्टाविनोदांत गर्क झालीं आहेत, हें त्यांनीं ताडलें. देलेगादसाहेबांच्या भेटीची आधींच त्याच्या मनांत धास्ती ! त्यांत पुनः गात वाजवीत असलेल्या त्यांच्या गृहिणीसमोर त्यांची भेट घेण्याची पाळी येणें म्हणजे भुतेबाबांना महासंकटच वाटलें ! दार ठोठावण्याचा त्यांना हिंय्या करवेना ! बावरून जाऊन कांहीं वेळ ते दाराशींच रेंगाळत राहिले ! तोंच सुदैवानें एका नोकराची त्यांजकडे नजर गेली, व बाहेर कोणी गृहस्थ भेटायाला आल्याची त्यानें आपल्या धन्याला जाऊन वर्दी दिली. गृहस्थ 'कोंकणो' आहे हें नोकराकडून कळल्यामुळें त्यास आंत बोलावण्याची देलेगादसाहेबांना जरुरी भासली नाहीं.

"कोण आहे ?" त्यांनीं आंतूनच आवाज चढवून प्रश्न केला.

दिवाणखान्याच्या दारावर कलाबतूचा पडदा सोडण्यांत आला होता. त्याआड बाहेर भुतेबाब उभे होते. तेथून त्यांनीं अदबीनें चांचपडत उत्तर केलें," "मी तो झिलुबाबांचा मुलगा—आपल्या भेटीला आलों आहें."

"कोण प्राणी आहे हा झिलुबाब ! नांवसुद्धां कधीं ऐकलेलं नाहीं !" देलेगादसाहेबांच्या तोंडून तुच्छतेचे उद्गार निघाले.

"झिलुबाब पालयेंकार—त्यांचा व आपल्या वडिलांचा दाट स्नेह. आपल्याला आठवत असेलच, आपण पूर्वी आमच्या पालयें गांवांत

राहात होतां. मी आपला शाळासोबती. पाद्रि मोरांवकडे येलेमेंतार कोंप्लेमेंतार आपण बरोबरच शिकलों." असलेलें नसलेलें धैर्य एकवटून भुतेबाबांनीं पुनः स्वतःचा परिचय करून देण्याचें धाडस केलें!

"झक् मारो तो पाद्रि मोरांव! कुठल्या आदांवईव्हकाळच्या गोष्टी उकरून काढतां राव! तुमच्या व आमच्या कुटुंबांतील मंडळीच्या परस्परसंबंधाचा तलास लावावयाचा झाला, तर ती कामगिरी एखाद्या इतिहाससंशोधकाकडेच सोंपवावी लागेल! बरं तुमच्या सोयीसा ठ घटकाभर असं गृहीत धरून चालू, कीं माझ्या वडिलांचे तुम्ही म्हणतां हे झिलुबाब अगदीं जीवश्चकंठश्च दोस्त! कबूल! मग काय म्हणणं आहे त्यांचं?"

देलेगादसाहेबांच्या या वक्रोक्तीमुळें भुतेबाबांची जीभ जणूं लुली पडली! बराच वेळ त्यांच्या तोंडून शब्द निघेना! शेवटीं मोठा हिय्या करून ते दीनवाण्या आवाजांत बोलले, "तसं नाहीं सिंज्योर! आपली येथें बदली झाल्याचं त्यांनीं ऐकलं व त्यांना फार आनंद झाला! मला म्हणाले, आपल्याला फेलिसितार करून ये—

"आं ऽ! Felicitação? muito obrigado! (अभिनंदन का? फार आभारी आहें!)"

"एक लहानशी भेट बरोबर आणली आहे"—

"भेट?! तुम्हां हिंदु लोकांच्या भेटी स्वीकारणें म्हणजे मोठीच धास्ती! कितीही मोठ्या अधिकाऱ्याला अशा एखाद्या दुसऱ्या भेटीनें कायमचा खिशांत कोंबतां येईल ही तुमची अपेक्षा! भेट स्वीकारावी तरी पंचाईत, न स्वीकारावी तर एतिकेत मोडल्याचा दोष पदरीं येतो! —बरं काय आणलं आहे?"

" मैडोळ्या केळ्यांचा घड व मांकुराद आंबे. "

"हात्तीच्या ! जो तो पाठवतो काय तर मैडोळीं केळीं ! त्या केळ्यांचा इतका कंटाळा आला आहे !—व आंबे मांकुराद ? या दिवसांतले मांकुराद आंबे आमच्या नोकरमंडळीलासुद्धां चालणार नाहींत ! पाठवायाचेंच होते, तर आफोंस तरी पाठवायाचे होते—"

यावेळीं धनीसाहेबांच्या सूचनेवरून आंतून एक नोकर बाहेर आला व त्यानें कामणूच्या पाटींतील केळीं व आंबे आपल्या ताब्यांत घेतले.

" बरं याशिवाय आणखी कांहीं काम आहे का तुमचं माझ्याशीं ?" अधीऱ्या व त्रासलेल्या आवाजांत देलेगादसाहेबांनीं विचारलें.

" तसं विशेष कांहीं नाहीं—नाहीं म्हटल्यास थोडंसं आहे—आठ दिवसांमागें मला पणजीला जावं लागलं. दोनतीन दिवस तेथें राहिलों व नंतर परत यायला निघालों. वाफोरांत बसल्यावर— "

" हें पहा, आजीबाईच्या गोष्टींतला हा पाल्हाळ ऐकायाला मला सवड नाहीं ! मुख्य मुद्दा काय तो झटपट बोला ! " देलेगादसाहेब उसळून म्हणाले !

" तें असं झालं—" कांपऱ्या आवाजानें व अडखळत भुतेबाबांनीं पुनः सुरवात करून व शक्य तितक्या त्रोटक रीतीनें वाफोरांत घडलेला प्रकार त्यांस कथन केला व शेवटीं थोडेंसे उसनें अवसान आणून ते म्हणाले, " त्या क्रिस्तांव उतारूवर फिर्याद करणें भाग आहे ! तेव्हां त्या बाबतींत आपला सल्ला विचारायाला आलों आहें. "

देलेगादसाहेबांकडून लगेच उत्तर येण्याऐवजीं त्यांची याच वेळीं आंत आपल्या पत्नीबरोबर कांहीं कुजबुज चालू झाल्याचा अस्पष्ट आवाज बाहेर ऐकूं आला.

पण थोडा वेळ गेल्यावर उपरोधिक रीतीनें ते मोठ्यानें हंसले व म्हणाले "वाः ! हें कसलं फिर्यादीचं खूळ घेऊन बसलां आहां ? स्वाभि-

मानाचा हा गुण तुम्ही हिंदूंनीं केव्हांपासून पैदा केलात ? कीं नुसता आव आणतां ? तुमच्या पिढ्यानपिढ्या तर किरिस्तावांच्या लाथा खाण्यांत गेल्या ! ज्यानें त्यानें आपापल्या स्वभावधर्माप्रमाणें वागावें हें उत्तम ! हाच या बाबतींत माझा तुम्हांला सल्ला ! बरें तुम्ही आतां जा. मी जरा कामांत आहें. ''

अशा रीतीनें दिवाणखान्यांत बसलेल्या देलेगादसाहेबांच्या भेटीचा भुतेबाबांनीं एवढा वेळ दिवाणखान्याच्या दाराबाहेरून उभ्याउभ्याच चालवलेला विधी त्यांना आतां आटोपता घ्यावा लागला. देलेगाद-साहेबांनीं ज्या पद्धतीनें भुतेबाबांचा परामर्ष घेतला, त्याबद्दल त्यांना तेवढेंसे वाईट वाटलें नाही. कारण मानापमानाच्या कल्पना या सापेक्ष स्वरूपाच्या ! तदनुसार त्यांचीं मापेही भिन्न भिन्न ! व म्हणून भुते-बाबांच्या उदार हृदयाच्या कसोटीवर पारखल्यास देलेगादसाहेबांकडून त्यांना परतअहेरादाखल मिळालेली दुरुत्तरें अपमानाच्या सदरांत पडणें शक्य नव्हतें ! पण देलेगादसाहेबांनीं नुसतें एकवार दर्शनही देऊं नये, त्यांच्या एखाद्या कृपास्मिताचाही लाभ होऊं नये, व निरोप देतांना आपल्याशीं नुसतें हस्तांदोलन करण्याचा सर्वसाधारण शिष्टा-चारही त्यांनीं पाळूं नये, ही गोष्ट मात्र त्यांच्या मनास फार लागली ! या गोष्टींपैकी निदान एक जरी त्यांच्या वांट्याला येती, तर तेवढयानेंही त्यांना आज कृतकृत्यता वाटल्यावांचून राहिली नसती !

जड अंतःकरणानें ते आतां त्यांच्या बंगल्यांतून परत फिरले !

" पाड पडो या दोतोराचें ! हाच तो !"—भुतेबाब दरवाजाची शेवटची पायरी उतरतात तोंच त्यांच्यामागोमाग चालणारा पण इकडे तिकडे दृष्टि फिरवीत देलेगादसाहेबांच्या शोभिवंत बंगल्याचें निरीक्षण करणारा कामणू भूतानें पछाडल्याप्रमाणें एकदम दचकून हे शब्द ओरडला ! ते कानावर पडतांच त्यांतील गूढ उकलण्यासाठीं

त्याच्या दृष्टीच्या दिशेला त्यांनीं आपली नजर फिरवली, तों कुचेष्ट-खोरपणानें हंसणारे देलेगादसाहेब व खिन्न मुद्रेनें व कींव करण्याच्या दृष्टीनें भुतेबाबांकडे पाहाणारी देलेगादसाहेबांची पत्नी हीं दिवाण-खान्याच्या खिडकींत उभीं असलेलीं त्यांना दिसून आलीं. त्यांना पाहातांच भुतेबाबांस जणू विजेचाच धक्का बसला !

कामणू डोळे फाडून त्या खिडकीकडे पाहात होता ! त्वेषानें दांतां-खालीं आंवळलेल्या त्याच्या ओंठांतून तुटक उद्गार बाहेर पडूं लागले, "हाच तो चांडाळ ! याच्याच हलकट जिभेनें वाफोरांत भाटकारणीस उणे शब्द उच्चारले ! यानेंच भाटकाराच्या अंगावर हात उगारला ! व त्याच या दुष्टाच्या घरीं तासभर मानकंबर मोडून मी आज ही भेट वाहून आणावी ! देवा !—भाटकाराच्या घरून येथें यायला निघण्यापूर्वं माझे पाय तरी कां मोडून घातले नाहींस !—"



# पाद्र्यांची पुण्याई !

“ कांहींही म्हण ! लोक अधिकाधिक धर्मलंड होत चालले आहेत, हें खास ! तुला हें कबूल करावंच लागेल ! ”

‘ बिब्ल्योतेक नासियोनाल ’ च्या दारांत पाऊल टाकतों, तों पाद्रि काब्रालनें पोर्तुगीजमध्यें आवेशानें उच्चारलेले हे शब्द माझ्या कानीं पडले.

पणजीच्या या सुप्रसिद्ध सरकारी ग्रंथालयांत कधीं न चुकतां दर-दिवशीं सकाळ संध्याकाळ नियमितपणें येऊन बसणारी एखादी व्यक्ति असेल, तर ती एक पाद्रि काब्राल ! पण आज जें या महाभागाचें नांव ‘बिब्ल्योतेक नासियोनाल’मध्यें जाणाऱ्या कोणाही वाचकास पुरतें अवगत झालेलें दिसून येतें, त्याचें श्रेय मात्र त्यांच्या या नियमित वाचन-व्यासंगापेक्षां त्यांच्या अंगच्या दुसऱ्याच एका मासलेवाईक गुणाला देणें जरूर आहे !

कांहींही ‘ आपणांसी ठावें ’ होण्यापूर्वीच ‘ दुसऱ्यासी शिकवावें ’ व ‘ शहाणे करुनी सोडावें सकल जनां ’ ही पाद्रीबोवांना मोठी हौस !

ग्रंथालयांत प्रवेश केला कीं, एखादें पुस्तक घेऊन पांचदहा मिनिटें चाळायाचें; नंतर आपले डोळे विस्फारून ' काय चमत्कार ! ' ' किती सुंदर विचार ! ' अशा प्रकारचे दोनचार ठसकेबाज शब्द स्वतःशींच पण शेजारच्या वाचकांच्या कानांवर जाऊन आदळतील अशा रीतीनें उच्चारून त्यांचें लक्ष्य स्वतःकडे वेधून घ्यायचें; एवढें झाल्यावर त्यांच्यापैकीं एकदोघांशीं हळूच लगट करून व त्यांवर बळेंच श्रोतेपणा लादून पुस्तकांतील एखादा उतारा त्यांना वाचून दाखवायाचा व शेवटीं त्यावरील स्वतःचें भाष्य सुरू करून त्यांतील विषय इतिहास, अर्थशास्त्र, पदार्थविज्ञान, भूगोल, गणित असा कोणताही असला, तरी आपल्या अजब तोंडचलाखीनें त्यांतून लगेच धर्मशास्त्राच्या गहन अरण्यांत शिरायाचें व ख्रिस्तानें किंवा त्याच्या एखाद्या प्रेषितानें केलेल्या चमत्कारांचें तपशीलवार वर्णन करण्यांत किंवा बायबलमधील एखाद्या वचनाचें विशदीकरण करण्यांत तास दोन तास आपल्या वाणीचा ओघ अखंड वळवीत ठेवायाचा, हा त्यांचा नित्याचा परिपाठ असे.

आज ग्रंथालयाच्या सबंध दिवाणखान्यांत दुसरा कोणीही वाचक नसल्यानें एका कोंपऱ्यांतील आपल्या टेबलाशीं बसून पेंगणारा ग्रंथालयांतील बिचारा क्रिस्तांव कारकूनच त्यांच्या तावडींत सांपडला होता !

पाद्रि काब्रालचे श्रोते म्हणजे केव्हांही वेठीला धरलेल्या वर्गातलेच असावयाचे ! अर्थात् अशा श्रोत्यांचें आपल्या विषयप्रतिपादनाशीं तादात्म्य घडवून आणण्यासाठीं जवळपासच्या एखाद्या टेबलावर मुठीचे व जमिनीवर बुटांचे आघात करणें, त्यांच्या कपड्यांना हिसके देणें, त्यांच्या दंडांवर किंवा मांड्यांवर थापा मारणें, एखाद्या मुद्द्यावर जोर देण्याच्या मिषानें त्यांच्या अंगावर खेंकसणें, इत्यादि प्रकारांचा त्यांस वारंवार अवलंब करावा लागे ! आतांही असेंच झालें. ' धर्मश्रद्धेचा

लोप !' यासारख्या अत्यंत गंभीर प्रश्नाची त्यांनीं इतकी आंतडीं तोडून मीमांसा चालविलेली, पण त्यांच्यासमोर बसलेल्या त्या कारकुंड्याला त्याची थोडीच मातब्बरी ! माझ्या कानीं आलेले वर दिलेले जिव्हाळ्याचे व महत्वाचे शब्द त्याला उद्देशून पाद्रीबुवांच्या तोंडून बाहेर पडायाला व त्यानें एक झेंपदार डुलकी घ्यायाला एकच गांठ पडली !

आपल्या श्रोत्याला त्याच्या कर्तव्याची जाणीव करून देण्यावांचून त्यांना आतां गत्यंतर नव्हतें !

" नास्तिकांचें बंड अलीकडे फारच माजत चाललें आहे ! Obra do Satanos ! ( सैतानाचा चाळा ! ) " आपलें भाषण पुढें चालू करतांना हे दणकेबाज शब्द उच्चारून त्यांनीं आतां टेबलावर एवढ्या त्वेषानें मुठीचा आघात केला कीं, त्या आवाजानें सबंध दिवाणखाना हादरून गेला ! कारकून पेंगण्याच्या कलेंत इतका सराईत, पण लगेच त्याच्या डोळ्यांवरील झांपड खाडकन् उतरली ! तोंच त्याच्या बाहीला एक जोराचा हिसका देऊन ते पुढं म्हणाले, " माझ्या या विधानाच्या सत्यतेबद्दल तुला प्रत्यक्ष पुरावा हवा आहे का ? अगदीं सोपी गोष्ट ! हवा तितका देईन !"

कारकुनानें आपले डोळे किंचित् किलकिले करून वक्त्याच्या या बळजोरीबद्दल तीव्र निषेध व संताप व्यक्त करणारा एक कटाक्ष त्याजकडे फेकला व एक ऐसपैस जांभई दिली !

श्रोत्याच्या या स्थित्यंतरामुळें समाधान पावलेल्या पाद्रीबुवांच्या तोंडून आतां जोरदार शब्द बाहेर पडूं लागले.

" दूर कशाला जा ! धर्माचा ऱ्हास होत चालला आहे, याचें उघड प्रत्यंतर म्हणजे आम्हां पाद्रयांना सध्यां प्राप्त झालेली हलाखीची स्थिति !

मागील पिढीमध्यें हजारों रुपयांची माया जवळ असलेले पाद्री गांवो-गांव दिसत असत !—बिद्रोणच्या व्हिगार नोरोंज्यूचें नांव तूं ऐक-लेंच असशील. त्याला तिघी पुतण्या. सबंध बिद्रोणांत त्यांच्यासारख्या काळ्याविद्र्या व कुरूप त्याच ! पण बेट्यानें स्वतःच्या कमाईतून पंधरा पंधरा हजार रुपयांचा जबर हुंडा देऊन त्यांचीं लग्नें लावून दिलीं ! नाहीं तर हल्लीच्या पिढींतील माझ्यासारख्याची स्थिती ! गेल्या नाता-लांत माझी एकुलती एक भाची चार दिवस राहायाला आली, तर तिला नजर करायला नुसत्या एका झग्याला लागणारें रेशमी कापड विकत घेणें मला किती जड गेलें ! चोडणाचा पाद्रि आलमेद मरून झालीं आतां उणींपुरीं तीस वर्षे ! पण व्याजबट्ट्याचा त्याचा त्या वेळचा व्याप एवढा अवाढव्य कीं, अजून लोक त्यासंबंधींच्या आठ-वणी काढतात ! नुसत्या व्याजाच्या रूपानें येणाऱ्या दरसालच्या रकमेंतून त्यानें आपल्या दोघां विधवा बहिणींच्या कुटुंबांचें पोषण केलें, एका भाचाला पुर्तुगालचें शिक्षण देऊन आणवलें व दुसऱ्या भाचानें या शहरांत दारूचें जगी दुकान उघडल्यावेळीं त्यास सबंध भांडवल पुरवलें ! नाहींतर मी अभागी ! झेजूला स्मरून सांगतों ! मी जी कांहीं थोडीबहुत रक्कम याला त्याला व्याजीं दिली आहे, त्यावर सुटणारें व्याज माझ्या दररोजच्या विडीतंबाखूला व मासळीलाही पुरत नाहीं !

सांगायाचा मुद्दा एवढाच कीं, समाजाच्या पारमार्थिक कल्याणासाठीं स्वतःच्या ऐहिक सुखाची होळी करून संन्यस्त वृत्तीनें राहाणाऱ्या आम्हां पाद्र्यांच्या योगक्षेमाची सढळ हातानें व्यवस्था करणें, हें प्रत्ये-काचें कर्तव्य आहे, अशी मागील पिढीमध्यें भावना होती. ती हल्लीं राहिलेली नाहीं. मग मी म्हणतों, धर्माची अवनती होते आहे, याला याहून दुसरा कोणता पुरावा हवा आहे ? ”

एवढं बोलून पाद्रि काब्रालनें आपली दृष्टी आकाशाकडे वळवली व एक दीर्घ दुःखनिश्वास सोडला !

एकदोन क्षण गेल्यावर पुनः त्यांच्या अंगांत वारें आलें ! खुर्चीवरून अर्धवट उठून व त्वेषानें आंवळलेली आपली मूठ श्रोत्याच्या नाकासमोर हलवून त्यांनीं गर्जना केली, "पण तुम्ही लोक एवढं बरीक लक्ष्यांत ठेवा ! जुन्याकाळापासून आजतागायत तुमच्या तारणासाठीं आम्ही धर्मोपदेशक जो स्वार्थत्याग व जीं अलौकिक कृत्यें करीत आलों आहोंत, त्याला साऱ्या जगांत दुसरी तोड नाहीं ! असं असून ऐहिक वैभवाच्या धुंदींत 'गरज सरो, वैद्य मरो ! ' असा प्रकार कराल, तर आपापल्या थडग्यांतून जेव्हां त्या अंतिम निवाड्याच्या दिवशीं ईश्वरी न्यायासनासमोर खेचले जाल, त्या प्रसंगीं या गोष्टीचा तुम्हांला जाब द्यावा लागेल !"

या धमकीचा श्रोत्यावर बराच परिणाम झालेला दिसला. पाद्रीबोवासंबंधीं त्याच्या मनांत चाललेल्या जळफळाटाची एवढा वेळ त्याच्या चेहऱ्यावर उमटलेली छाया कांहींशी विरळ होऊन त्या ठिकाणीं ओढून ताणून आणलेल्या आदराची भावना आतां व्यक्त झाली.

"फार कशाला ? ईश्वरी कृपेनें हें जें पुर्तुगेझांचें वैभवशाली व सुखावह छत्र आम्हांला प्राप्त झालें आहे, तें एकाकाळीं रसातळाला जाण्याचा भयंकर प्रसंग आल्यावेळीं त्या आपत्तींतून ही गोव्याची भूमी कोणी बचावली ? आम्ही ! आम्हां धर्मोपदेशकांची पुण्याईच त्यावेळीं फळाला आली ! ऐक, या विद्वान् झेजुइत लेखकानें आपल्या 'Oriente Conquistada' या सुप्रसिद्ध ग्रंथांत काय लिहून ठेवलं आहे"—

असें म्हणून त्यांनीं आपली खुर्चीवरील बैठक जरा नीटनेटकी केली

व समोर टेबलावर पडलेलें एक पुस्तक उचलून त्यांतील पुढील मजकूर प्रत्येक शब्दावर जोर देत ते वाचूं लागले—

'Em novembro do ano seguinte de 1683 desceu sobre Gôa de noite como ladrão o inimigo Sambhaji com quasi vinte mil homens e quatro ou cinco mil de cavallo, dez elephantes e outro apparatos de guerra.'—

('१६८३ सालीं नोव्हेंबर महिन्यांत, वीस हजार पायदळ, चार पांच हजार घोडदळ, दहा हत्ती व इतर पुष्कळ युद्धोपयोगी सरंजाम घेऊन रात्रीच्या वेळीं चोराप्रमाणें संभाजी गोवा प्रांतांत उतरला!')

पुस्तकावरून आपली दृष्टि कारकुनाच्या चेहऱ्याकडे वळवून व स्वतःच्या मुद्रेवर बळेंच भयव्याकुलता दर्शवण्याचा प्रयत्न करून ते उद्गारले, "एक! 'Desceu de noite como ladrão!' ('चोराप्रमाणें रात्रीचा उतरला!')"

नंतर पुनः पुस्तकांतील पुढील मजकूर वाचायाला ते सुरवात करणार, तोंच त्यांची दृष्टि माझ्याकडे गेली. आपल्या श्रोतृवर्गांत आणखी एकाची भर पडण्याची संधि आलेली पाहून त्यांस आनंदाचें भरतें आलें! यापूर्वी एकदोनदां त्यांच्या वक्तृत्वाच्या भोंवऱ्यांत गटंगळ्या खाण्याचा प्रसंग माझ्यावर आला होता, एवढाच त्यांचा माझा पूर्वसंबंध! पण जणूं माझ्या एखाद्या लंगोटीमित्राचाच आव आणून मलगीच्या स्वरांत हंसत हंसत ते म्हणाले, "तें काय वाचतां? 'ABC'? काय आहे त्या गचाळ मासिकांत? या इकडे या! इतिहास तुमचा आवडता विषय ना? मग हें पाहा, इतिहासांतील एका संस्मरणीय प्रसंगाचें वर्णन!"

पाद्रीसाहेबाचा चिकटपणा मला पुरा माहित असल्यामुळें विशेष आढेवेढे न घेतां मी त्यांच्या शेजारच्या खुर्चीवर जाऊन बसलों.

घाईघाईनें त्यांनीं आतां पुस्तकांतील आणखी दोन चार ओळी वाचून दाखवल्या व एक नवीन ताजातवाना श्रोता मिळाल्यामुळें आलेल्या नव्या हुरुपाच्या भरांत वाचलेल्या मजकुरावरील आपल्या निरूपणास सुरवात केली.

"—अशा रीतीनें संभाजीची धाड गोव्यावर आली ! दगलबाजी तर मराठ्यांच्या हाडींमांसीं खिळलेली ! तिच्या जोरावर त्यांनीं अशीं घोर कृत्यें आरंभिलीं ! देवा, देवा ! ख्रिस्ती धर्माचें बळकट चिलखत या राज्यावर होतें, म्हणूनच त्या वावटळींत आमचा टिकाव लागला ! फोंड्याचा किल्ला त्यावेळीं मराठ्यांच्या ताब्यांत ! त्या वेळचा गोव्याचा व्हिसिरै कोंद-द-आल्व्होर यानें त्या किल्ल्याला वेढा दिलेला ! तोंच त्या किल्ल्याच्या रक्षणासाठीं संभाजी घाटावरून उतरून डुकरासारखी मुसंडी मारून आला ! कोंद-द-आल्व्होर म्हणजे जातिवंत शूर ! क्रिस्तावर त्याची निःसीम श्रद्धा ! त्या पठ्ठ्यानें मोठ्या शर्थीनें आपला बचाव करीत वेढा उठवून परत गोवें शहर गांठलें ! शेंकडों क्रिस्तांव वीर या प्रसंगीं फोंड्याच्या रणभूमीवर धर्मासाठीं लढतां लढतां पतन पावले !—

यानंतर त्या दुष्ट संभाजीच्या लुटारूपणाला जणूं ऊतच आला ! एकामागून एक निरनिराळीं ठाणीं बळकावयाला त्यानें सुरवात केली ! जणूं याच्या बापाचाच प्रांत ! साष्टी, बारदेश हे महाल काबीज केले ! इतकेंच नव्हे, तर शेवटीं सांतइश्तेव्हांव बेट व तेथील किल्ला घेऊन तेथें येऊन बेट्यानें तळ दिला ! मग मात्र जिकडे तिकडे हाहाःकार उडाला ! सांतइश्तेव्हांव बेट म्हणजे राजधानीला अगदीं लागून ! केव्हां त्या बेटावरून गोवाशहरावर तो सैतान झडप घालील याचा नेम नव्हता ! एकदां तर त्यानें तसा प्रयत्न केलाही !

एका रात्रीं मराठ्यांच्या होड्यांमागून होड्या सांतइश्तेव्हांव बेटावरून राजधानीच्या दिशेला येऊं लागल्या ! पुर्तुगेझ सावध होते ! त्यांनीं असा भडिमार केला कीं ज्याचें नांव तें ! पण या यशाचें बहुतेक

सर्व श्रेय कांहीं आगुश्तिनियानु पाद्रयांनांच देणें वाजवी आहे ! त्यांच्या बहाद्दुरीमुळेंच शेंकडों मराठ्यांना यावेळीं जलसमाधि मिळाली ! नदीचा नेमका उतार अडवून या पाद्रयांनीं शत्रूला असा हात दाखवला कीं, त्यावेळीं मराठ्यांना कळून आलें कीं, आम्हां क्रिस्तांव भटांमधलें पाणी म्हणजे त्यांच्या हिंदु भटांहून अगदींच न्यारें आहे !”

पाद्रीसाहेबांनीं आडव्यातिडव्या हातवाऱ्यांचे हवेंत दोनतीन फटकारे लगावले व आढ्यतायुक्त हास्याची एक अर्धस्फुट लाट यावेळीं त्यांच्या तोंडून बाहेर पडली.

—“वास्तविक मराठे म्हणजे पुर्तुगेझांपुढें कुठल्या झाडाचा पाला !

....‘ Esquecerem-se Gregos e Romanos
Pelos illustres feitos que esta gente
Ha de fazer partes do Oriente !’....

[ ‘....अपूर्वविक्रमपथ आचरणें प्राच्यदेशिं हें साचें ।
भविष्यकालीं भागधेय या लूझोदेशीयांचें !।
त्याशीं तुलितां विसरतील जन रोमनग्रीकख्याति !।...’ ]

असें त्यांच्या पराक्रमाचें कामोंइशनें लुझीयदशमध्यें वर्णन केलेलें ! अशा त्या आमच्या लुझितानु वीरांनीं मराठ्यांना मुग्यांप्रमाणें चिरडून टाकावें ! पण मुंग्या झाल्या तरी संख्याबळावर एखादे वेळीं आपल्याहून कितीतरी पटीनें मोठ्या प्राण्याचीही शिकार करतातच कीं नाहीं ? तोच प्रकार संभाजीच्या स्वारीचा झाला ! पुर्तुगेझ मूठभर ! व मराठ्यांच्या सैन्याचा प्रचंड सागर गोव्यांत पसरलेला ! कोंद-द-आल्व्होर येवढा धर्मनिष्ठ, धोरणी, मुत्सद्दी, कर्तव्यतत्पर, धाडसी, शूर ! आर्सेब्रिश्पु दोंमानुयेल—द-सौझ—द—मिनेझिश् सारख्या महान् व्यक्तीच्या दैवी सामर्थ्याचें त्याला पाठबळ ! पण मराठ्यांच्या त्या महारोगापासून गोवाप्रांताचें रक्षण करण्याचा कोणताच उपाय त्या बिचाऱ्याला दिसेना !

अखेरीस ती भयंकर बातमी येऊन थडकली! जिकडे तिकडे हाहाःकार उडाला! सर्वांची खात्री होऊन चुकली, कीं क्रिस्तांव धर्माचा पूर्वेकडील बालेकिल्ला त्या पापी मूर्तिपूजकांच्या आतां खास हातीं जातो!

मराठ्यांनीं गोव्यांतील एकूण एक नावाडी व त्यांच्या शेंकडों फतेमाऱ्या वेठीस धरल्या होत्या, व त्यांतून आपल्या सैन्याचा सबंध पर्वत गोवाबेटाच्या किनाऱ्यावर आणून उतरवण्याची जय्यत तयारी त्यांनीं केली होती! एकदोन दिवसांत त्यांची धाड राजधानीवर येणार होती!

या दुष्ट वार्तेमुळें राजधानींत जिकडे तिकडे किती हृदयद्रावक दृश्य दिसून येऊं लागलें! आपल्या मायदेशाच्या यशोमदिरावर आल्बुकेर्कनें चढवलेला सुवर्णकळस आपल्या दुर्दैवी कारकीर्दींत धुळीस मिळणार या कल्पनेमुळें दुःखाच्या भरांत बिचारा कोंद-द-आल्व्होर मूर्च्छित झाला! पाखंडाच्या कर्दमावर बागडणाऱ्या पूर्वेकडील देशांतील हजारों अजाण कोंकरांना सुरक्षित क्रिश्ताच्या कळपांत आणून सोडण्याच्या आपल्या पवित्र कार्यास आतां खंड पडणार, म्हणून प्रत्येक कोंव्हेंतांतील धर्मोपदेशकांच्या डोळ्यांतून अश्रूंच्या झरी वाहूं लागल्या! सुधारणेच्या शिखरावर विराजणाऱ्या पुर्तुगाल देशाच्या सुखावह राजवटीच्या शीतल छायेला मुकून मराठ्यांसारख्या रानटी लोकांच्या अंमलाचें रुक्ष वाळवंट नशिबीं येणार या भीतीनें गोव्यांतील प्रजेच्या—क्रिस्तांवच नव्हे तर हिंदूंच्यासुद्धां—शोकाला तर पारावार राहिला नाहीं! त्यांपैकीं क्रिस्तांव होते, त्यांच्या झुंडीच्या झुंडी सांतांना नवस करण्यासाठीं निरनिराळ्या कोंव्हेंतांकडे धांव घेऊं लागल्या! व हिंदु होते त्यांनीं हें महाअरिष्ट टळावें म्हणून तीर्थांत डुंबण्याचा, सोंवळीं नेसण्याचा व शेण पिण्याचा सपाटा चालवला! अशा रीतीनें त्या वैभवशाली गोवेनगरीवर जिकडे तिकडे सुतकी छाया पसरली!—

पण आशियांतील धर्मरक्षकांचा तो मेरुमणी, रोमच्या पोप-महाराजांचा कलिजा, क्रिश्तप्रभूचा पूर्वेकडील खजिनदार, आकाशांतील बापाचा लाडका लेक, तो महात्मा, आर्सेबिश्पु दों. मानुयेल-द-सौझ-द-मिनेझिश् यावेळी कोठें व कोणत्या स्थितींत होता ? या आपत्तीच्या वेळीं त्याच्या नुसत्या एका धीराच्या शब्दासाठीं व आशीर्वचनासाठीं त्याच्या निवासस्थानाबाहेर व्हिसिरै, व्हिसिरैचे शेंकडों लहान मोठे जमलदार व इतर हजारों भाविक, गुडघे टेकून तिष्ठत असतां त्यांस त्याचें दर्शन कां घडत नव्हतें ?

त्या समयींच्या आपल्या श्रेष्ठ कर्तव्यांत ती विभूती मग्न झाली होती ! आपल्या ओरातोर्युमध्यें त्यानें स्वतःला कोंडून घेतलें होतें ! बाह्य जगाचा त्याला पूर्णपणें विसर पडला होता ! त्या दयाळू जगत्पित्याला करुणरसानें ओथंबलेल्या शब्दांनीं तो आळवीत होता ! मायमारीयचें, क्रिश्ताचें, त्याच्या प्रेषितांचें, सां शाव्हियेरसारख्या संतांचें श्रद्धापूर्वक आवाहन त्यानें चालवलें होतें !

सबंध दिवस गेला ! रात्र आली ! अन्नापाण्यावांचून आर्सेबिश्पु ओरातोर्युमध्यें व त्याच्या दर्शनाला व वचनाला भुकेलेला अलोट जन-समुदाय बाहेर त्याच्या वाटेकडे डोळे लावून राहिलेला !—

मध्यरात्र उलटली ! पहांटेचे चार वाचले ! व आव्हेमारीयचा घंटानाद कानावर येतो आहे, तोंच !—

"Que maravilhosa visão meu Jesus!" ("क्रिश्त-प्रभो ! काय तें अद्भुत दृश्य !")

हें शेवटचें वाक्य उच्चारतांना एखाद्या आंकडी आलेल्या माणसा-प्रमाणें एकाएकीं आपले हातपाय झटकण्याचा पाद्रीबोवांनीं असा कांहीं विलक्षण अभिनय केला कीं, मी तर दचकूनच गेलों !

"ओरातोर्युच्या द्वाराशीं एक उज्ज्वल प्रकाशाचें वलय दिसूं लागलें ! काय ती स्वर्गीय प्रभा ! प्रत्येकाचे डोळे दिपून गेले ! पूज्यबुद्धि, विस्मय, भीती या भावना एकाच वेळीं सर्वांच्या हृदयांत विजेसारख्या चमकल्या !

पांच दहा क्षण गेले व तें वलय जवळ जवळ येत चाललें ! हळुहळू त्यांतून एक मानवी चेहरा स्पष्ट होऊं लागला ! त्या चेहऱ्याची कोणाला ओळख पटल्यावांचून राहील ?

ईश्वरी प्रेरणेच्या व आत्मिक तेजाच्या पवित्र दैवी वातावरणांत सबंध दिवस घालवून नुकत्याच ओरातोर्युमधून बाहेर निघणाऱ्या आर्सेबिश्पुच्या मुखासभोंवतालीं ती देदिप्यमान कांति विलसत होती !

तत्क्षणीं व्हिसिरै हर्षोन्मादानें वेडा झाला ! सुप्रसिद्ध औरिकच्या युद्धाच्या वेळीं पुर्तुगालच्या त्या भाग्यशाली दोंआफोंमु-द-येंरिक राजाला रणभूमीवर एकाएकीं दिसलेल्या अशाच तेजोवलयाची व त्यामधील खुरिसलेल्या क्रिश्ताच्या आकृतीची त्याला आठवण झाली ! ओरातोर्युच्या द्वारांत दिसणारें मानवी दृष्टीला दुर्लभ असें तें अलौकिक शुभ दृश्य म्हणजे त्या राजाप्रमाणेंच स्वतःला प्राप्त झालेलें ईश्वरी कृपेचें आदेशचिन्ह अशी आतां त्याची बालंबाल खात्री झाली ! देहभान विसरून तो पुढें धांवला ! आपल्या आनंदाश्रूंनीं धर्मगुरूचे पवित्र हस्त भिजवीत उत्कट भक्तिभावानें त्यानें त्यांचें चुम्बन घेतलें ! व्हिसिरैचेंच अनुकरण करून आर्मेबिश्पुच्या हस्तांचा, चरणांचा, निदान त्याच्या झग्याच्या एखाद्या टोंकाचा स्पर्श घडून आपापले ओंठ पावन व्हावे म्हणून इतर हजारों लोकांच्या झुंडीच्या झुंडी पुढें घुसल्या ! काय तो त्या वेळचा देखावा ! "

जणूं तो देखावा स्वतःच पाहिला असल्यासारखा आविर्भाव आणून पाद्रीबुवांनीं आपलीं बुब्बुळें वर कपाळाकडे खेंचलीं !

" आज बोंझेजूसूच्या कोंव्हेंतांत बडें मीस होईल ! " थोड्यावेळानें धीरगंभीर आवाजांत आर्सेबिश्पुच्या तोंडून निघालेले हे शब्द सर्वांना ऐकूं आले व नंतर हळुहळू तें तेजोवलय मागे जातांना दिसूं लागलें व शेवटीं अदृश्य झालें ! आपल्या दर्शनाची भाविकवर्गाला लागलेली तळमळ तेवढ्यापुरती नाहींशी करून आर्सेबिश्पु पुनः ओरातोर्युमध्यें जाते झाले !

त्या दिवशींच्या बड्या मिसाची वार्ता वायुवेगानें लगेच दाही दिशांना पसरली ! सगळीकडे उत्सुकतायुक्त भाविकतेचा सागर उसळून आला ! राजधानीच्या निरनिराळ्या भागांतून व आसपासच्या खेड्यापाड्यांतून दोनचार तास आधींच मुंग्यांप्रमाणें लोकांच्या रांगाच्या रांगा कोंव्हेंता-कडे चाललेल्या दिसूं लागल्या ! त्यावेळच्या क्रिस्तांवांची श्रद्धा म्हणजे अस्सल शंभर नंबरी सोनें ! मिस चुकवण्याचे पातकी विचार स्वप्नां-तही त्यावेळीं कोणाच्या मनीं येत नसत ! नाहींतर हल्लींचे हे आचार-भ्रष्ट क्रिस्तांव !"—

यावेळीं तिरस्कारानें कारकुनाकडे बोट दाखवून, आपली रोषयुक्त नजर त्यांनीं त्याजकडे फेकली !

" दररोजचें मीस तर सोडाच, पण रविवारच्या मिसास हजर राहाण्यासही यांना धाड मारते ! "

धर्मप्रेमामुळें खवळून आलेला आपला सात्विक संताप गिळण्या-साठीं थोडा वेळ थांबून पाद्रीबुवा पुनः आपल्या पूर्वविषयाकडे वळले.

—" अशा रीतीनें बोंझेजूसूच्या कोंव्हेंताकडे हजारों भाविकांची आधींच गर्दी उसळली ! त्यानंतर निरनिराळ्या पंथांच्या पाद्र्यांचे जमाव आपापल्या कोंव्हेंतांतून त्या प्रार्थनामहोत्सवाला हजर राहाण्या-साठीं निघाले ! अहाहा ! ते रस्त्यांतून जात असतांना प्रत्यक्ष श्रद्धा,

भक्ति व पवित्रता हे गुणच जणूं साकार होऊन त्यांच्या रूपानें चालत असल्याचा भास होत होता !

सांता कातारीनाच्या कोंव्हेंतांतून फ्रांसिश्कानु पाद्र्यांचा तो जंगी जथा निघाला ! त्यांनीं आपल्या डोक्याचें मुंडन केलें होतें व काळ्या रंगाचा झगा, काळें शिरोवेष्टन व पांढरा कमरबंध असा पोषाख परिधान केला होता ! लक्षांत ठेवा, पुर्तुगेजांचे गोव्यांतील आद्य धर्मोपदेशक होण्याचा मान या फ्रांसिश्कानु पाद्र्यांना मिळालेला ! बेटे केवढे भाग्य-वान् !

त्याचप्रमाणें दोमिनिकानु पंथांतील पाद्रीही आपल्या कोंव्हेंतांतून बाहेर पडले ! पांढऱ्या रंगाचा झगा व शिरोवेष्टण, खांदापट्टे व कमर-बंधही त्याच रंगाचे, असा त्यांचा पोशाख ! हे दोमिनिकानु म्हणजे जणूं ज्ञानाचें आगरच अशी त्यांची त्यावेळीं ख्याती !

सांत आगुश्तिननें स्थापलेल्या पंथाचे आगुश्तिनियानु पाद्रीही त्या अत्यंत सुदर व भव्य अशा कोंव्हेंत-द-ग्रासमधून निघाले ! त्यांचा पोशाख दोमिनिकानुप्रमाणेंच काळा होता, पण त्यांनीं चामड्याचा कमरबंध वापरला होता ! या पंथाची श्रद्धा किती जाज्वल्य याला इति-हास साक्ष आहे ! मार्तिन लूथर हा मूळचा या पंथाचा ! पण त्या बेट्यानें आपले पाखंडी चाळे सुरू करतांच या पंथावर अप्रत्यक्ष रीतीनें नाहक शिंतोडा उसळला ! तो धुवून निघावा म्हणून या आगु-श्तीनियानांनीं तेव्हांपासून प्रायश्चित्तार्थ आपल्या मूळच्या काळ्या पोशाखाचा बेधडकपणें त्याग करून पांढरा वापरायाला सुरवात केली ! काय हें दिव्य ! केवढें धर्मप्रेम !

आणि कार्मेलीत पंथाचे पाद्री ? त्यांना पाहून कोणाचें अंतःकरण पूज्यभावानें भरून आलें नसतें ? बिचारे अनवाणीच रस्त्यावरील

काटेकुंटे, दगडधोंडे तुडवीत चालले होते! नेहमीं अनवाणी फिरण्याचा यांचा कडक नियम ! आपल्या पथाचें तें खडतर व्रत कधीं न चुकतां आचरणारे धन्य ते कारमेलीत !

त्याचप्रमाणें प्रत्येकानें गळ्यांत लांबलचक जपमाळ धारण केली आहे, असा तो तेबातीनु पंथाचा घोळकाही जातांना दिसूं लागला ! सर्व पंथांत या तेबातिनांचा पंथ गरीब ! पण त्यांचा स्वाभिमान इतका दांडगा कीं, आपल्या पंथांत ते बामणांशिवाय इतर कोणासही घेत नसत ! एखादा चाड्डा किंवा शूद्र चुकून औषधालाही त्यांच्या पंथांत कधीं दिसला नसता ! शाबास त्यांची !

आणि सर्वांनंतर—अहाहा ! तशा प्रकारचें दृश्य आधुनिक काळीं आम्हां अभाग्यांना दिसणें शक्य नाहीं ! शुभ्र वस्त्र परिधान केलेल्या सांता मोनिका मठांतील त्या जोगिणी—त्या पावित्र्याच्या परी—खालीं मान घालून सावकाश पावलें टाकीत चालल्या होत्या ! धर्मासाठीं यावच्चयावत् संसारसुखाचा त्यांनीं त्याग केलेला ! मठवासिनीची दीक्षा घेतल्या दिवसापासून मरेपर्यंत मठ सोडून बिचाऱ्यांना कोठेंही जातां येत नसे ! कांहीं वृद्ध काळयाकुट्ट निग्रो गुलामांशिवाय त्यांच्या मठांत इतर कोणाही पुरुषाला प्रवेश करण्याची मुभा नव्हती ! पाद्रयांना-सुद्धां !—एवढेंच काय पण प्रार्थनामंदिरांतही व्यासपीठावरील उपदेशक तेवढा त्यांस दिसावा, पण इतर कोणाही पुरुषाशीं त्यांची नजरानजर होऊं नये, अशा रीतीनें पडद्याआड बसण्याची त्यांची पद्धत ! 'आग्नेस दे' च्या मूर्ती, पाद्रयांचे खांदेपट्टे, जपमाळा, मुरंबे, सरबतें या वस्तू तयार करून विकण्याचें धर्मकार्य मात्र त्यांचें अहोरात्र चाललेलें ! या कर्तव्यांतच त्या नेहमीं चूर ! विशेषतः मुरंबे व सरबतें तर त्या इतक्या भाविकपणें तयार करीत कीं, त्या तोडीचीं उत्कृष्ट सरबतें व मुरंबे त्या काळीं सबंध आशियामध्यें मिळणें कठिण !—"

या वेळीं पाद्रीबुवांच्या जिभेभोंवतीं लाळेचें एवढें दाट आवरण आलें कीं, आंवढा गिळण्यासाठीं त्यांना थोडावेळ थांबणें भाग झालें.

" दुर्दैव आमच्या धर्माचें व आम्हां धर्मोपदेशकांचें कीं अशा त्या पावित्र्याच्या मूर्ती आज गोव्यांत मुळींच दिसून येऊं नयेत ! त्यांचा एकही मठ अस्तित्वांत असूं नये ! याला कारण तो चांडाळ ! Marquês de Pombal ! शंभरवर्षामागें या जोगिणींना व निरनिराळ्या पंथांतील इतर मठवासीयांना त्यांच्या मठांतून पुर्तुगेझ साम्राज्याबाहेर हुसकून लावण्याचें महापातक त्यानें केलें ! तेव्हांपासून साम्राज्यांतील इतर भागांप्रमाणेंच गोव्यांतही क्रिस्तांव धर्माला उतरती कळा लागली ! ती इतकी कीं, येथील हिंदू त्या वेळेपासूनच डोकें वर काढूं लागून आपले रानटी धर्माचार राजरोस, दिवसाढवळ्या व उघडपणें पाळण्याइतके उद्दाम बनले ! तो दुष्ट जणूं आम्हां पाद्र्यांच्या मुळावरच आला होता ! O homem que viveu e morreu com maldição de Deus ! ( त्याच्या जीवितावर व मृत्यूवर खचित ईश्वरी शाप पडला होता ! )..........

असो. अशा रीतीनें निरनिराळ्या कोंव्हेंतांतील पाद्रींचे थवेच्या थवे बोंझेजूसच्या मठांत येऊन पोंचले. त्यांच्याच जोडीला सांता फेच्या सेमिनारींतील शेंकडों धर्माभ्यासक विद्यार्थ्यांचे-होऊं घातलेल्या धर्मवीरांचे-ते कोंवळे व सतेज चेहरेही तेथें शोभूं लागले ! इतर भाविकांची गर्दी तर विचारूंच नका ! बोंझेजूसच्या मठाचें तें दालन म्हणजे केवढें विस्तीर्ण ! पण एका मुंगीलाही तेथें रीघ मिळेना ! असा हा अमर्याद श्रोतृसमुदाय आतां एकचित्तानें व क्षणोक्षणीं वाढत्या उत्कंठेनें आर्सेबिश्पाची मार्गप्रतीक्षा करूं लागला !

अखेरीस तो भला मोठा रौप्यखुरीस दूर दिसूं लागला ! ती उघडी पालखी जवळजवळ येऊं लागली व आपल्या खांद्यावर तो खुरीस वाहा-

णारा एक पाद्री तिच्यांतून बाहेर निघून अदबीनें बाजूस उभा राहिला ! त्या पालखीमागोमाग सात आठ कदमांवर येणारी ती झांकलेली पालखीही येऊन पोंहोंचली ! बहुमोल रेशमी कापडानें व भरजरी गोंड्यांनी सजवलेली व सोन्यारुप्याच्या पत्र्यांनीं मढवलेली ती सुंदर पालखी ! अहाहा ! खुद्द व्हिसिरेचेंही बिचाऱ्याचें तशा प्रकारच्या पालखींत बसण्याचें भाग्य नव्हतें ! ती थांबतांच दोघां सेवकांनीं पालखीचे पडदे बाजूला केले ! आर्सेबिश्पाची ती तेजस्वी मूर्ती पालखींतून बाहेर निघाली ! व आपल्या त्या खुरीसवाहक अग्रचरामागोमाग धिम्मे धिम्मे पावलें टाकीत व्यासपीठाकडे चालूं लागली ! त्या गुरुश्रेष्ठाला उत्थापन देण्यासाठीं हजारों भाविकांची ती सभा उठून उभी राहिली ! सर्वांचीं मस्तकें आदरातिशयानें खालीं वांकलीं ! पूज्यभावाच्या लहरी प्रत्येकाच्या हृदयांत उचंबळून आल्या !

व्यासपीठावर तो पुण्यात्मा विराजमान झाला ! साक्षात्काराच्या त्या स्वर्गीय वातावरणांत अजून त्याची दृष्टि विहरत होती, हें त्याच्या अर्धोन्मीलित नेत्रांवरून दिसून येत होतें ! पहांटे दिसलेल्या त्या तेजोवलयाची शुभ प्रभा कांही प्रमाणांत अजून मधून मधून त्याच्या मुखासभोंवतीं भासमान् होत होती !

तो गंभीर घंटानाद सुरू झाला ! बोंझेजूसच्या मठांतील तो अपूर्व धार्मिक समारंभ सुरू झाल्याची शुभवार्ता घेऊन त्या प्रचंड नादलहरींनीं आजूबाजूच्या पचक्रोशींत धांव घेतली ! मिसाच्या आरंभींचें स्तोत्रगायन चालू झालें ! ऑर्गावराद्य वाजूं लागलें ! गायकगणांतील पाद्री व जोगिणी आळीपाळीनें आपल्या सुस्वर कंठानें प्रभूला आळवूं लागल्या ! तें संपतांच आर्सेबिश्पाची पवित्र वाणी मिसाचा पाठ उच्चारूं लागली व एकूणएक भाविकाच्या चित्तवृत्ती त्याशीं तल्लीन होऊं लागल्या ! थोड्या वेळानें मिसाचा पूर्वार्ध संपला व गोव्याच्या इतिहा-

सांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यालायक अशा त्या आपल्या संस्मरणीय सेर्मावांस त्या गुरुश्रेष्ठानें आरंभ केला ! अहाहा ! धन्य तो दिवस ! त्याच्या मुखांतून स्रवणाऱ्या प्रत्येक शब्दामध्यें भरलेलें काय तें त्या वेळचें तेज, ओज व सामर्थ्य ! पण त्यांत नवल कसलें ! प्रत्यक्ष सां पावलु, सां फ्रांसिष्कु-द-आसिसी, सांतु आंतोनियु व सां शावियेर यांसारखे मागे होऊन गेलेले प्रेषितच आपापला संदेश तेथे जमलेल्या त्या भाग्यवंत भाविकांस त्या दिवशीं पुनः आर्सेबिश्पुच्या तोंडून ऐकवीत होते !

मानवजातीच्या त्या महान् उद्धारकाच्या, क्रिश्ताच्या शिकवणीचें माहात्म्य त्यानें वर्णन केलें ! क्रिश्तप्रभूच्या निरनिराळ्या श्रेष्ठ भक्तांनीं ती शिकवण आचरणांत आणून धर्मप्रचारार्थ केलेल्या अचाट कृतींची भाविकांस आठवण करून दिली ! व सध्या कोसळलेली आपत्ती म्हणजे मागील शतकांतील तें धर्मप्रेम लोकांमधून ओसरूं लागलें असल्यामुळें त्याविरुद्ध ईश्वराकडून मिळालेला कसा स्पष्ट इषारा आहे, ही गोष्ट विशद केली !

त्याच्या त्या प्रभावशाली वाणीचा परिणाम काय सांगणार ? भाविकांचीं मनें पश्चात्तापानें व भक्तिभावानें वितळून गेलीं ! व त्यांच्या डोळ्यांतून अश्रूंचा लोट सुरू झाला !

"पण भिण्याचें कारण नाहीं !" कांहीं वेळानें आर्सेबिश्पाच्या तोंडून प्रेमाच्या ओलाव्यानें थबथबलेले हे आश्वासनपर शब्द निघाले !

"तुमचीं मनें पश्चात्तापानें पुनीत होतील व आपल्या धर्मविषयक कर्तव्यास तिळमात्रही न चुकण्याचा याच मंगल क्षणीं निर्धार कराल, तर याही घोर अरिष्टाचें निवारण करण्यास तो स्वर्गस्थ सां शावियेर समर्थ आहे !

Humilitate capita vestra Deo ! ("ईश्वरासमोर आपलीं मस्तकें अवनत करा ! )"

हें शेवटचें वाक्य उच्चारून आर्सेबिश्पुनें आपलें सेर्माव संपवलें. धीरगंभीर स्वरांत त्याच्या तोंडून बाहेर पडलेली ती लॅटिन बायबलोक्ति सबंध सभागृहांत घुमली व तेथील एकूणएक श्रोत्याच्या हृदयावर कायमची कोरली गेली !

नंतर ऑश्तियाच्या त्या शुभकारक विधीस सुरवात झाली ! व्यासपीठावर गव्हांचा पाव दिसू लागला ! तें एवढेंसें दृश्य ! पण पवित्रीकरणाचा संस्कार त्याजवर घडून क्रिश्तप्रभूच्या देहाचें त्यांत संचरण होतांच सभागृहांतील हजारों नेत्र अनिमिषपणें त्यावर खिळून राहिले ऑश्तियाचें आशीर्वचन ऐकण्यासाठीं प्रत्येकाचे कान अधीर झाले ! तोंच ‘ Tantum Ergo ’ गाण्यास सुरवात झाली व तें संपल्यावर त्या पवित्र पावाच्या वतीनें आर्सेबिश्पाच्या तोंडून आशीर्वचन निघालें ! भक्तजन कृतार्थ झाले ! त्या वेळच्या त्यांच्या भावनांचें कोण वर्णन करील ? शपथेवर सांगतों, एवढ्या प्रचंड भाविकसमुदायानें इतक्या तादात्म्यवृत्तीनें साजरा केलेला ऑश्तियाचा विधी खुद्द रोममधील पापमहाराजांच्या त्या सां पेद्रूच्या इग्रेझमध्येंसुद्धां आजवर घडला नसेल !

ऑश्तियाच्या विधीनंतर मिसाचा राहिलेला उत्तरार्धही यथायोग्य रीतीनें पार पडला. जिकडे तिकडे भाविकांमध्यें आतां चलबिचल सुरू झाली ! नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्या थोर विभूतीचे चरण किंवा निदान वस्त्र यांस स्वतःचा ओष्ठस्पर्श घडावा, म्हणून त्यांच्यामध्यें अहमहमिका सुरू झाली ! तोंच आर्सेबिश्पुची अंगुली वर गेली ! गंभीर मुद्रेनें त्यांनीं सर्वास शांततेचा इषारा दिला व ते म्हणाले,

“ अजून आपलें आजचें कर्तव्य पुरें झालेलें नाहीं ! आज ह्या स्थळीं एक दिव्य घडावयाचें आहे ! तुम्हां भाविक वर्गाच्या श्रद्धेमध्यें आलेला हिणकसपणा त्या दिव्यांत जळून जाणें अवश्य आहे ! ”

सर्व सभा आश्चर्यस्तंभित झाली ! जिकडे तिकडे पूर्ण निस्तब्धता पसरली ! सभागृहामधील हजारों डोळे अनिमिषपणें आर्सेबिश्पु आतां पुढें काय करतात याकडे लागून राहिले !

व्यासपीठासमोर नम्रभावानें अवनतमस्तक होऊन बसलेल्या व्हिसिरैकडे एक सूचक दृष्टिपात फेकून ती धर्ममूर्ती व्यासपीठावरून खालीं उतरली व जवळच असलेल्या सांफ्रांसिश्कु शाव्हियेरच्या त्या पवित्र अस्थिस्थानाकडे वळली ! त्यांच्या मागोमाग पाद्रीखात्यांतील चारपांच वरिष्ठ धर्मोपदेशक व व्हिसिरै चालूं लागले ! त्या पुण्यस्मरण संताच्या अस्थिस्थानासमोर नंतर घडून आलेल्या त्या अभूतपूर्व प्रकाराचें वर्णन या पामराच्या दुबळया वाणीकडून कसें होऊं शकेल ?”—

पाद्रीबुवांना यावेळीं इतका गहिंवर आला कीं पांचदहा क्षण त्यांच्या तोंडून शब्द फुटेना !

“ ‘ Oriente Conquistada ’ च्या त्या महान् लेखकाच्या सामर्थ्यवान् लेखणींतून निघून, इतिहासांत वज्रलेप झालेले हे शब्दच तुम्हाला काय तें सांगतील ! ऐका—

‘ O Conde Vice Rei....recorreu ao patrocinio de S. Francisco Xavier e descendo á sua capela com os religiosos da casa Professa depois de se rezarem as ladainhas, antifona e oração do Sancto accenderam as tochas e se abriu o tumulo do Sancto e o Vice-rei lhe eutregou o bastão e a patente Real e um papel de sua letra e signal no qual em nome do sere-

nissimo Rei de Portugal commetia o governo do Estado para que o defendesse e conservasse com seu milagroso patrocinio. Retirou-se o conde a orar para a parte de cabeceira do sancto com muitas lagrimas e suspiros; mostrando tanto valor e coragem para defender a India com a espada, como devoção e piedade para combater o Ceu com orações!'

[ ' सां फ्रांसिश्कु शावियेरकडून संरक्षण व्हावें या हेतूनें कोंद व्हिसिरें त्यास शरण गेला व कांहीं मठवासीयांसह त्याच्या समाधि-मंदिराशीं जाऊन लादाईज्य, आंतिफोन व संताची प्रार्थना म्हटल्यावर मेणबत्त्या पेटवण्यांत आल्या व संताचें थडगें उघडून राजदंड व राजाची सनद हीं त्यानें त्या थडग्यासमोर ठेविलीं. त्याचप्रमाणें सां शावियेरच्या अद्भूतचमत्कारयुक्त दैवी कृपेच्या द्वारें गोव्याचें रक्षण व जतन व्हावें यासाठीं त्या प्रांताचा राज्यकारभार पुर्तुगालच्या राजाच्या नांवें त्याच्या हवालीं केल्याबद्दलचें दानपत्रही व्हिसिरेनें त्याच्या स्वाधीन केलें. नतर संताच्या शवाच्या उर्ध्वभागाकडे वळून एकांतांत बहुत अश्रु गाळीत व निःश्वास सोडीत कोंद त्यास आळवूं लागला. तरवारीच्या जोरावर इंदियाचें रक्षण करण्याचे कामीं जितकें शौर्य व धैर्य त्यानें व्यक्त केलें होतें, तितकीच भाविकता व धर्मनिष्ठा अशाप्रकारें ईश्वरप्रार्थनेच्या द्वारें आधिदैविक आपत्तींस तोंड देतांनाही त्यानें प्रकट केली!']

आणि अशा रीतीनें भक्तियुक्त अंतःकरणानें नेत्रांतून अश्रूंच्या धारा गळवीत आर्सेबिश्पुच्या आज्ञेनुसार गोव्याची ही भूमि व्हिसिरेनें त्या संताच्या हवालीं केली न केली, तोंच काय सांगणार महाराज तेथें घडून आलेला तो चमत्कार!

पण एका दृष्टीनें तो चमत्कार घडून आला यात आश्चर्य कसलें ? आजसुद्धा एखाद्या आंधळयानें येऊन भेटीदाखल आणलेला नुसता एक मेणाचा डोळा त्याच्या वेदीसमोर ठेवला व केली प्रार्थना की, लगेच त्या आंधळ्याला दृष्टि प्राप्त झाली ! एखाद्या बहिऱ्यानें मेणाचा कान नजर केला की तत्काळ त्याची कर्णेंद्रियशक्ति त्याला लाभलीच ! असे चमत्कार हरहमेष त्या विभूतीच्या कृपेनें घडलेले आपण पाहात नाहीं काय ? आवळा देऊन कोहळा काढण्याचे तुम्हां हल्लीच्या लोकांचे हे स्वार्थी डावसुद्धा सहज खपून जावे एवढी त्या बिचाऱ्याची अमर्याद भूतदया ! मग त्या वेळी तर प्रत्यक्ष ख्रिस्तीसेंच त्या संताला शरण गेलेला ! एवढें वैभवशाली गोव्याचे राज्यच त्यानें त्याच्या चरणी वाहिलेले ! मग तशा त्या प्रसंगी सां शाविेयेरनें आपलें अचाट दैवी सामर्थ्य तत्काळ व्यक्त करावें हें साहजिकच ! अशा आपत्काळी जादूच्या कांडाप्रमाणें उपयोग व्हावा म्हणून तर त्या साधुश्रेष्ठाच्या शवाला गेल्याच्या शतकात जगभर असलेल्या मागणी धुडकावून लावून व नाना उपद्व्याप करून त्याना या आमच्या प्रांतामध्ये कायमची प्रतिष्ठापना करण्याचा आम्ही पाद्र्यांनी दूरदर्शीपणा दाखवला ! एवढेंच नव्हे तर त्या शुभदर्शन शवाचे तुकडे निरनिराळ्या ख्रिस्तांव देशातील लोभी भक्तांनी लावून नयेत, म्हणून आम्हाला किती जपावें लागलें ! आजवर कसा अगदी डोळयांत तेल घालून अहोरात्र बोंझेजूसच्या मठाभोवती आम्हां पाद्र्यांना जागता पाहारा ठेवावा लागला आहे ! ती तर आमची वाडवडिलार्जित शाश्वत मिरास ! तिचा एक एक अल्पांशही आम्ही कधी हातचा सोडू का ? हो, पण त्या अमोलिक देहाचा एक सबंध हात एका काळीं आम्ही अभाग्याना गमावलाच ! खुद्द पोपमहाराजाचीच मागणी आली ! नाहीं म्हणवेना ! डावा हात तोडून दिला रोमला पाठवून ! तसेंच त्या महान् संताचें डोकें आजवर

उघडेंच असावें, हीही एक नामुष्कीचीच गोष्ट ! पण त्याला इलाज काय ? त्या वेळच्या पुर्तुगालच्या राणीला जडलेला डोकेंदुखीचा रोग दुसऱ्या कोणत्याही उपायानें हटेना ! पुर्तुगालहून हुकूम येतांच व्हिसिरेनें सांशाव्हियेरच्या डोक्यावरील टोपडें बुचाडलें व केलें पुर्तुगालला रवाना ! तें राणीनें स्वतःच्या डोक्यावर ठेवलें, तेव्हांच त्या रोगापासून तिची मुक्तता झाली ! आणि साधुवर्याच्या एका पायाचा नाहींसा झालेला तो अंगठा ! ती मात्र शुद्ध उचलेगिरी ! कुठल्या मसणांतून कोण एक अनोळखी भाविक संताच्या दर्शनासाठीं म्हणून येतो काय ! शवाच्या चरणांचें चुंबन घेण्यासाठीं खालीं वांकतो काय व तेवढ्यांतल्या तेवढ्यांत सांशावियेरचा पवित्र अंगठा आपल्या त्या पापी तोंडामध्यें तोडून घेऊन कोव्हेंतांतून पसार होतो काय ! सगळाच लफंगेपणा ! आम्हां पाद्र्यांच्या डोळयांत धूळ फेकून संताच्या शवावर घातलेला हा प्रत्यक्ष दरोडा ! तो भामटा त्यावेळीं हातीं सांपडला असता तर त्याचें टाळकेंच सडकलें असतें !"

पाद्रीबुवांनीं यावेळीं टेबलावरील आपला सागवानी दंडुका उचलून तो हवेंतील एका काल्पनिक डोक्यावर हाणला !

"हो ! अशा रीतीनें ज्या सां शाव्हियेरच्या शवाचें आम्ही पाद्र्यांनीं जिवापाड जतन केलें, त्याचें त्यावेळीं व्यक्त झालेलें काय तें अद्भुत दैवी सामर्थ्य ! आपला राजदंड व दानपत्र वेदीवर ठेवून व्हिसिरे सां शाव्हियेरच्या त्या पवित्र अस्थिस्थानापासून दूर होतो न होतो, तोंच एकाएकीं जणूं वीज कोसळून मेघांचा गडगडाट सुरू व्हावा त्याप्रमाणें दुरून तोफांचा जंगी धडधडाट बोंझेजूसच्या कोव्हेंतांत ऐकूं येऊं लागला ! सांतइस्तेव्हांव बेटावरील मराठ्यांच्या हालचालीवर पाळत ठेवण्यासाठीं त्या बेटाच्या आसपास येरझारा घालणाऱ्या पुर्तुगेझांच्या लढाऊ गलबतावरून तोफांच्या आनंदसूचक बारांचा तो एकसारखा

धूमधडाका सुरू झाला होता ! त्याचें कारण समजून घेण्यासाठीं सर्वांची उत्कंठा उतास आली आहे, तोंच तें अकल्पित वर्तमान येऊन थडकलें ! मराठ्यांनीं गोवा प्रांतांतून आपलें तोंड काळें केलें आहे ! एकाएकीं सांत इस्तेव्हांव बेट सोडून संभाजी आपल्या सैन्यासह स्वदेशीं जाण्यासाठीं घांट चढूं लागला आहे !

'Viva S. Francisco Xavier! Viva O Arcebispo! Viva O El-Rei! Viva O Vice-Rei!'

('सां फ्रांसिस्कु शावियेरचा जय असो ! आर्सेबिस्पु महाराजांचा जय असो ! राजाचा जय असो ! व्हिसिरैचा जय असो !') आनंदानें बेहोष झालेल्या त्या हजारों भाविकांच्या या अशा प्रचंड जयघोषानें तो बोंझेजूसचा मठ लगेच दुमदुमून गेला !

सां शावियेरनें आपल्या अगाध कृतीनें रक्षण केलेल्या त्या भाग्यवान् गोवें नगरीमध्यें त्या दिवशीं रस्त्यावर पाहाल तिकडे रंगीबेरंगी पताका, तोरणें व पानांफुलांच्या माळा शोभूं लागल्या ! नृत्यवादन करीत नागरिकांचे मेळे रस्तोरस्तीं मिरवूं लागले ! जेथें तेथें गर्नेळफटाके यांच्या बारांचा धडाका ऐकूं येऊं लागला ! प्रत्येक कोव्हेंत, प्रत्येक घर रात्रीं रोषनाईनें लखलखूं लागलें ! घरोघर त्या दिवशीं सान्नांची व व इतर पक्वानांची इतकी चंगळ उडाली, कीं नाताळच्या दिवसांतही तितकी होत नसेल ! आणि दुसरा दिवस उजाडतो तों, शहरांत एकसुद्धां दारूचें पीप शिल्लक राहिलें असेल तर शपथ !

त्याचप्रमाणें दुसऱ्या दिवशीं ईश्वराचे आभार मानण्यासाठीं पुनः त्याच बोंझेजुसच्या मठामध्यें साजरा झालेला तो 'Te Deum' गाण्याचा जंगी समारंभ तर काय विचारतां ? न भूतो न भविष्यति !

बाबा ही अशी आहे आम्हां पाद्र्यांची पुण्याई !"

हें शेवटचें वाक्य साभिनय उच्चारून त्याचा कारकुनावर कितपत परिणाम झाला आहे, याचें मोजमाप घेण्यासाठीं पांचदहा क्षण थांबल्यावर तुच्छतेनें त्याजकडे टवकारून पहात पुनः चेव येऊन ते बोलूं लागले.

"एकाएकीं कोलमडून पडूं लागलेली या प्रांतावरची पुर्तुगेझांची पांखर आम्ही आपल्या धार्मिक बलाच्या जोरावर त्यावेळीं सांवरून धरल्यामुळेंच आज तुम्ही लोक चार घांस सुखानें गिळतां आहांत! नाहींतर तुमचे हाल आज कुत्राही खाता ना! फार दूर कशाला जा! तुझ्यासारखा रेम्याडोक्या इसम! दिवसांतून पांचसहा तास या 'बिब्ल्योतेक'मध्यें येऊन डुलक्या घेत बसायचें ही तुझी कामगिरी! पण तेवढ्यासाठीं दर महिन्याच्या कांठीं सरकारी तिजोरीतून तीसचाळीस रुपयांचा खुराक बिनबोभाट तुझ्या घरीं पोंहोंचतोच कीं नाहीं? तीच आज पुर्तुगेझांची राजवट येथें नसती तर! वीतभर लंगोटी लावून शेतांत 'इरीरी पोपोदादा!' करणेंच बेट्या तुझ्या नशिबीं येतें!"

सतत तास दीडतास कानावर आदळणाऱ्या पाद्रीबुवांच्या वक्तृत्वांतील एखादा मुद्दा कारकुनाला तंतोतंत पटला असेल, तर तो एवढाच! स्वतःच्या लायकीची त्याला पूर्ण कल्पना होती! माबाप पुर्तुगेझ सरकारविषयीं वाटणाऱ्या कृतज्ञतेनें बिचाऱ्याचें हृदय यावेळीं भरून आलें व पाद्रीबुवांचे हे शब्द मोकळ्या मनानें कबूल करण्याच्या हेतूनें लगेच त्यानें आपली मान डोलावली!

"पण नंदीबैलासारखी अशी नुसती मान हलवून काय उपयोग!" धिक्कारयुक्त स्वरानें पाद्री ओरडले!

"तुम्हां भाविकवर्गाच्या तारणासाठीं सां फ्रांसिस्कु शावियेरसारख्या संतांनीं केलेले दैवीचमत्कार, पाद्र्यांकडून वेळोवेळ घडलेला आत्मयज्ञ, त्या शेंकडों जोगिणींनीं आपल्या संबंध आयुष्याचें धर्माला केलेलें दान,

या अशा गोष्टींच्या मननानें आत्मशुद्धि करण्याचा चुकूनसुद्धां प्रयत्न तुम्ही कधीं केला आहे का ? त्याबद्दल तिळमात्र कृतज्ञता तुमच्या मनांत वास करते का ? तुम्हां सर्वांचींच डोकीं आजकाल पाखंडाच्या रोगानें सडून गेलीं आहेत ! नाहींतर आम्हां पाद्रीवर्गाविषयी अशी बेपर्वाईची वृत्ती सध्या तुमच्यांत दिसून आलीच नसती ! इतर हजारों रीतीनें पैसे उधळाल ! पण बिचाऱ्या पाद्रीशीं संबंध आला, कीं तुमचा कद्रूपणा अचूक उचल खाईल ! लग्नविधीचे नेमके पांच रुपये पाद्रीच्या हातावर पडायचे ! बाप्तिस्म्याचे तीन ! त्यावेळीं अगदीं मारवाडी कांटेकोरपणा ! कधींकाळीं ठरून गेलेल्या या किमान वेतनाहून आपखुषीनें एक कवडी जास्त देण्याचा उदारपणा कधीं दाखवतील तर जणुं यांना नरकांतच जावें लागेल ! ”

संतापाचा वाढता आवेग आवरण्यासाठीं पाद्रीसाहेबांनीं आतां आपले ओंठ बळेंच मिटून घेतले.

शेवटीं थोड्या वेळानें समोर भिंतीवर टांगलेल्या घड्याळाकडे एकवार दृष्टि फेंकून व ‘जास्ती बोलण्यांत अर्थ नाहीं !’ असा आशय आपल्या चेहऱ्यावर व्यक्त करून ते ग्रंथालयांतून जावयाला निघाले. तास दीड-तास पुर्तुगेझमध्यें तावातावानें एखादें प्रवचन झोडल्यावर त्याचा उपसंहार आपल्या एखाद्या आवडत्या कोंकणी म्हणीनें किंवा सुभाषितानें करावा हा त्यांचा कधीं न चुकणारा नियम ! तदनुसार टेबलावरून आपली हॅट व काठी उचलतां उचलतां कारकुनाकडे तिरव्या नजरेनें पाहात ते वैतागानें कोंकणींत उद्गारले, “ हत्ती वाळला म्हणून त्यास गोठ्यांत बांधण्याचा मूर्खपणा केल्यास तो कधींही भोंवल्याशिवाय राहाणार नाहीं बरं ! ”

पाद्रीबुवा दरवाजाकडे वळताहेत, तोंच माझ्या मनांत कांहीं विचार आला.

" सिंज्योर पाद्रि !" त्यांना थांबवण्याच्या उद्देशानें मी त्यांस अदबीनें हांक मारली. ते थांबले व मागें वळले.

" तुमचा इतिहासाचा व्यासंग खरोखर जबरा बुवा ! मला तर असं वाटूं लागलं आहे--तोंडदेखलें नाहीं बोलत हो !—कीं, लिसेवांतील तो इतिहासाचा युरोपियन प्रोफेसरसुद्धां ऐतिहासिक ज्ञानाच्या बाबतींत तुमच्या तोडीला उतरेल कीं नाहीं याची शंकाच आहे !" मी म्हणालों.

आपल्या विनययुक्त स्मितानें माझ्या या विधानांतील सत्य पाद्रीबुवांनीं कबूल केलें.

" आणि तुमची वर्णनशैली तरी किती सुंदर ! एखाद्या गोष्टीचें तुमच्या तोंडून वर्णन ऐकायाला मिळालें कीं, तें ऐकणाऱ्याच्या मनावर कायमचें ठसलेंच !—हो, पण गोव्याच्या रक्षणासाठीं सांशावियेरनें केलेल्या त्या अद्भुत चमत्काराचें वर्णन करतांना त्या गोष्टीमधला तो एक महत्वाचा दुवा तुम्ही कसा हो अजिबात गाळलात ?"

" कुठला ? कुठला दुवा मी गाळला ?" पाद्रींनीं लगेच उत्सुकतेनें प्रश्न केला.

" त्या पुर्तुगेझ हेरासंबंधींचा ! काय तें त्याचें अचाट कृत्य ! आणि केवढी त्याची कर्तव्यतत्परता ! " मी बोललों.

" नाहीं बुवा ! सां शावियेरच्या त्या चमत्काराशीं अशा एखाद्या पुर्तुगेझ हेराचा आलेला संबंध मला नाहीं माहीत !" गोंधळून जाऊन ते म्हणाले.

"वाः ! माहीत नाहीं ? सां शावियेरसाठीं त्या पुर्तुगेझ हेराला अंतीं करावा लागलेला आत्मयज्ञ म्हणजे तर हुतात्मतेचें जगाच्या इतिहासांतील एक अतिउदात्त उदाहरण आहे ! "

" असेल ! असेल ! सध्या त्या हेरासंबंधीं कांहीं नवीन माहिती उपलब्ध झाली असेल ! अलीकडे पुर्तुगालहून दर पाकेतीला नवीन

निघालेल्या पुस्तकांचा नुसता ढीगच्या ढीग येथें येत असतो ! तीं सगळीं वाचणें हें माझ्यासारख्याला या उतार वयांत आतां अशक्यच ! तरी बरं, तुम्हां तरुण मंडळीमध्यें आतांशा पुर्तुगेझांच्या इतिहासासंबंधीं बरीच आवड उत्पन्न झालेली दिसते ! बोला, बोला पाहूं त्या हेरासंबंधीं काय नवीन माहिती तुमच्या वाचनांत आली आहे ? " अधीरपणें हे शब्द उच्चारीत ते पुनः खुर्चीवर विराजमान झाले.

"अत्यंत धार्मिक वृत्तीचा, निधड्या छातीचा, हिकमती व शूर म्हणून त्या पुर्तुगेझ हेराची त्या काळीं गोव्यांत प्रख्याति होती !—" मी सुरवात केली.

" अर्थात् मराठ्यांची स्वारी होतांच त्यांच्या हालचालीच्या बातम्या काढण्याच्या कामगिरीवर व्हिसिरै कोंद-द-आल्व्होरनें त्याची नेमणूक केली. अणि तो बेटा इतका हुषार कीं, थेट संभाजीच्या जनानखान्यांत-सुद्धां त्याचा प्रवेश ! आज संभाजीची कोणती राणी कोणत्या रंगाची साडी नेसली होती, ही बातमीही त्याच्याकरवीं व्हिसिरैच्या कानां-वर ! "

पाद्रीसाहेबांचा चेहरा खुलून आला !

" सांतइस्तेव्हांव बेटावरून मराठ्यांची धाड गोवा शहरावर येते आहे हें वर्तमान आल्यापासून राजधानींतील एकूणएक इसम हवाल-दिल होऊन गेला आहे, तर हा तिकडे मराठ्यांच्या गोटांत निर्धास्त करतो आहे संचार ! सकाळीं हिंदु भटजीचें बेमालूम सोंग घेऊन संस्कृत मंत्र पुटपुटत दक्षिणा मागत फिरेल, दुपारीं मासेविक्या खारव्याचाच वेष घेईल, तर संध्याकाळीं तरुण कलावंतीण बनून पायांत बांधलेल्या चाळांचा रुणझुण आवाज करीत व मुरके मारीत मराठ्या शिलेदार-बारगिरांच्या राहुट्यांभोंवतीं घिरट्या घालील ! स्वारी कमालीची बहु-रूपी ! त्याला कुठली एवढी ती कला साधली होती, देव जाणे ! "

"हँ ऽ ! हँ ऽ ! हँ ऽ ! " पाद्री खुषींत येऊन चीत्कारले !

"अशारीतीनें नाना बतावण्या करीत छावणींत फिरतां फिरतां एक दिवस कुणाकडून तरी त्याला सुगावा लागला कीं, संभाजी आपल्या प्रधानांबरोबर कसल्या तरी महत्वाच्या गोष्टीचा खल करीत बसला आहे ! संभाजीच्या तंबूभोंवतीं कितीतरी चौक्या पाहाऱ्यांचा कडेकोट बंदोबस्त ! पण त्याला थोडीच त्या गोष्टीची दरकार ! मोठ्या शिताफीनें केला त्यानें थेट आंतपर्यंत प्रवेश ! व लावले आपले कान तंबूच्या पडद्याला !

त्याचा कार्यभाग साधायाला वेळ लागला नाहीं ! लगेच तेथून नदीकिनाऱ्याकडे त्यानें तीरासारखी धांव घेतली ! याचवेळीं दुर्दैवानें कांहीं मराठे शिपायांस त्याचा वहिम आला ! घातला त्यांनीं त्याला गराडा ! पण तो थोडाच डगमगतो आहे ! कोणाचें तरवारीनें डोकं उडव ! कोणाच्या छातींत जंबिया खुपस ! कोणाला लाथेनें दूर झुगारून दे ! असं करीत वेढा फोडून दिली त्यानें त्यांच्या हातावर तुरी ! शेंकडों शिपाई पाठलाग करताहेत ! त्यांच्या बंदुकीतून सुटणाऱ्या गोळ्यांपैकीं कांहीं त्याच्या अंगाला चाटून जाताहेत; कांहीं पाठींत, कुशीत, पायांच्या पोटऱ्यांत घुसताहेत ! पण पुर्तुगाल देशांतल्या पोर्तुद्राक्षासवावर व सार्दिंज्य व सालोमांव माशांवर पोसलेला त्याचा तो कणखर देह त्या जखमांना कसची दाद देतो ! "

"खरं आहे ! पुर्तुगेझांचा पिंड म्हणजे जणूं लोखंडच ! " हर्षाची उकळी फुटून पाद्रीसाहेब उद्गारले !

"म्हणूनच अंगांतून रक्ताचे ओहोळ वाहाताहेत अशा स्थितीत एकसारखी दोनतीन मैल दौड करीत त्या बहाद्दरानें किनारा गांठला; जवळच असलेल्या एका पनेळांत उडी मारली व इतक्या वेगानें राज-

धानीच्या दिशेला वल्हवायला सुरवात केली कीं मराठे शिपाई नुसते 'आ' वासून त्याजकडे पाहातच राहिले ! घायाळ झालेल्या त्याच्या दंडांतून वाहाणाऱ्या रक्तानें सबंध नदीचें पाणी लाल होऊन गेलें ! पण गोवाबेटाचा किनारा गांठीपर्यंत एक क्षणभरही त्यानें वल्हें बाजूला ठेवलें असेल तर शपथ ! "

" Bravo ! " ( " भलेबहाद्दर ! " ) आवेशानें पाद्रीबुवांच्या तोंडून शब्द निघाला.

" आणि गोवाबेटाच्या किनाऱ्यावर पाऊल ठेवल्यावर विश्रांतीसाठीं क्षणभरही तो थांबला आहे का ? नाहीं ! कर्तव्यापुढें आपल्या शरिराची त्याला कुठली पर्वा ? किनाऱ्यावरून व्हिसिरेच्या पालासियु-द-पोल्व्होरकडे त्यानें पुनः धूम ठोकली ! सबंध रस्ताभर रक्ताच्या धारा गळवीत वाऱ्याच्या वेगानें पळणाऱ्या त्या जवानाला पाहातांच रस्त्यांत तमासगिरांची कोण गर्दी जमली म्हणतां ! जो तो त्याजकडे विचारपूस करूं लागला ! पण त्यांच्यासाठीं एक क्षणही गमावण्यास तो तयार नव्हता ! त्याची दृष्टि पालासियु-द-पोल्व्होरच्या बुरुजावर खिळली होती व त्याचे पाय व्हिसिरेच्या त्या निवासस्थानाच्या दिशेकडे जणूं कळ फिरवलेल्या एखाद्या यंत्राप्रमाणें एकसारखे धांवत होते ! पण काय आश्चर्य ! पालासियु-द-पोल्व्होर गांठण्यापूर्वी वाटेवर आर्सेबिश्पुचा तो भव्य वाडा लागतांच त्याचे पाय एकाएकीं थबकले ! पण त्यांत आश्चर्य तरी कसलें ? जिवावर उदार होऊन मराठ्यांच्या छावणीमध्यें पैदा केलेली ती लाख मोलाची बातमी व्हिसिरेला विदित करण्याआधीं प्रथम आर्सेबिश्पाच्या चरणांशीं सादर करावी असा त्या भाविक हेराच्या मनांत विचार येणें हें साहजिक आहे ! कारण त्याकाळीं राज्यकारभाराच्या बाबतींतसुद्धां आर्सेबिश्पाची व्हिसिरेवरही हुकमत ! इतका त्या काळी धर्माला मान ! शिवाय इतक्या महत्वाची व आनंदाची बातमी

आणल्याबद्दल व्हिसिरैनें खूष होऊन फार तर मोहोरांची एखादी पिशवी त्याजवर फेंकली असती ! त्याचा तनखा वाढवला असता ! कांहीं किताब बहाल केला असता ! पण या सर्व गोष्टींचें मोल प्रसन्न मनानें आर्से-बिश्पानें दिलेल्या एकाच आशीर्वचनाच्या पासंगालाही पुरलें असतें का ? मृत्यूचें बोलावणें आल्यावर व्हिसिरेकडून मिळालेल्या त्या मोहोरा, बढती, किताब मातीमोल ठरून धर्मगुरूकडून मिळालेल्या आशीर्वचनांची पुंजीच स्वर्गाचें दार स्वतःला खुलें व्हावयाला किल्लीप्रमाणें उपयोगी पडेल, या गोष्टीची त्या हेराला पूर्ण जाणीव होती !"

"Filho abençoado de Deus ! (ईश्वराच्या लाडक्या लेका !) किती सत्यानें भरलेले तुझे हे शब्द ! हिंदु असलास तरी तुझें हृदय धार्मिक आहे खास !"

'Filho abençoado de Deus !' ही पाद्रीबुवांच्या खूषमर्जीतल्या एखाद्याच व्यक्तीच्या क्वचित् वांट्याला येणारी त्यांच्या शब्दभांडारांतील एक अत्यंत मौल्यवान् पदवी होती. ती अशा रीतीनें मला बहाल करतांना प्रेमानें शाबासकीदाखल त्यांनीं माझी पाठ थोपटली !

पाद्रीसाहेबांचा अहेर कृतज्ञतापूर्वक स्वीकारण्यासाठीं थोडावेळ थांबल्यावर मी पुनः हेराकडे वळलों !

"—हो ! असा हा विचार त्या धर्मनिष्ठ हेराच्या मनांत येतांच तो तत्क्षणीं आर्सेबिश्पाच्या निवासमंदिरांत घुसला ! सेवकांनीं त्यास अड-वण्याचा प्रयत्न केला ! पण त्यांस न जुमानतां एकदम मंदिराच्या अंत-र्भागाकडे त्यानें धांव घेतली ! येऊं घातलेल्या मराठ्यांच्या अरिष्टाचाच आर्सेबिश्पु चिंताग्रस्त मनानें विचार करीत बसले होते ! त्यांच्यासन्निध जाऊन त्या हेरानें भक्तिभावानें त्यांच्यापुढें गुडघे मारले ! त्यांच्या

बुटांचें चुंबन घेतलें! व आपला हर्षावेग अश्रूंच्या रूपानें व्यक्त करीत तो बोलूं लागला, “ परमपूज्य धर्मगुरूंचा जय असो ! महाराज, एक अत्यंत आनंदाची वार्ता आपल्या चरणांशीं सादर करण्याचें भाग्य आज या नम्र सेवकास प्राप्त झालें आहे ! मराठे उद्यां आपली छावणी उठवणार आहेत ! सांतइस्तेव्हांव बेट सोडून परत स्वदेशीं जाण्यासाठीं घांटाच्या दिशेनें आपला मोर्चा फिरवण्याचा संभाजीनें नक्की बेत केला आहे ! प्रत्यक्ष संभाजीचेंच आपल्या प्रधानाशीं चाललेलें खलबत मी आज ऐकलें ! ”

पाद्रीबुवांचा एवढा वेळ खुललेला चेहरा आतां एकाएकीं संकोच पावला ! त्यांच्या भुंवयांनीं मुरड घेतली ! व कपाळावर सुरकुत्यांनीं गर्दी केली !

“ हेराच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच आर्सेबिश्पाच्या चेहऱ्यावरील चिंतेची दाट छाया पार नाहींशी झाली ! त्यांचा आनंद त्यांच्या हृदयांत मावेना ! पण कां कोण जाणे ! पांच दहा क्षण गेल्यावर झटकन् त्यांची चर्या पुनः बदलली ! संतापानें त्यांचा चेहरा लाल झाला ! आपल्या हातांतील दंडुका उभारून व त्याचा टोला ताडकन् हेराच्या डोक्यावर हाणून ते ओरडले, ‘ काय हा पाखंडीपणा ! प्रत्यक्ष धर्मगुरूशीं प्रतारणा ! पांचदहा मोहोरांच्या आशेनें खोट्या बातम्या घेऊन येण्याचें धाडस ! तुझ्यासारख्या इसमाला मरणोत्तर नरक तर ठवलेलाच ! पण इहलोकीं तुझ्यासारख्याला असाच मोकळा सोडला, तर पाखंडाची ही सांथ किती फैलावेल याचा नेम नाहीं !”

त्यांनीं लगेच सेवकांना हांक मारली ! “करा या पाखंड्याची आत्तांच्या आतां आल्झुबांत रवानगी !” त्यांनीं हुकूम दिला !

हेराच्या हातींपायीं कड्या ठोकल्या गेल्या व लगेच आल्झुबाचें अंधारें तळघर बिचाऱ्याच्या नशिबीं आलें! आल्झुबा म्हणजे इन्किझिसांवांचें लहानगें पण तुल्यगुणी भावंड! धर्मगुरूंचा तो खासगी तुरुंग! तेथें गेलेला इसम जिवंतपणीं तेथून बाहेर निघाला असें कधींच झालें नाहीं!

अशा रीतीनें हेरानें आणलेली ती बातमी षट्कर्णी होण्याचा योग केव्हांही आला नाहीं! ती त्याच्याबरोबरच त्या आल्झुबाच्या तळघरांतील अंधारांत कायमची गाडली गेली!"

"अँ ऽऽ अँ ऽऽ अँ ऽऽ!" पाद्री आपल्या डोळ्यांचीं बुब्बुळें गरगरां फिरवीत मानगुटी पकडलेल्या बोक्याप्रमाणें गुरगुरले!

"आपण गाळलेला दुवा तो एवढाच! ही हकिगत आदले दिवशीं घडली! नंतर दुसरे दिवशीं आपण कथन केलेल्या त्या एकूण एक इतर गोष्टी घडून आल्या! सां शावियेरनें केलेल्या त्या महान् चमत्काराविषयीं कोणा पाप्याच्या मनांत शंका येईल? आर्मेबिश्पाची अष्टौप्रहर अन्नापाण्यावांचून ओरातोरियुमध्यें चाललेली ईश्वरप्रार्थना, त्याच्या मुखाभोंवतीं दिसलेलें तें तेजोवलय, बोंझेजूसूच्या मठांतील तो ऑफिनयाचा विधी, तें अनवाणी चालणारे पाद्री, त्या सांता मोनिका मठांतील जोगिणी, त्यांनी तयार केलेलीं तीं सरबतें, मुरंबे—इ० आपण सांगितलेल्या सर्व गोष्टी तंतोतंत खऱ्या आहेत!"

"Maldito!" ("शप्ताधम!") नाक फेंदारून, डोळे लाल करून व ओंठ वासून पाद्रीमहाशयांनीं डुरकणी फोडली!

क्रोधानें थरथर कांपणारे त्यांचे ओंठ या ऐन वेळी निकामी झाले नसते, तर या शब्दाच्या जोडीला आणखी कितीतरी विशेषणाची त्यांनीं माझ्यावर फैर झाडली असती!



"तुम्हां सर्वांचींच डोकीं आजकाल पाखंडाच्या रोगानें सडून गेलीं आहेत!"

[ पृ. २३५ ]

" किती बनावट गोष्ट ! कुठल्या इतिहासांत आधार आहे हिला ? त्या तुमच्या पुराणांत ? त्या भारुड कथांच्या चोपड्यांत ?—" संतापातिशयाच्या भरांत खुर्चीवरून ताडकन् उठून व असे कांहीं शब्द तुटकपणें स्वतःशींच दांत ओंठ चावून उच्चारीत स्वारीनें लगेच ग्रंथालयाचा दरवाजा गांठला.

"पण महाराज, इतिहासाहूनही सारासारबुद्धीचा आधार जास्ती ग्राह्य नाहीं का ? " उत्तरादाखल माझ्या तोंडून हे शब्द निघताहेत, तोंच पाद्रि काब्राल दृष्टिआड झाले !

कारकुनानें एक निर्धास्तपणाचा व समाधानाचा लांब निःश्वास सोडला व टेबलावरील आपल्या हातांच्या चौकटींत पुनः आतां आपलें डोकें खुपसलें ! †

---

† "Aurangzeb ordered Prince Shah Alam to march with fortyfive thousand horsemen in the direction of Goa......Shah Alam took several of Sambhaji's forts and arrived near Goa in time to deliver the island from the hands of Sambhaji........It was already in great danger.........Sambhaji made every possible exertion to take it before Shah Alam arrived, but it did not happen according to his desire. Thus on the arrival of the mogul fleet, he was obliged to decamp......."

[ " अवरंगजेबानें आपला मुलगा शहाअलम याला पंचेचाळीस हजार घोडेस्वारांनिशीं गोव्याच्या दिशेला कूच करण्याबद्दल फर्मावलें......संभाजीचे निरनिराळे किल्ले घेत त्याच्या कचाट्यांतून गोवा बेटाची सुटका करण्याकरतां शहाअलम योग्य वेळीं गोव्याजवळ येऊन पोंहोंचला......गोवा बेटावर मोठेंच संकट ओढवलें होतें......शहाअलम येऊन पोंहोंचण्यापूर्वी तें बेट काबीज करावें या हेतूनें संभाजीनें केलेले प्रयत्न साधले नाहींत. अशा रीतीनें मोंगलांचें आरमार येतांच आपला तळ उठवणें त्यास भाग पडलें......." ]

—STORIA DO MOGOR

By Niccolao Manucci

---




*Those corpses of young men*
*Those martyrs that hang from the gibbets—those*
*hearts pierc'd by the gray lead,*
*Cold and motionless as they seem, live elsewhere*
*with unslaughter'd vitality !*

[ तरुण जनांचे ते मृत देह,
वधस्तंभि लोंबते हुतात्मे,
अग्न्यस्त्रें विंधिलींहि हृदयें,
थंड, अचेतन जरि तीं दिसलीं,
असती तीं इतरत्र जिवंत
अवधित ऐशा जीवनवीर्यें ! ]

—वॉल्ट व्हिट्मन्

चैत्र महिन्यांतला तो एक रविवार होता. कुंडई गांवांत असलेल्या आमच्या वडिलोपार्जित लहानशा वतनवाडींतील नारळ पाडण्याचें बरेच दिवस दिरंगाईवर टाकलेलें काम शेवटीं त्या दिवशीं कसेंबसें उरकून दिवस मावळण्याचे वेळेला घाईघाईनें मी नदीतीरावर

आलों. व्यंकू तांडेल आपल्या होडीसहित पूर्वींच तेथें येऊन माझी वाट पाहात उभा होता. त्याची मुद्रा बरीच त्रासलेली दिसत होती ! म्हातारा मनांत माझ्यावर खूब चरफडत असावा, हें मीं ताडलें. दुसरे दिवशीं पहांटेपूर्वीं त्यानें मला पणजीला नेऊन पोहोंचवावें, असा आमचा करार ठरला होता; पण ओहोटी सुरू होतांच मी किनाऱ्यावर येऊन हजर व्हावें, ही त्याची अट मात्र मला पाळतां आली नाहीं ! कारण ठरलेली वेळ टळून आतां तास दीड तास लोटला होता.

मी होडींत जाऊन बसलों न बसलों, तोंच त्यानें आपलें वल्हें जोरानें चिखलांत रोंवलें व होडी हांकारली. इतक्यांत मला एका महत्वाच्या गोष्टीची आठवण झाली ! " जरा थांब व्यंकू ! होडी पुनः तीराला लाव ! " मी म्हणालों.

आतां मात्र त्याला राहवेना ! नेहमींचीं आपलीं ठरींव सांच्याचीं वाक्यें भराभर उच्चारून माझ्या या दिरंगाईविरुद्ध त्यानें जोराची तक्रार केली ! नाविकशास्त्रांत नियमितपणाला केवढें महत्व आहे, हें त्यानें मुद्देसूद रीतीनें मला सांगण्यास सुरवात करून शेवटीं, प्रवाशांच्या या अशा अनियमितपणामुळें यापूर्वी वेळोवेळ स्वतःवर गुदरलेल्या अनेक बिकट प्रसंगांचा पाढाही त्यानें माझ्यापुढें वाचला ! पण किनाऱ्यापासून जवळच असलेल्या हरिबाबांच्या घरीं जाऊन आल्याशिवाय मला कुंडईहून निघणें शक्यच नाहीं, असें त्याला निक्षून सांगितल्यावर अत्यंत नाखुषीनें त्यानें होडी पुनः तीराला नेऊन लाविली. मी खालीं उतरलों व झपाट्यानें चालायाला सुरवात केली.

पणजीला आमच्या शेजारीं राहाणाऱ्या लखबाभाऊंची मुलगी शेवंती ही हरिबाबांची सून ! तिला भेटणें, ही कुंडई गांवाला गेल्यावर तेथील माझ्या कार्यक्रमांतील कधींही न चुकणारी अशी एक महत्वाची गोष्ट

असे. कामाच्या घाईत आज ती मी अजिबात विसरून गेलों होतों. उशिरां कां होईना, पण ती आठवली हें ठीक झालें ! नाहींतर घरीं जातांच " आमची शेवती खुशाल आहे ना ? " या आपल्या नेहमींच्या प्रश्नाला माझ्याकडून योग्य उत्तर न मिळाल्यामुळें, बिचाऱ्या लखबा-भाऊंची व त्यांच्या कुटुंबाची केवढी निराशा झाली असती ! शिवाय शेवं-तीला भेटणें या खेपेला चुकून राहतें तर मला स्वतःलाही थोडेंथोडकें वाईट वाटलें नसतें ! माझें तिच्यावर तसेंच प्रेम आहे ! आपल्या बाळपणांत ती माझ्या कटिखांद्यावर खेळली आहे ! तिचेंही मन माझ्या-कडे नेहमीं ओढ घेत असतें ! मी जरी तिचा नांवाचाच 'काका' असलों, तरी आपल्या खऱ्याखुऱ्या काकांवरही माझ्याइतका लोभ तिनें क्वचितच केला असता ! मी कुंडईला येणार आहें, हें वर्तमान आधीं कोणाकडूनही कळलें, कीं तिला नेहमीं आनंदाचें भरतें येतें, व अत्यंत उत्कंठेनें ती त्या दिवसाची वाट पाहात राहते ! अर्थात् मीही कामाच्या कितीही घाईत असलों, तरी तिची भेट घ्यायला कधींही चुकत नाहीं.

पांच मिनिटांच्या आंत मी हरिबाबांचें घर गांठलें. बाहेर ओटीवर शेवतीची सासू वाती करीत बसली होती. मला पहातांच तिनें हातां-तला कापूस बाजूला ठेवला व पुष्कळ दिवसांनीं भेटायला आल्याबद्दल आनंद प्रदर्शित करून, नित्याचे कुशल प्रश्न विचारण्यास सुरवात केली. मीही त्यांचीं त्रोटक व घाईघाईनें उत्तरें दिलीं, व " शेवंती कोठें आहे ? " असा तिला प्रश्न केला.

" वर माडीवर जा. गेले दोनतीन दिवस तिला व तान्ह्या मुलाला किंचित् ताप येत आहे !" ती म्हणाली.

मी तसाच आंत गेलों व जिना चढूं लागलों. कांहीं पायऱ्या चढ-

ल्यावर मी थबकलों, व आश्चर्यचकित होऊन ऐकूं लागलों ! माडीवरच्या खोलींत हलक्या पण गोड आवाजांत कोणीतरी गात होतें. आणखी दोनचार पायऱ्या चढल्यावर सकंप व सुस्वर उच्चारले जाणारे शब्द स्पष्टपणें माझ्या कानांवर आले—

“ वंदेऽमाऽऽतरम् ॥ सुजलांऽसुफलांऽ ”—

सुप्रसिद्ध ‘ वंदेमातरम् ’ राष्ट्रगीतांतील हे शब्द अनेकदां इतरत्र मी वाचले होते व गायलेलेही ऐकले होते, पण हरिबाबांच्या घरीं ते ऐकायला मिळतील, अशी माझ्या मनाला कधीं कल्पनाही शिवली नसती ! थोड्या वेळानें माझी खात्री झाली ! आवाज शेवंतीचाच होता ! मी बुचकळ्यांत पडलों ! शेवंतीला मी कधींही गातांना ऐकलें नव्हतें, व तिच्या बाबतींत ही गोष्ट घडणें अगदींच अशक्य ! कारण तिचें माहेर व सासर म्हणजे दोन्ही पक्षीं ‘ बालबोध ’ घराणीं ! पुनः पुनः तींच तींच कडवीं घोळघोळून अधिकाधिक मोहक रीतीनें गायलेलीं मी ऐकत होतों ! अनेक विचारांची माझ्या मनांत गर्दी उसळली !

शेवंतीच्या तोंडीं ‘ वंदे मातरम् ’ राष्ट्रगीत ! व तेंही तिनें इतक्या भावपूर्ण रीतीनें त्याशीं समरस होऊन म्हणावें ! त्यांतील प्रत्येक शब्द तिच्या हृदयाला जाऊन भिडल्याशिवाय ऐकणाऱ्याच्या मनोवृत्ती हलवून सोडणारी ही जादू तिच्या आलापांत आढळून येणें शक्य आहे काय ? मग लहानपणीं नुसती अक्षरओळखही न झालेल्या शेवंतीचें मन या गीतांतील उदात्त आशय संवेदनापूर्वक आकलन करण्याइतकें सुसंस्कृत व सुशिक्षित केव्हांपासून बनलें ? या मागासलेल्या लहानशा खेडेगांवांतील एका जुन्या वळणाच्या कुटुंबांतील शिक्षणाचा यत्किंचितही संस्कार न झालेली ही शेवंती जणूं यक्षिणीच्या कांडीनें एकाएकीं एक विदुषी बनून तर हा चमत्कार घडून आलेला नाहींना ? ”

माझ्या तर्कशक्तीस मी अनेकप्रकारें ताण दिला, पण त्याचा कांहींही उपयोग झाला नाहीं ! शेवटीं तिलाच या बाबतींत प्रश्न विचारावा व या कोड्याचा उलगडा करून घ्यावा, असें मी ठरविलें ! पण चालू असलेल्या तिच्या गाण्याचा मध्येंच विरस करणें मला योग्य वाटेना ! तल्लीन चित्तानें तें ऐकत मी तेथेंच उभा राहिलों. एकदोन मिनिटें तशा स्थितींत गेलीं असतील, तोंच माझ्या अत्यंत खोल मनोभागावरील एक पडदा एकाएकीं बाजूला होत असल्याचा मला भास झाला व त्यावर लिहिलेला एक जुना लेख माझ्या अंतःचक्षूंसमोर दिसूं लागला !

एक फार मागचा प्रसंग मला आठवला ! तो घडल्याला आज सोळा वर्षे लोटून गेलीं आहेत ! आजची ही अनपेक्षित गोष्ट कारण झाली नसती, तर त्या प्रसंगाची मला क्वचितच आठवण झाली असती ! लगेच त्यासंबंधींचे अनेक चित्रपट एकामागून एक भराभर मला दिसूं लागले ! आपल्या आयुष्यांत ज्या प्रसंगांनीं, ज्या गोष्टींनीं, आपल्या मनोवृत्तींचा ठाव घेऊन त्यांना जोराचें आंदोलन दिलेलें असतें, त्यांचा त्यावेळीं अंतःकरणावर उमटलेला ठसा, त्यावर काळाचे कितीही पडदे चढले तरी, कायमचा नष्ट होणें शक्य नाहीं ! कधींना कधीं असें एखादें क्षुल्लक कारणही पुरेसे होतें, कीं ज्यांचा ‘ क्ष ’ किरणाप्रमाणें उपयोग होऊन त्यायोगें ते पूर्वप्रसंग प्रत्यक्ष घडत असल्याप्रमाणें आपल्याला पुनः दिसूं लागतात !

होय मला पक्कें आठवतें ! तो प्रसंग १९११ सालचाच ! मी चारपांच दिवस बाहेर गांवीं होतों, तो नुकताच घरीं परत आलों होतों. बऱ्याच लांबच्या होडीच्या व बैलगाडीच्या प्रवासानें त्यादिवशीं मला अतिशय थकवा आला होता. अर्थात् नेहमींप्रमाणें मला त्यावेळीं शेवंतीची आठवण झाली ! तिचें त्यावेळीं वय केवळ सहासात वर्षांचेंच असेल. तिच्या व माझ्या वयांत केवढें तरी अंतर ! पण ज्या ज्या-

वेळीं कोणत्याही कारणानें माझें मन त्रस्त झालेलें किंवा शरीर थकलें-भागलेलें असे, त्या त्या वेळीं त्या चिमकुल्या जिवाच्या सहवासावांचून मला दुसरें कांहींही प्रिय नसे ! इतकेंच नव्हे तर त्या काळीं मजवर ओढवलेल्या माझ्या आयुष्यांतील कित्येक संसारतापांची झळ कमी करण्याचें श्रेयही तिच्या खेळांतल्या संसारांत भाग घेतल्यामुळें पारितोषकादाखल मला मिळणाऱ्या तिच्या गोड हास्यलकेरी, लडिवाळ हट्ट व प्रेमळ बोल यांनाच असे !

आमचें व शेवंतीचें घर हीं एकमेकांना भिडलेलीं होतीं. मध्यें केवळ पांचसहा हातांचेंच तेवढें अंतर ! माझ्या लिहिण्यावाचण्याची खोली त्यांच्या घराच्या बाजूलाच होती व त्या खोलीच्या समोरच असलेल्या आपल्या घरच्या एका मोकळया पडून असलेल्या खोलीमध्यें आपला तीनचार वर्षांचा भाऊ बाबू याजबरोबर किंवा शेजारच्या इतर मुलांबरोबर खेळण्यांत तिचा दिवसांतून बहुतेक सर्व वेळ जाई. अर्थात् मी माझ्या खोलींतील खिडकीशीं खुर्ची घेऊन बसलों कीं, शेवंतीच्या घरीं न जातांही माझें तिच्याबरोबर तासचे तास बोलणें, हंसणें व खेळणें चाले ! मी तेथें असलों कीं, तिलाही क्षणोक्षणीं माझी जरूर लागे; बाहुलीला सजवतांना तिला रेशमी साडी नेसवणें, तिचे नाककान टोंचून त्यांत नथकुडीं घालणें, असलीं जबाबदारीचीं कामें ती स्वतः न करतां, माझ्यावरच सोंपवी, व त्यासाठीं त्या बाहुलीला खिडकींतून हलकेच माझ्याकडे फेंकी ! कपाळाला कुंकूं लावून झाल्यावर त्याचा परीघ कमीजास्त झाला नाहीं याची खात्री करून घेण्याचे बाबतींतही हातांतल्या आरशापेक्षां मी दिलेल्या अभिप्रायावरच तिची अधिक भिस्त असे ! लहानग्या बाबूनें रागावून सत्याग्रह केला—त्याचा सत्याग्रह बहुधा अत्याचारी असे—व तिला जिकिरीला आणलें कीं, त्याच्याशीं तडजोड घडवून आणण्याची महादुर्घट गोष्ट तर माझ्याशि-

वाय दुसऱ्या कोणालाही साधत नाहीं, अशी तिची ठाम समजूत होती. सारांश आम्हां दोघांचें अशा प्रकारचें प्रेमळ व अनिवार्य परस्परावलंबन असे !

खोलींत जाऊन त्या दिवशीं नेहमींप्रमाणें मी माझी खुर्ची खिडकीजवळ ओढली व विश्रांतीसाठीं एकदांचें तिच्यावर अंग टाकून शेवंतीला एकदोनदां हांक मारली, पण तिची 'ओ' येईना ! वास्तविक या संध्याकाळच्या वेळीं बाहुलीच्या वराती, विहीणजेवणें इत्यादि लगीनघाईत किंवा फुगडी, आंधळी कोशिंबीर यांसारख्या खेळांच्या धूमधडाक्यांत ती दंग असलेली हटकून दिसायची ! शेवटीं मीं उभा राहिलों, व किंचित् बाहेर डोकावून तिच्या खोलीकडे नजर फेंकली, तों तेथें एक अकल्पित नवीन देखावा मला दिसून आला !

नेहमींप्रमाणें शेवंतीच्या खेळाचा अस्ताव्यस्त पसरलेला पसारा त्यादिवशीं मला तेथें पाहायला न मिळतां त्याऐवजीं एकदोन ट्रंका, बिछाने, चटया असें थोडें सामान व्यवस्थितपणें ठेवून दिलेलें व एका चटईवर दोघे कोणी अनोळखी इसम बसलेले मला दिसले ! त्यांपैकीं एकाचें वय अठराएकोणीस वर्षांचें व दुसऱ्याचें वीसबावीस वर्षांचें असल्याचें दिसत होतें; दोघांच्याही अंगावर बंगाली पद्धतीचें धोतर व पांढरे सदरे एवढेच कपडे होते.

माझ्या चारपांच दिवसांच्या गैरहजेरींत शेवंतीच्या खोलींत घडून आलेला हा पालट पाहून मला अचंबा वाटला ! पण शेवंतीची व छोट्या बाबूची त्या दोघां नवख्या माणसांकडे दिसून येत असलेली सलगी ही तर त्याहूनही अधिक आश्चर्याची गोष्ट होती !

त्या दोघां तरुणांपैकीं एकाच्या हातीं दिलरुबा असून तो त्याच्या तारा वळण्यांत गुंतला होता, व त्या त्याच्या कृतीकडे कुतूहलदृष्टीनें

टक लावून पाहात शेवंती त्याला अगदीं बिलगून बसली होती ! बाबूनें तर दुसऱ्याच्या मांडीवरच आसन ठोकून त्याच्या सदऱ्याच्या सोनेरी गुंड्या हस्तगत करून घेण्याच्या कामगिरींत तो अगदीं गढून गेला होता ! बराच वेळ हेंच दृश्य तेथें मला दिसत होतें. शेवटीं वयानें मोठ्या असलेल्या त्या तरुणानें तारा वळण्याचें काम संपवलें व स्वरपरीक्षेसाठीं निरनिराळ्या तारांवर बोटें फिरवून त्यांतून तुटक नाद काढण्यास सुरवात केली. ते ऐकतांच शेवंतीच्या तोंडावर आनंदाचें स्मित चमकलें ! ती किंचित् बाजूला सरकून वाद्य ऐकण्याच्या तयारीनें जरा नीटनेटकी बैठक घालून बसली, व नंतर बराच समजूतदारपणाचा आव आणून बाबूला म्हणाली, " सुरेशमामांच्या मांडीवरून आतां इथं येऊन बैस ! त्यांना गायाला नको का ? ते आतां गातील, व बीरेशमामा दिलरुबा वाजवतील, ये !"

बाबूनें लगेच सुरेशमामांची मांडी सोडली, व तो तिच्या शेजारीं जाऊन बसला ! स्वाभिमान बाजूला ठेवून आपल्या ताईचें सांगणें इतक्या बिनहरकत त्यानें ऐकल्याचा माझ्या तरी दृष्टोत्पत्तीस आलेला ह्या पहिलाच प्रसंग होता !

थोड्या वेळानें बीरेशचीं बोटें चपलतेनें दिलरुब्याच्या तारांवरून फिरूं लागलीं, व अत्यंत मधुर नाद त्यांतून बाहेर पडूं लागले. अंमळशानें सुरेशनें ' आमार देश० ' हें सुप्रसिद्ध बंगाली गीत गाण्यास सुरवात केली व त्यास बीरेशकडून दिलरुब्याची साथ मिळूं लागली. गायनवादाला अधिकाधिक रंग येऊं लागला, तसतसें शेवंतीचें तोंड अधिकाधिक प्रफुल्लित होऊं लागलें. तिला होणाऱ्या आनंदाच्या गुदगुदल्या मधून मधून हंसण्याच्या उकळ्यांनीं व्यक्त होऊं लागल्या ! बाबूच्या चेहऱ्यावरही आनंद, विस्मय, कुतूहल या भावनांची मिश्र छटा उमटली व त्या अभूतपूर्व अशा चमत्काराबद्दल त्याला पडलेलें

कोडें सोडवण्यासाठीं तो आळीपाळीनें बीरेश, सुरेश व शेवंती यांच्या तोंडाकडे आपली शोधक दृष्टि फिरवूं लागला !

शेवटीं सुरेशचें तें गाणें संपतांच तो म्हणाला, " काय शेवंती, कसें काय आवडलें ? पुरेना ? " त्याच्या बोलण्यांत हिंदी, बंगाली व मराठी शब्दांची भेसळ होई. शेवंतीला अर्थात् या तीनही भाषा कमी अधिक प्रमाणानें अपरिचित होत्या. तरीपण त्यांतील आशय तिच्या चटकन् ध्यानांत येई, असें दिसलें. ती बऱ्याच आर्जवी पण आग्रही स्वरानें म्हणाली, " आणखी एकच म्हणा ना ! "

बीरेशनें व सुरेशनें स्मितपूर्वक एकमेकांकडे पाहिलें व तिची विनंति मान्य करण्याचें ठरवलें. सुरेश पुनः गाऊं लागला !

" **वंदेऽऽमाऽतरम्......वंदेऽऽ** "—

नवीन सुरू केलेलें हें गीत सुरेशच्या विशेष आवडीचें असावें, हें कोणालाही कळून आलें असतें. त्याच्या कंठांतून बाहेर येणारा त्यांतील प्रत्येक शब्द, प्रत्येक आलाप माधुर्य व कारुण्य यानीं इतका ओथंबलेला होता, कीं त्या गीताचा अर्थ कळो वा न कळो, पण तें श्रवण करणाऱ्या कोणाचेंही हृदय त्यावेळीं उचंबळून आल्याशिवाय राहिलें नसतें ! पहिलें गीत ऐकून शेवंतीला मनमुराद आनंद झाला होता ! पण या दुसऱ्या गीताचा परिणाम तितक्यावरच थांबला नाहीं ! शेवटीं शेवटीं तें ऐकत असतां तिच्या चित्तवृत्तींना पाझर फुटला ! सुरेशच्या मुखावर एकसारख्या खिळलेल्या तिच्या डोळ्यांवर पाणी तरारूं लागलें ! कांहीं वेळानें तिच्या गालांवर त्यांतून टप् टप् आंसवें गळूं लागलीं ! बीरेश-बाबूची नजर तिच्या चेहऱ्याकडे जातांच त्यानें आपला दिलरुबा बाजूला ठेवला, सुरेशला नेत्रसंकेत केला व त्याला उद्देशून बंगालींतून दोनचार शब्द उच्चारले. सुरेशनें तत्क्षणीं आपलें गाणें थांबवलें व

शेवंतीकडे पाहतांच चटकन् आपल्या धोतराच्या टोंकानें तिचे डोळे टिपले ! नंतर उठून उभा राहून व तिला व बाबूला हातीं धरून तो म्हणाला "चला, आतां आपण बाहेर टेकडीवर फिरावयाला जाऊं !" लगेच तीं चौघेंही जणें खोली सोडून निघालीं.

आतांपर्यंत शेवंतीच्या खोलींत पाहिलेल्या या सर्व गोष्टींचा आश्चर्ययुक्त मनानें विचार करीत बराच वेळ तेथें खुर्चीवरच मी बसून होतों. पंधरावीस मिनिटांनीं शेजारच्या चर्चमधून संध्यासूचक घंटानाद सुरू होतांच मी भानावर आलों, व उठून आंत जायाला वळणार, इतक्यांत नुकतेच बाहेरून येणारे शेवंतीचे वडील आपल्या घराच्या पायऱ्या चढतांना मला दिसले. ते केव्हां भेटतात याची मी वाटच पाहात होतों. मी उतावीळपणानें त्यांना प्रश्न केला, 'कायहो लखबाभाऊ ? हे तुमच्याकडे नवीन आलेले व या खोलींत राहणारे दोघे इसम कोण ?"

"ते कोणी बंगाली विद्यार्थी आहेत ! चार पांच दिवसांपूर्वीं ते मला त्या झरीजवळ फिरतांना आढळले. जवळ येऊन मला हिंदीमध्यें म्हणाले, 'आम्ही बंगाली विद्यार्थी. मुंबईइलाख्यांतील कांहीं प्रेक्षणीय स्थळें पाहण्याच्या इराद्यानें प्रवासाला निघालों आहों. येथें गोव्यांत आल्यावर हा प्रदेश फार रम्य वाटला. असें टुमदार व सुंदर शहर तर आम्ही दुसरीकडे कुठेंही पाहिलेलें नाहीं ! या शहरांतच महिना पंधरा दिवस राहण्याचा आमचा विचार आहे. कुठेंही एखादी खोली भाड्यानें मिळवून द्याल व राहण्याची सोय कराल तर उपकार होतील !' त्यावर मला विचार पडला, कीं यांना अशी चांगली जागा कुठं मिळेल ? तुम्हाला माहितच आहे, अलीकडे या शहरांत जागेची किती टंचाई झाली आहे ! शेवटीं माणसं सज्जन दिसल्यावरून मी त्यांना म्हणालों, 'इतक्या थोड्या दिवसांचीच गोष्ट असली, तर तुम्ही भाड्यानें जागा

न घेतली तरी चालेल, आमच्या घरींच तुम्हाला राहायाला एखादी खोली मी देऊ शकेन.' तेही कबूल झाले. ही आमची खोली मोकळीच पडून होती. तिथं येऊन राहताहेत झालं!"

लखबाभाऊंच्या या उत्तरानें माझ्या कुतूहलबुद्धीचें समाधान झालें व मी आंत गेलों.

दुसरे दिवशीं मी माझे खोलींत कांहीं लिहीत बसलों होतों. इतक्यांत शेवंतीच्या खोलींतून हंसण्याखिदळण्याचा बराच मोठा आवाज मला ऐकूं येऊं लागला. लिहिणें आटोपल्यानंतर मी उठलों व खिडकीशीं गेलों, व तिच्या खोलीकडे दृष्टि फेकली. एका चटईवर बीरेश, सुरेश व ती बसली होती. खोलींतल्या निरनिराळया वस्तूकडे बोटें दाखवून व त्यांचीं नांवें घेऊन ती आपल्या नवीन मित्रांना कोंकणी भाषेचें वस्तुपाठपद्धतीनें ज्ञान करून देत होती! व तेही मधूनमधून पांच दहा मिनिटांत प्राप्त झालेल्या तुटपुंज्या ज्ञानाच्या जोरावर कोंकणीमधून अस्खलित वक्तृत्व करण्याचा प्रयत्न करीत व मग त्यांच्याकडून झालेले भलतेच अशुद्ध उच्चार व चुकीचे शब्दप्रयोग शेवंतीनें दाखवून दिले, कीं त्या तिघांच्याही थट्टाविनोदाला ऊत येई व भरपूर हंशा पिके!

बराच वेळ ती त्यांची मौज पाहिल्यावर मला तिच्याशीं बोलल्यावांचून राहवेना! मी विचारलें, "शेवंती, काय चाललं आहे?"

माझा आवाज ऐकतांच तिला आनंद झाला! धांवतधांवतच ती खिडकीशीं आली, व घाईघाईनें म्हणाली "काका, तुम्ही गांवाहून कधीं आलां? मी तुमची किती तरी दिवस एकसारखी वाट पाहतें आहें! हे आमच्या घरीं पाहुणे आले आहेत, तें तुम्हाला माहित आहे का? त्यांचा म्हणे 'बंघाल' गांव! तो फार दूर आहे! मडगांवच्याही पुढं! मुंबईहूनही दूर! त्यांना परवां बाबा घेऊन आले. यांचं नांव बीरेशमामा व त्यांचं

सुरेशमामा! हे दिलरुबा वाजवतात व ते गातात! ते मलाही शिकवणार आहेत गायला व वाजवायला! त्यांना आपली भाषा मात्र येत नाहीं! ते किनई आतां नेहमीं आमच्याकडेच राहाणार आहेत हो!"

नवीन मित्रलाभाची शुभवार्ता आपल्या एका जुन्या मित्रास कळवण्यास अत्यंत अधीर झालेल्या शेवंतीनें त्यांच्याविषयींचे हे सर्व ठळक मुद्दे एका दमांत मला सांगून टाकले! ती ते सांगत असतांना तिचे मित्र कौतुकपूर्ण दृष्टीनें तिच्याकडे पाहात होते!

तिचें बोलून झाल्यावर तिच्या आनंदाची कळी विशेष खुलविण्यासाठीं मी तिला त्यांच्यासंबधीं आणखी कांहीं प्रश्न विचारणार, तोंच आंतून आपल्या आईची हांक ऐकल्यामुळें ती आंत निघून गेली. माझीही देवपुजेची वेळ झाली होती. शेवंतीनें नुकताच परिचय करून दिला असल्यामुळें शिष्टाचारार्थ तिच्या मित्रांशीं एक दोन शब्द बोलून मी आंघोळीला निघून गेलों.

यानंतर दर दिवशीं ज्या ज्या वेळीं मी माझ्या खोलींत असे, त्या त्या वेळीं त्या दोघांचें गाणें बजावणें व शेवंतीबरोबर त्यांच्या चाललेल्या गप्पागोष्टी, हास्यविनोद माझ्या कानांवर येई. तेथें केव्हांही दिसून येणाऱ्या प्रफुल्लित वातावरणाचा यत्किंचितही भंग होऊं न देण्याची खबरदारी घेण्यासाठीं मी अलीकडे तिला माझ्या गप्पागोष्टींत गुंतविण्याचें सोडून दिलें होतें. इतकेंच नव्हे, तर मी माझ्या खोलींत आहें, हेंही तिला मी कळूं देत नसें. खोलीची खिडकी थोडीशी किलकिली करून त्यांतून तिचे आपल्या मित्रद्वयाबरोबर चाललेले मौजेचे प्रकार पाहात व ऐकत राहण्यांत तिच्या सहवासाहूनही मला अधिक आनंद वाटे!

असेच दहा बारा दिवस निघून गेले, व एक रविवार आला. दुपारीं मी माझ्या खोलींत कांहीं वाचीत पडलों होतों. थोड्या वेळानें फार

उष्मा होऊं लागला, व अंग घामानें भिजून गेलें. बाहेरून गार वाऱ्याची एखादी झुळूक तरी अंगावर यावी म्हणून मी खिडकीशीं गेलों; इतक्यांत मला शेवंतीची व तिच्या मित्रांची आठवण झाली. आज नेहमींप्रमाणें तिच्या हंसण्याची झुळझुळ व बोलण्याची किलबिल ऐकूं येत नसलेली पाहून मला विस्मय वाटला. मी जरा बाहेर वांकून तिच्या खोलींत नजर फेंकली, पण दररोजचा प्रकार मला तेथें दिसून येईना ! शेवंती तेथें होती. तिचा बीरेशमामा व सुरेशमामाही होता. पण बीरेश स्टोव्हवर कांहीं तापवीत होता, व सुरेश अंथरुणावर या कुशीवरून त्या कुशीवर तळमळत पडला होता. जवळच शेवंती मुकाट्यानें खिन्नवदन होऊन बसली होती ! सुरेशला ताप आला होता हें मी ताडलें. हवेंतील उष्णता एकाएकीं वाढल्यामुळें शहरांत तापाची सांथ सुरू झाली होती, हें मला माहित होतें.

थोड्या वेळानें सुरेशची दृष्टि सहज शेवंतीकडे गेली. तिच्या तोंडावर पसरलेल्या खिन्नतेचें कारण तो जाणतच होता. मुद्दाम बेफिकीरीचा व आनंदी वृत्तीचा आव आणून तो तिला म्हणाला " काय, शेवंती, तूं आज उगी कां ? बोल; कांहींतरी गोष्टी सांग ! "

सुरेशनें आणलेलें हें उसनें अवसान ध्यानांत येण्याइतकी शेवंती चाणाक्ष होती ! कांहींही न बोलतां ती नुसतें ' हूं ! ' म्हणाली. अंमळशानें तिनें त्याला कांहींतरी विचारण्याचें ठरवलेलें दिसलें ! ती किंचित् त्याच्याजवळ सरकली व म्हणाली, " सुरेशमामा, तुम्हांला फार दुखतं का ? मला माहित आहे ! ताप आला कीं डोकं व डोळे फार दुखतात व रडूंसुद्धां येतं ! मलाहि एकदां ताप आला होता ! मग आईनें आपल्या औषधाच्या पेटींतून कायसं उगाळून माझ्या कपाळाला लावलं. डोक्यावर एक पाण्याची घडी ठेवली. हात, पाय, व पाठ शेकली. गरम

गरम काढा तयार करून मला प्यायला दिला. मग माझा ताप गेला ! या सर्व गोष्टी बीरेशमामाला कुठं करायला येतात ? तुमचा ताप बरा करायला मी माझ्या आईला सांगू का ? पण ती येथें बाहेर येत नाहीं ! तुम्ही परके म्हणून तुम्हांला लाजते ! तुमची आई कुठं हो ?"

बालहृदयांतील अकृत्रिम प्रेम व सहानुभूति यांनीं भरलेले हे शब्द ऐकून मृदुलमनाच्या सुरेशचा कंठ दाटून आला ! काय उत्तर द्यावें, हें त्याला सुचेना ! त्यानें प्रेमानें शेवंतीचा हात आपल्या हातीं घेतला, व अंमळ विचार करून तो तिला म्हणाला, " बाळ, तुला एक आज आमचें गुपित सांगतों ! तें दुसऱ्या कोणालाही कळवतां कामा नये हो ! आमची एक आहे देवी ! माझी व बीरेशमामाची ! आम्ही जें नेहमीं ' वंदे मातरम् ' गाणें म्हणतों, तें तिचं गाणं ! तो एक मंत्र आहे ! तो भक्तिपूर्वक म्हटला कीं, आम्हांला कसलंही दुखणं झालेलं असलं किंवा दुःख होत असलं, तरी तें आम्ही विसरून जातों. अशी जादू त्या मंत्रांत भरलेली आहे ! म्हणूनच मला ताप आलेला असला तरी तुझ्याप्रमाणें माझे डोळे किंवा डोकं मुळींच दुखत नाहीं, किंवा मला रडूही येत नाहीं ! कसं येईल तो मंत्र म्हटल्यावर ? पहा, तो आतां मी पुनः म्हणतों ! "

**" वंदे मातरम् ......"**

सुरेशनें गीत गायाला सुरवात केली. शेवंतीच्या तोंडावरील खिन्नतेची छाया हळुहळू नाहींशी होत चालली. एकंदरींत सुरेशच्या या बतावणीचा त्यास हवा असलेला परिणाम शेवंतीच्या भाबड्या मनावर झाल्यशिवाय राहिला नाहीं ! पण त्या बतावणीच्या मागें एक सत्य व उदात्त तत्व लपलेलें आहे, अशी कल्पना माझ्यासुद्धां मनाला त्यावेळीं शिवली नाहीं. मग त्या अज्ञ बालिकेस तिची कशी जाणीव व्हावी !

थोड्या वेळानें सुरेशचें गाणें संपलें. बीरेशनें आणून दिलेलें कसलेंसे गरम पेय तो पिऊं लागला. मीही पुनः खुर्चीवर पडून पुस्तक वाचण्यांत गढून गेलों.

यानंतर पांचसहा दिवस निघून गेले. भाद्रपद संपून आश्विन महिना व नवरात्र नुकतेंच सुरु झालें होतें. नवरात्रांत फोंडें महालांतील कवळें येथें मोठा उत्सव होत असतो. तेथील श्रीशांतादूर्गा हें लखबाभाऊंचें कुलदैवत असल्यामुळें यंदा या उत्सवास कुटुंबांतील सर्व मंडळीसह जाऊन दोनतीन दिवस तेथें घालवण्याचें त्यांनीं ठरवलें होतें. लखबाभाऊंच्या आग्रहावरून मीही त्यांच्याबरोबर जाण्याचा बेत केला होता.

पंचमीच्या दिवशीं सकाळीं मला लखबाभाऊंनीं सूचना दिली कीं, त्या दिवशीं रात्रीं नऊ वाजतां होडींतून निघण्यास योग्य अशी भरतीची वेळ सुरू होईल, तरी त्यावेळीं मी इतर मंडळीबरोबर निघण्याची तयारी ठेवावी. रात्रीं ठरल्या वेळीं लखबाभाऊ, त्यांच्या घरची इतर मंडळी व मी किनाऱ्यावर जायला निघालों; पण जवळपास शेवंती कोठें दिसेना ! " पोर किती नादिष्ट आहे ! बसली असेल त्या पाहुण्याच्याच खोलींत ! " असे किंचित् रागानें शब्द उच्चारून लखबाभाऊंनीं तिला हांक मारली. त्या खोलींतून शेवंतीनें 'ओ' दिली, पण बराच वेळ ती बाहेर येईना ! तिच्या दिरंगाईमुळें चिडून शेवटीं लखबाभाऊ स्वतःच त्या खोलीकडे निघाले. मीही त्यांच्या मागोमाग गेलों. तेथें सुरेशच्या व बीरेशच्या हातांना विळखा घालून आपल्याबरोबर जत्रेला येण्याबद्दल परोपरीनें शेवंती त्यांना विनवीत असलेली आम्हांला दिसली ! तेही तिची समजूत पाडण्याची शिकस्त करीत होते.

"होडींत बसल्यावर लगेच आपल्याला घेरी येते ! " हें आपल्यावर ओढवलेल्या तसल्या पूर्वप्रसंगांचीं गंभीर मुद्रेनें उदाहरणें देत

बीरेश तिच्या मनावर ठसवीत होता ! " पणजींतील लखबाभाऊंचें घर सोडून दुसरीकडे कुठंही न जाण्याबद्दल बंगालहून कालच आलेल्या आपल्या आईच्या पत्रांत आपल्याला कशी सक्त ताकीद आहे " हें प्रत्यक्ष तिला तें पत्र वाचून दाखवून समजाऊन सांगण्याचे सुरेशचेही प्रयत्न चालले होते ! पण इतकीं सबळ कारणें त्यांनीं दाखवलीं असतांही ती आपला आग्रह सोडीना ! अखेरीस ती रडकुंडीस आलेली पाहतांच माझें मन द्रवलें व तिचा तो हट्ट पुरवण्याबद्दल मी त्यांस तिच्या वतीनें विनंति केली. लखबाभाऊंही त्यांस म्हणाले, " दोनच दिवसांचा प्रश्न आहे, चलाना ! तिचंही समाधान होईल, तुम्हांलाही तिकडचा रम्य प्रदेश पाहायला मिळेल ! देवस्थान तर फार प्रेक्षणीय आहे ! "

शेवंतीच्या मनस्वी हट्टामुळें त्यांचा निश्चय थोडाबहुत डळमळला होताच; त्यांत आमच्या आग्रहाची भर पडतांच शेवटीं त्यांनीं आमच्या बरोबर येण्याचें ठरवलें. झट्दिशीं त्यांनी आपल्या कपड्यांचें एक लहानसें गांठोडें बांधलें. बीरेशनें आपला दिलरुबाही बरोबर घेतला व अशा रीतीनें शेवटीं ते बंगाली पाहुणेही आमच्याबरोबर कवळयाला जायाला निघाले.

थोड्या वेळानें आम्ही नदीकिनाऱ्यावर जाऊन पोहोंचलों व होडींत बसलों. होडी चालू होतांच लखबाभाऊ व त्यांच्या घरची इतर मंडळी होडीच्या सुकाणूच्या बाजूला असलेल्या शाकारावर बिछाने पसरून आडवी झाली. दुसऱ्या बाजूच्या उघड्या जागीं बीरेश व सुरेश बसले. शेवंतीही अर्थात् तेथें जाऊन त्यांनाच बिलगली. मलाही तिनें एक कसलीशी 'गंमत' दाखवण्यासाठीं आग्रहपूर्वक बोलावून नेऊन आपल्या शेजारींच बसवून घेतलें.

नावाड्यांच्या अनेक वल्ह्यांचा एकाच वेळीं नदीच्या लाटांशीं होणारा तालबद्ध संयोग, पंचमीच्या मंद चांदण्यामध्यें न्हात असलेल्या

आमच्या होडीला संथ गतीनें पुढें पुढें नेत होता ! नदीतीरावरील कांदळीच्या झाडांवर एकस्वरानें विश्रांतिगीत गात बसलेल्या, शेंकडों भोंवारींचा एखादा दुसरा शुभ्रवर्णाचा कळप वल्ह्यांचा आवाज ऐकतांच जणूं काय माळेंत गुंफल्याप्रमाणें एका ओळीनें उडून जाई व नीलनभाच्या पार्श्वभूमिकेमुळें विशेषच खुलून दिसणारा दुग्धस्त्रोताचा मोहक आभास मधून मधून निर्माण करी ! परस्परांच्या गळयांमध्यें गळे घालून व वाऱ्याच्या हिंदोल्यावर बसून एकत्र झोंके घेणाऱ्या नारळींच्या मुखांचीं व मुक्तकेशांचीं प्रतिबिंबें नदीमध्यें समगतीनें मागेंपुढें हलत होतीं ! एकतानतेचीं अशा प्रकारचीं दिसून येणारीं हीं सुंदर दृश्यें जणूं काय त्यावेळीं सृष्टीवर सर्वत्र पसरलेल्या त्या नितांत शांततेच्या मोहिनीजालाचाच परिणाम होता !

अशा या वेळीं व स्थळीं बीरेश व सुरेश यांच्या सौंदर्यसमीक्षक हृदयांचें भोंवतालच्या वातवरणाशीं तादात्म्य व्हावें, यांत नवल तें काय ? निसर्गाचीं निरनिराळीं चारुचित्रें अतृप्त नेत्रांनीं पहात, ते निश्चल व निःशब्द बसले होते ! मी व शेवंतीही अर्थात् स्तब्धच होतों. मधून मधून शेवंती त्यांना एखादा दुसरा प्रश्न विचारी, पण ‘ हूं, हूं ’ करण्यापलीकडे त्यांच्याकडून उत्तर येत नव्हतें !

अशा रीतीनें आमचा तास दीड तास स्तब्धतेंत गेल्यावर, बीरेशचीं बोटें आपोआप दिलरुब्याच्या तारांवर फिरूं लागलीं, व त्यांतून निघणारे नादसौंदर्याचे निरनिराळे मोहक नमुने भोंवतालच्या प्रशांत वातावरणावर पसरूं लागले ! सुरेश तल्लीनतेनें डोलूं लागला ! शेवंतीचा हर्ष तिच्या मनांत मावेना ! मीही एकचित्तानें श्रवण करूं लागलों ! शेजारच्या नावाड्यांचाही एवढावेळ आपसांत चाललेला कोलाहल आतां बंद पडला ! कांहीं वेळानें सुरेशही स्वयंस्फूर्तीनें गाऊं लागला ! श्रीचैत-

न्याची पदें आळवण्यास त्यानें सुरुवात केली. व त्यांना बीरेशच्या दिलरुब्याची आतां साथ मिळूं लागली. श्रीचैतन्याच्या पदांमागून तुळसीदास व कबीर यांचे दोहे सुरू झाले. सतत दीडदोन तास त्यांचें अशा रीतीनें गायनवादन चाललें होतें. त्यांतील माधुर्यानें आम्हां सर्वांचीं मनें इतकीं भारून टाकलीं होतीं, कीं ती सबंध रात्र तशाच अतृप्त मनानें तें आम्हीं ऐकत राहिलों असतों. पण अखेरीस सुरेशच्या कंठाला व बीरेशच्या बोटांना विश्रांतीची आवश्यकता भासूं लागली. " रामनाम तूं भजले प्यारे० " हें कबीराचें शेवटचें भक्तिगीत म्हणून होतांच सुरेशनें आपले ओंठ मिटून घेतले, ते पुनः हलेनात ! बीरेशनेंही आपला दिलरुबा हलकेच खालीं ठेवला ! गायनवादन पुढें चालविण्याचा त्यांचा आतां विचार नाहीं, हें आम्हां सर्वांना समजलें. पण एकदोन मिनिटें थांबून शेवटीं किंचित् लडिवाळपणें पण निराशेनें शेवती बीरेशला म्हणाली " बीरेशमामा, आज ' देवीचं गीत ' नाहीं का म्हणायचं ? " देवीचें गीत तिच्या अत्यंत आवडीचें होतें, हें त्या दोघांनाही माहित होतें. प्रेमानें तिला जवळ ओढून कौतुकयुक्त व विनोदी स्वरानें सुरेशनें उत्तर दिलें, " छे ! छे ! न म्हणतां कसं चालेल ? " व पुनः गायाला सुरवात केली ! "वंदेऽऽमाऽतरम्—" बीरेशही अर्थात् पुनः आपला दिलरुबा उचलून त्याला साथ करूं लागला.

सुरेशनें त्या गीताचे घोळघोळून एकदोन चरण म्हटले होते व त्यांशीं आमच्या वृत्तींचें तादात्म्य व्हायाला नुकतीच सुरवात झाली होती, इतक्यांत आमच्या मागें बसलेल्या एका नावाड्यानें आपल्या एका सोबत्यास उद्देशून मोठ्यानें ओरडून उच्चारलेले शब्द आमच्या कानांवर आदळले, "भिकू ऽऽ ? एऽऽ भिकूऽ ! बघ ना रे हें इप्रित !"

हे शब्द एवढया कर्कश आवाजानें व विचित्र हेल काढून तो बोलला होता, व ते ऐकतांच आपापलीं वल्हीं थांबवून इतर नावाड्यांनीं असा कांहीं गलबलाट सुरू केला, कीं सुरेशला आपलें गाणें तितक्यावरच थांबवावें लागलें. आमच्या होडीनें बऱ्याच वेळापूर्वी मागें टाकलेल्या नदीच्या वळणाच्या दिशेकडे पाहात, त्या सर्वांनीं मोठमोठ्यानें कसली तरी वाटाघाट चालवली होती ! ती ऐकून होडीच्या शाकाराखालीं पहुडलेले लखबाभाऊ बाहेर आले. आम्हीही मागें वळून त्या दिशेकडे पाहूं लागलों. त्या बाजूला अचानक दूर दिसूं लागलेला एक उज्वल दिव्यांचा प्रकाश हाच त्यांच्या चर्चेचा व कुतूहलाचा विषय होता ! तो प्रकाश कसला असावा याविषयीं सर्वांचे निरनिराळे तर्क सुरू झाले, पण त्यांचा एकमेळ होईना ! शेवटीं एक बराच मोठा आवाज अधिकाधिक स्पष्ट रीतीनें ऐकूं येऊं लागून सर्वांचा संशय नाहीसा झाला. वेगानें पाणी तोडीत येणाऱ्या वाफोराचाच तो आवाज होता याबद्दल प्रत्येकाची खात्री पटली ! थोड्या वेळानें त्यावरील दिव्याचा प्रकाश अधिकाधिक जवळ येऊं लागून वाफोराची आकृति स्पष्ट रीतीनें दिसूं लागली ! पण या भलत्याच वेळीं या दिशेला वाफोर कसा दिसावा, हें आम्हां सर्वांस मोठें कोडें पडलें ! वाफोराच्या सकाळ संध्याकाळच्या दोन फेऱ्या व दिशा ठरलेल्या होत्या ! त्या लक्षांत घेतां हा एक अपूर्व चमत्कारच होता ! पांच दहा मिनिटांच्या आंत वाफोर अगदीं जवळ येऊन पोंहोचला. त्याची वाट मोकळी करण्यासाठीं सुकाणूवाला होडी नदीच्या मध्यावरून डाव्या बाजूकडे फिरवूं लागला. इतक्यांत तसें न करण्याबद्दल व असलेल्या ठिकाणींच होडी थांबविण्याबद्दल कोणी दरडावणीच्या स्वरांत ओरडून सांगत असल्याचें आम्हांस ऐकूं आलें. नावाड्यांनीं अर्थात् लगेच आपलीं वल्हीं वर घेतलीं. आम्ही सर्वजण या प्रकारानें गोंधळून गेलों ! वाफोर जवळ येऊन आमच्या होडीला भिडला व त्यांतून आठ दहा माणसें

आमच्या होडींत उतरलीं. त्यांपैकीं हातांत कंदील घेतलेला एक इसम होडींतल्या प्रत्येकजणाचा चेहरा कंदीलाच्या उजेडांत निरखून पाहूं लागला ! त्या इसमाची मला लगेच ओळख पटली ! दोन तीन आठ-वड्यांपूर्वीं पणजीस येऊन नवीनच आपलें ऑफिस उघडणारे मुंबई-कडच्या कुठल्याशा एका स्वदेशी विमाकंपनीचे हे एजंट टी. सुब्बाराव ! आपल्या धंद्यापरत्वें आमच्या शहरांतील बऱ्याच लोकांशीं इतक्या अल्पावधींत त्यांनीं परिचय करून घेतला होता. कंपनीचे प्रोस्पेक्टस् घेऊन एकदोनदां ते आमच्या व लखबाभाऊंच्याही घरीं आले होते ! एका आठवड्यापूर्वींच श्रीमहालक्ष्मीच्या देवळांत त्यांनीं ' स्वदेशी 'वर एक जोरदार व्याख्यानही दिलें होतें ! त्यांना पाहातांच मला जरा समाधान वाटलें, व अधीरपणें पुढें होऊन " हें काय प्रकरण आहे ? ' असा त्यांना मी प्रश्न करणार, तोंच त्यांनीं बीरेश व सुरेश यांच्या चेहऱ्यांवर आपल्या कंदिलाचा उजेड पाडला व ते तत्क्षणीं मोठ्यानें ओरडले, " हेच ते बदमाष ! ठोका यांच्या हातांत कड्या ! " त्यांचे हे शब्द ऐकतांच त्यांच्या बरोबरच्या तिघांचौघां कॉन्स्टेबलांनीं बीरेश व सुरेश यांना बसलेल्या जागेवरून आडदांडपणें ओढून त्यांच्या हातांत कड्या घातल्या ! यानंतर त्यांच्याबरोबर आलेला पोर्तुगीझ पोलीस खात्यांतील एक युरेजियन सार्जंट व तिघे चौघे सशस्त्र शिपाई पुढें आले व त्यांनीं त्या दोघांही कैद्यांस आपल्या ताब्यांत घेतलें !

बीरेश व सुरेश यांजवर इतक्या आकस्मिकपणें हा घोर प्रसंग येऊन ठेपला होता ! पण त्यास तोंड देण्यास ते तयारच असलेले दिसले ! दुःख व निराशा यांची एक दाट छटा त्यांच्या चेहऱ्यांवर यावेळीं उम-टली, पण त्यांच्या चित्ताची निर्भयता व शांतता लेशमात्र ढळलेली दिसली नाहीं ! या सर्व अकल्पित प्रकारानें आम्हां इतर मंडळीची मात्र त्रेधा उडाली ! बीरेश व सुरेश यांजवर असा प्रसंग ओढवेल अशी

आम्हांस कल्पनाही नव्हती. सुब्बारावांनीं उच्चारलेले शब्द ऐकून व त्यानंतर घडलेला सर्व प्रकार पाहून लखबाभाऊंचा संताप अनावर झाला! ते वस्कन् त्यांच्या आंगावर ओरडून म्हणाले, " असल्या सज्जन माणसांवर कांहीं तरी बालंट घ्यायला शरम नाहीं वाटत तुम्हांला ' मिष्टर ' सुब्बाराव ? तुमच्या विमाकंपनीचं त्यांनीं असं काय घोडं मारलं आहे, तें तरी आम्हांला कळूं द्या!"

" हें पहा, असे संतापूं नका! विमाकंपनीचा या गोष्टीशीं व माझा त्या कंपनीशीं कांहींही संबंध नाहीं! या इसमानीं कोणाचं व काय घोडं मारलं आहे, हें तुम्हाला लवकरच कळेल! तोंपर्यंत हें पाहून घ्या!" मिस्किलपणें हंसत हंसत शांतपणें सुब्बारावांनीं हे शब्द उच्चारले, व आपल्या खिशांतून एक कार्ड काढून तें कंदिलाच्या प्रकाशांत आमच्या डोळ्यांपुढें धरलें. त्यावर त्यांचें खरें नांव व ब्रिटिश सी. आय. डी. खात्यांतील इन्स्पेक्टरचा हुद्दा लिहिलेला होता! यावेळीं जवळच उभा असलेला पोर्तुगीज सार्जंटही म्हणाला " शहाणे असाल, तर असल्या बॉंब तयार करणाऱ्या राजद्रोही माणसांची कड घेऊन भांडूं नका!"

डिटेक्टिव्ह, राजद्रोही, बॉंब या शब्दांमागें कोणता भीतिजनक इतिहास भरला आहे, हें जाणण्याइतका, त्यावेळचीं वर्तमानपत्रें वाचण्याचा नाद लखबाभाऊंना व मला होता! अर्थात् सुब्बारावांचे व सार्जंटचे वरील शब्द ऐकतांच लखबाभाऊंचा एकंदर आवेश पार नाहींसा झाला! बंगाली पाहुण्यांच्या वतीनें सुब्बारावांशीं रदबदली करावी, असा मी बेत करीत होतों, तोही माझ्या मनांतल्या मनांत जिरला! यांनंतर एक अवाक्षरही आम्ही उच्चारलें नाहीं!

गेल्या महिन्या दीड महिन्यांत आपल्या सुस्वभावानें व गोड वागणुकीनें त्या बंगाली तरुणांनीं आमचीं मनें इतकीं आपलींशीं करून

घेतलीं होतीं, कीं त्यांच्यासंबंधीं बनलेलें आमचें चांगलें मत, नुकत्याच घडलेल्या या गोष्टीनें बदलणें शक्य नव्हतें. उलट त्यांजवर ओढव-लेल्या या दुर्धर प्रसंगामुळें त्यांजविषयीं वाटूं लागलेली निरतिशय अनुकंपा व त्यांतून निभावून जाण्याच्या बाबतींत त्यांस कोणतेंही सहाय्य करण्यास समर्थ नसल्याबद्दल वाटणारें दुःख, यांनीं आमचीं हृदयें, त्यावेळीं भरून आलीं !

थोड्या वेळानें होडी सोडून वाफोरावर चढण्याचा हुकूम त्यांस देण्यांत आला. त्याप्रमाणें होडींतून निघण्यापूर्वी बीरेश व सुरेश यांनीं एकदां स्नेहपूर्ण दृष्टीनें आमच्याकडे पाहिलें, व सद्गद स्वरानें 'नमस्ते' हा शब्द उच्चारून आमचा निरोप घेतला ! नंतर ते शेवंतीकडे वळले ! त्या चिमुकल्या जिवाचा ते आतां कोणत्या शब्दांनीं निरोप घेणार होते ?

"शेवंती—" त्यांनीं तिला हांक मारली ! त्याहून अधिक शब्द त्यांच्या तोंडून बाहेर पडेनात ! पण आर्त स्वरानें उच्चारलेल्या त्या एकाच शब्दांत त्यांच्या हृदयांतील त्यावेळच्या सर्व भावनांचें पूर्ण आविष्करण झालें होतें ! भीतीनें पांढरा फटफटीत झालेल्या व अश्रूंनीं डबडबलेल्या तिच्या चेहऱ्यावर कांहीं क्षण त्यांनीं आपली नजर स्थिरा-वली ! पण दर क्षणाला तिच्या अश्रूंचा ओघ वाढत चाललेला पाहतांच मोठ्या कष्टानें त्यांनीं आपलें मन आवरलें, व तेथून निघण्यासाठीं आपले पाय उचलले ! तें पहातांच सशस्त्र शिपायांच्या व काळे डग-लेवाल्या कान्स्टेबलांच्या दर्शनानें एवढा वेळ शेवंतीच्या मनावर आलेलें भीतीचें दडपण, दुःखाच्या शेवटच्या उसळीसरशीं पार नाहींसें झालें, व जाण्यासाठीं निघालेल्या बीरेशाला घट्ट मिठी मारून स्फुंदत स्फुंदत करुणस्वरानें तिनें टाहो फोडला, "बीरेशमामा, हे

लोक तुम्हांला पकडून कुठंहो नेताहेत? ते तुम्हांला मारूं लागतील, मग तुम्हांला कोण सोडवील? त्यांच्या हातांत तलवारी लावलेल्या बंदुका आहेत, पहाना!!"

शेवंतीच्या या साध्यासुध्या शब्दांत तिच्या हृदयाला होणाऱ्या वेदना प्रतीत झालेल्या कोणाला दिसून आल्या नसत्या? अर्थात् अशा स्थितींत कोणत्याही प्रकारें तिच्या मनाचें थोडेंबहुत सांत्वन केल्यावांचून तेथून जाणें त्या दोघांच्याही जिवावर आलें! ते पुनः मागे वळले! सुरेश आपल्या चेहऱ्यावर उसनें अवसान व बेफिकिरीचा आव आणून तिच्याजवळ गेला व खालीं वांकून तिच्या कानाशीं हलक्या आवाजानें बोलूं लागला, "वेडे, आमच्या देवीचं गुपित तुला माहित असतांना तूं असं भिऊन रडावंस ना? अग त्या देवीचं एवढं सामर्थ्य आहे कीं, ती मनांत आणील तर यांच्या या बंदुका आपोआप फुटून जातील व तलवारीचे तुकडे तुकडे होतील! तसेच आमच्या हातांतील या लोखंडी कड्या तडातड तोडून टाकण्याइतकं ती आम्हांला बळ देईल! इतकंच नव्हे तर ती या शिपुरड्यानांच आमच्या पायांवर लोळण घ्यायला लावील! हो खरंच, मघांशीं गातांना तो आमचा मंत्र अपुराच राहिला. त्यांतलें तें कडवें मी आतां पुरें करतों!" असें म्हणून तशाच हलक्या पण नेहमीच्याच माधुर्ययुक्त आवाजानें त्यानें तें गीत गुणगुणण्यास सुरवात केली!—

"वंदेऽऽमाऽतरम्!
बहुबलधाऽरिणीं नमामि तारिणीम्
रिपुदल वाऽरिणीं माऽतरम्!
वंदेऽऽ०" ॥

पण त्यांचे हें गायन कितीही हलक्या आवाजांत होत असलें, तरी त्यांतील आलाप इतर सर्व मंडळीच्या कानीं गेल्याशिवाय राहिले नाहींत ! लखबाभाऊंना व मला असल्या या बिकट प्रसंगींही त्याचें हें मनःसंयमन पाहून अत्यंत आश्चर्य वाटलें ! पण इनस्पेक्टर, कॉन्स्टेबल व सार्जंट यांस ही गोष्ट इतकी विचित्र वाटली, कीं त्यांनीं त्याची वेड्यांतच गणना केली असावी !

प्राप्त झालेल्या संकटासंबंधीं त्यांच्याकडून अशा रीतीनें व्यक्त झालेली बेपर्वाई म्हणजे आपल्यासारख्या सरकारी अधिकाऱ्यांचा एक मोठाच उपमर्द अशी समजूत करून घेऊन एका कॉन्स्टेबलनें शेवटीं सुरेशला रागानें गचांडी दिली व ताबडतोब होडी सोडण्यास फर्माविलें ! सुरेशचेंही तें सबंध कडवें तोपर्यंत म्हणून संपलेंच होतें. शेवंतीचें सांत्वन करण्याच्या या आपल्या प्रयत्नांचा थोडातरी उपयोग झाल्याचें तिच्या चेहऱ्यावरून दिसून येतांच, तेवढ्यांत समाधान मानून ते दोघेही होडी सोडून वाफोरवर चढले.

त्या बंगाली तरुणांवर आलेली ती आपत्तीच अशा विशिष्ट स्वरूपाची होती, कीं त्यांत त्यांस सहाय्य करण्याचा कोणताही मार्ग लखबाभाऊंना व मला दिसणें शक्य नव्हतें ! तरीपण त्या दिशेनें प्रयत्न करण्याची एखादी सुदैवानें संधी आल्यास तिचा फायदा घेतां यावा या हेतूनें लखबाभाऊबरोबर देवस्थानला न जातां, तेथूनच शहराकडे परत फिरण्याचें ठरवून वाफोरांत चढण्याची मोठ्या मिनतवारीनें सार्जंटकडून मी परवानगी मिळवली.

थोड्या वेळानें वाफोर व होडी परस्परविरुद्ध दिशांना जाऊं लागलीं. होडी मागें टाकून वाफोर परत फिरल्यावेळीं पुनः सुरू झालेल्या शेवंतीच्या हुंदक्यांचा आवाज, होडीवरून आमच्या कानांवर आल्याशिवाय राहिला नाहीं !

वाफोरवर आम्हां तिघांनाही एकमेकांशीं बोलण्याचा पूर्ण मज्जाव करण्यांत आला होता व तीन निरनिराळ्या टोंकांस बसून राहण्यास फर्मावलें होतें. बिचारे बीरेश व सुरेश आकाशांतील ताऱ्यांकडे, खालीं खळखळणाऱ्या लाटांकडे किंवा नदीपलीकडील झाडीकडे शून्य दृष्टीनें पाहात होते ! इन्स्पेक्टर, कॉंस्टेबल, सार्जट व शिपाई मधून मधून विड्या ओढीत पत्ते खेळण्यांत गढून गेले होते ! व मी हीं दोन परस्परविरोधी दृश्यें खिन्न चित्तानें पाहात "पुढें काय होईल ?" या विचारामुळें मनांत उत्पन्न झालेल्या तर्ककुतर्काचें जाळें सोडवीत एका बांकावर पहुडलों होतों.

जवळ जवळ तीनचार तास अशा स्थितींत गेल्यावर सूर्योदय होण्याच्या सुमारास वाफोर पणजीला जाऊन पोहोंचला. कॉन्स्टेबलनीं आपल्या कैद्यांच्या हातकड्यांची पुनः एकदां नीट तपासणी केली. त्यांच्या हातांस काढण्या लावल्या व शिपायांच्या पहाऱ्यामध्यें त्यांस बंदरावर उतरवून पोलीस चौकीकडे चालवलें. मीही जड पावलांनीं घराकडे वळलों.

तो सबंध दिवस मी न्यायखात्यांतील व पोलीसखात्यांतील निरनिराळ्या ओळखीच्या अधिकाऱ्यांस भेटून, त्या दोघां तरुणांवर आलेला तो कठिण प्रसंग त्यांस निवेदन केला व त्यांच्या साहाय्याची याचना केली, पण त्या सर्वांनीं कानांवर हात ठेवले ! ब्रिटिशसरकार व पोर्तुगीज सरकार यांच्यामधील आंतरराष्ट्रीय नात्यासंबंधींचीं कांहीं गुप्त वर्मे त्यांपैकीं कित्येकांनीं माझ्याकडे उघड केलीं. तीं कळतांच त्या दुर्दैवी तरुणांचें यापुढें कोणत्याही रीतीनें संरक्षण होणें शक्य नाहीं, अशी माझी खात्री झाली व आत्यंतिक निराशेनें माझें मन व्यथित झालें !

दोघां 'बंगाली बंडवाल्यांस' 'इंग्लेझ' सरकारच्या डिटेक्टिव्हांनीं पकडल्याची वार्ता शहरांत जिकडे तिकडे पसरण्यास वेळ लागला

नाहीं. त्यासंबंधीं लोकांमध्यें निरनिराळ्या अफवा उठूं लागल्या! ‘डिटेक्टिव्ह आल्याची कुणकुण लागतांच बंडवाल्यांना रातोरात होडींतून पळून जाण्यास मदत केल्यावरून लखबाभाऊंना व त्यांच्या शेजाऱ्यांना लवकरच पकडण्यांत येणार आहे!’ ‘पोलिसांना लखबाभाऊच्या परसांत लपवून ठेविलेले बंगाल्यांचे बॉंब सांपडले आहेत!’ अशा मासल्याच्या त्या असत! त्यांपैकीं क्वचित् एखादे दुसरे बातमीस सत्याचाही आधार असे. ब्रिटिश सरकारकडून पुढील हुकूम येईपर्यंत दोघांही कैद्यांस कांहीं दिवस पणजीसच पोर्तुगीज तुरुंगांत ठेवण्यांत येणार आहे, ही अशाच खऱ्या ठरलेल्या बातम्यांपैकीं एक होती.

चार दिवसांनीं लखबाभाऊ कुटुंबांतल्या सर्व मंडळीसह कवळ्याहून परत घरीं आले. घरीं येतांच पहिल्याप्रथम माझ्याकडे येऊन बंगाली पाहुण्यांसंबंधीं त्यांनीं चौकशी केली. पण एकंदर निराशाकारक वृत्त ऐकतांच ते कळवळून म्हणाले, “किती उमद्या व गोड स्वभावाचे बुद्धिमान् तरुण! अशा बिकट परिस्थितींत आतां त्यांचें ईश्वरच रक्षण करो! तुम्ही निदान आतां एवढें तरी करा! या शेवंतीनें गेल्या चार दिवसांत त्यांच्यासंबंधीं पुनः पुनः प्रश्न विचारून व रडरडून आम्हां सर्वांना भडावून सोडलें आहे! त्यांचा तिला इतका ध्यास लागला आहे, कीं ती नीट जेवत खात सुद्धां नाहीं! इथ आल्यापासून ते असलेल्या ठिकाणीं घेऊन जाण्याबद्दल एकसारखी हट्ट घेऊन बसली आहे! कसंही करून तिला एकदां त्यांना भेटवून आणा! पोलिसचौकीवरील तो परेरा सार्जेंत भला माणूस आहे. त्याला समजावून सांगितलं तर तो नेईल इला थोडा वेळ त्यांच्याजवळ आंत! निदान दुरून त्यांना पाहायला तरी देईल!”

वीरेश व सुरेश यांची तुरुंगांत भेट घेणें केवढी कठिण गोष्ट आहे, याचा मला अनुभव आला होता. त्या हेतूनें मी गेल्या चार दिवसांत तुरुंगाकडे घातलेल्या अनेक खेपा फुकट गेल्या होत्या ! पण दैवगतीनें आजतरी त्यांना भेटण्याची संधी कदाचित् मिळाली तर पाहावी, असा विचार करून शेवंतीला घेऊन मी चौकीकडे निघालों.

कैद्यांच्या कोठडीबाहेर पाहाऱ्यावर असलेल्या पोर्तुगीज शिपायांच्या जोडीला नेहमींप्रमाणें आज ब्रिटिश कॉन्स्टेबल बसलेले मला दिसले नाहींत. अर्थात् मनांत किंचित् आशा उत्पन्न होऊन कैद्यांना भेटूं देण्याबद्दल सार्जटजवळ मी प्रश्न काढला व शेवंतीचीही हकिकत सांगितली. ती ऐकून त्याचें मन द्रवल्यावांचून राहिलें नाहीं. तो म्हणाला, "हें पाहा, आज त्यांची भेट होणें अगदींच अशक्य ! आज ते ब्रिटिश अधिकारी त्यांची जबानी घेण्यांत गुंतले आहेत. व त्यासाठीं त्यांना ते गेले दोनतीन तास त्या पलीकडल्या खोल्यांकडे घेऊन गेले आहेत. त्या इथून इतक्या दूर आहेत, कीं तेथें एखादा इसम मोठ्यानें ओरडला, तरी सुद्धां इथं ऐकूं यायचं नाहीं !"

तो इतकं बोलतो आहे, तोंच पलीकडच्या कोठडीचें दुसऱ्या बाजूचें दार उघडल्याचा आवाज आम्हांला बाहेर ऐकूं आला. तेव्हां तो म्हणाला, "बहुतेक त्यांना पुनः ते या कोठडींत घेऊन आले असावेत !" नंतर या गोष्टीची खात्री करून घेण्यासाठीं तो आंत गेला, व अंमळशानें घाईघाईनें बाहेर येऊन तो मला म्हणाला, "एकंदरींत तुमची इच्छा पुरी होण्याचें आज तुमच्या नशिबीं आहे ! त्या दोघांपैकीं एकाला त्यांनीं नुकतेंच पुनः या कोठडींत आणून ठेवलें आहे. त्याची जबानी घेऊन झाल्याचें दिसतें. आतां दुसऱ्याची जबानी घेण्यांत ते दूर गुंतले आहेत, तोंवर हवेंतर मुलीला ते दाखवून

आणा. कोठडीबाहेर तीसचाळीस कदमांच्या अंतरावर असलेल्या त्या भिंतीपलीकडे जाऊं नका ! कोठडीच्या गज लावलेल्या खिडकीमधून कितीही दुरून ते तुम्हाला दिसतील. लक्षांत ठेवा जवळ जायचं नाहीं व त्यांच्याशीं बोलायचं नाहीं ! हो, नाहींतर त्या बेट्यांनीं पाहिलें व वरिष्ठांकडे माझ्याविरुद्ध रिपोर्ट केला, कीं माझी जन्माची पेज जायची ! धर्म करतां कर्म उभं राहील !"

सार्जटचे हे शब्द ऐकतांच, तत्काळ शेवंतीस घेऊन मी आंत गेलों. व त्याच्याशीं कबूल केल्याप्रमाणें कोठडीबाहेर दूर अंतरावर उभा राहिलों. आमच्याकडे दृष्टी जातांच सुरेशनें नमस्कार केला, व खिडकीशीं येऊन गजांना टेकून तो उभा राहिला. शेवंतीला पाहून आपल्या चेहऱ्यावर नेहमींचें स्मित आणण्याचा त्यानें प्रयत्न केला, पण तो साधला नाहीं ! त्याच्या चेहऱ्यावर त्यावेळीं प्रेतकळा आली होती, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं ! त्याचें पांढरें फटफटीत म्लान वदन, त्यावर दिसून येणारी ग्लानी, व अमर्याद अश्रुप्रवाहामुळें सुजलेले त्याचे डोळे हीं पाहतांच माझ्या हृदयांत चर्र झालें ! पण त्या गोष्टीचें कारण माझ्या लक्षांत येण्यास फार वेळ लागला नाहीं. त्याच्या चेहऱ्यावरून खालीं त्याच्या हातांकडे सहज नजर गेली, तों मला काय दिसलें ? दोन्ही हातांचीं बोटें सुजून दुप्पट तिप्पट मोठीं झालीं होतीं ! त्यांवर ठिकठिकाणीं रक्ताचे ठिपके दिसत होते ! व अशा स्थितींत त्याच्या हातांना कड्याही होत्याच. त्याच्या शर्टचा व धोतराचा कांहीं भाग रक्तानें भिजून लाल झाला होता ! हातांच्या बोटांचे सांधे जोरानें आंवळून वेदना देण्याच्या एका उपकरणाचा त्याची जबानी घेण्याचे वेळीं भरपूर उपयोग केला गेल्यामुळें, हा सर्व प्रकार घडून आला होता, हें मला नंतर कांहीं दिवसांनीं कळून आलें !

तें भेसूर दृश्य अधिक वेळ माझ्यानें पहावेना! विशेषतः शेवंतीचा प्रश्न मनांत येतांच तत्क्षणीं तिला घेऊन मी बाहेर निघालों, तोंच तिनें माझ्या हातांतून आपला हात सोडवून घेतला, व सुरेशच्या खिडकीकडे धांव घेतली! मागें फिरण्याबद्दल धाक घालून मी तिला हांका मारूं लागलों, पण त्यांचा कांहींही उपयोग होईना! खिडकीशीं जाऊन गजांमधून हात घालून सुरेशचा तिनें शर्ट पकडला व त्याच्या तोंडाकडे आपली करुणदृष्टी खिळवून ओक्साबोक्शीं रडण्यास सुरवात केली! सुरेशलाही आपलें मन यावेळीं आवरलें नाहीं! त्याच्या डोळ्यांत चटकन् अश्रु उभे राहिले! मोठ्या कष्टानें त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडूं लागले! "बाळ, शेवंती! आमचे हे दुर्भोग पाहायला, तूं आणखी इथं कां आलीस? जा, ते पहा विसुकाका बोलवताहेत! त्यांजबरोबर घरीं जा! पोलीस इथं आले तर तुझ्यावर रागावतील! जा!" पण त्याच्या या शब्दांनीं तिच्या दुःखाचा उमाळा अधिकच वाढला! आपल्या चिमुकल्या हातांनीं त्याच्या कमरेला विळखा घालून अस्पष्ट, तुटक, व व्याकूळ स्वरानें ती म्हणाली, "सुरेशमामा! तुम्ही घरीं कधीं यालहो? तुम्हांला हे पोलीस कधीं सोडतील? हीं पहा, तुमचीं बोटं केवढीं सुजलीं आहेत! व किती रक्त आलं आहे! हें असं कोणीं केलं? आतां हीं बोटं बरीं कोण करील? तुम्हांला किती दुखत असेल! या हो, घरीं या!"

सुरेशला यानंतर नेहमींप्रमाणें आत्मसंयमन करण्यांत यश आलें. आपल्या चेहऱ्यावर त्यानें पूर्ण निर्विकारी छाया पसरवली व गंभीर स्वरानें तिला तो म्हणाला, "मला व बीरेशमामाला हे शिपाई येथून उद्यां बंगालला घेऊन जातील व तेथें सोडून देतील! तेथून मग तुला व विसुकाकांना आम्ही पत्रं पाठवूं व नंतर थोड्या दिवसांनीं तुला भेटण्याकरितां पुनः इथं येऊं! चल,—तूं आतां घरीं जा! हीं

पाहा माझीं बोटें आतां किंचित् दुखूं लागलीं ! एवढा वेळ मी आमच्या ' देवीचा मंत्र ' मनांतल्या मनांत म्हणत होतों, त्यामुळें हें इतकं रक्त आलं असूनही, मला मुळींच दुखत नव्हतं ! पहा, आतां मी तो पुनः म्हणायला सुरवात करतांच, ही थोडीशी येत असलेली कळही पार नाहींशी होईल !—

" वंदेऽऽमातरम् !
सुखदांऽवरदांऽमातऽरम् !
तुमि विद्या, तुमि धर्म
तुमि हृदि तुमि मर्म
त्वंहि प्राणा शरीरे
बाहुते तुमि मा शक्ति
हृदय तुमि मा भक्ति
वंदेऽऽ० ॥"

सुरेशाचे इतके हे चरण गाऊन झाले, तोंच शेवंतीला दुरून अनेक हांका मारून निष्फळ झाल्यामुळें, लगबगीनें मी कोठडीशीं गेलों व त्याच्या कंबरेभोंवतीं विळखलेले तिचे हात सोडवून घेऊन जवळ जवळ ओढीतच तिला मी बाहेर घेऊन आलों ! खिडकीपासून तिला मी दूर करण्यापूर्वी सुरेशनें दुःखोद्रेकाच्या भरांत दोन गजांच्या मध्यें असलेल्या तिच्या कपाळाचें आवेगानें चुंबन घेतलं व अशा रीतीनें तिचा शेवटचा निरोप घेतल्यावर रुद्ध कंठानें त्यानें उच्चारलेले शब्द बाहेर जातां जातां माझ्या कानीं पडले, " जा, बाळ ! आम्ही अभागी तुझे कोणत्या प्रकारें उतराई होणार ? आमच्यावरील तुझ्या प्रेमाची ईश्वरच फेड करो ! तुझ्यासारख्याच अनेक कोमल व प्रेमळ हृदयांची तुला तुझ्या आयुष्यांत सोबत लाभो व तें सुखांत जावो !"

बाहेर आल्यावर हातरुमालानें मला शेवंतीचे डोळे पुसतांना पाहून सार्जंटला आश्चर्य वाटलें. मी त्याला आंत पाहिलेला हृदयद्रावक प्रकार सांगितला ! तो ऐकतांच तो झट्‌दिशीं आंत गेला व थोड्या वेळानें कष्टी मुद्रेनें बाहेर येऊन म्हणाला " पाहिलीत, ब्रिटिश पोलिसांची जबानी घेण्याची ही पाशवी पद्धत ? या गोष्टीची मला कल्पना असती तर या एवढ्याशा मुलीला मी कसचं आंत नेऊं दिलं असतं ! बिचारीच्या मनाला तें पाहून केवढा धक्का बसला असेल ! तुम्ही कांहीं लोक त्या सरकारचे नेहमीं गुणानुवाद गातां ! पाहून घ्या आतां हे प्रकार ! कित्येकजण पोर्तुगीज कायद्याला हंसतात, पण एकाद्या निरपराधी इसमाचा असा अमानुष छळ होण्याचा प्रमाद घडूं नये म्हणून अपराधी इसम हातचा गमावणें सुद्धां आम्ही पत्करतों ! वास्तविक जोंपर्यंत ते दोघेजण आमच्या सरकारचे कैदी या नात्यानें पोर्तुगीज हद्दींत आहेत, तोपर्यंत तरी निदान त्यांचा असा हा अमानुष छळ ब्रिटिश अधिकाऱ्यांना करतां येत नाहीं. या आजच्या प्रकारानें त्यांनीं आंतरराष्ट्रीय कायदा मोडला आहे ! बळी तो कान पिळी ! इंग्रजसरकारला पाहिजे ते कायदे धाब्यावर बसवितां येतात ! "

बराच वेळ सार्जंट अशाप्रकारें संतापून बोलत होता ! शेवटीं मी त्याचा निरोप घेऊन शेवंतीसह घरीं यायला निघालों. तिच्या डोळ्यांतून पुनः पुनः अश्रुधारा वाहाव्या व मी त्या पुसाव्या, असा प्रकार सर्व रस्ताभर चालला होता !

दुसऱ्या दिवशीं सर्व शहरभर बातमी पसरली कीं, ' बंडवाल्यांना ' घेऊन ब्रिटिश अधिकारी मुंबईला निघून गेले !

यानंतर बरेच दिवस शेवंती बीरेशमामाच्या व सुरेशमामाच्या पत्रांची वाट पाहात असे ! पोस्टमननें आणून दिलेलें एखादें पत्र मी

फोडीत असतांना पाहिलें कीं, धांवत येऊन उत्कंठेनें "हें सुरेशमामाचं पत्र का?" असें तिनें विचारावें हें ठरलेलेंच !

अशा रीतीनें वरील गोष्ट घडून दोनतीन आठवडे लोटले होते एक दिवस 'कालगति' साप्ताहिकाचा पोस्टमननें नुकताच आणू दिलेला अंक फोडीत मी पडवींत उभा होतों. इतक्यांत शेवंती नेह मींप्रमाणें धांवत तेथें आली. अंक फोडून चाळून पाहण्यास मी सुर वात केली, तोंच तिनें प्रश्न केला, "आज तरी सुरेशमामाचं पत्र आलं आहे काय ?"

याचवेळीं जाड्या टाइपामध्यें छापलेल्या पुढील अक्षरांवरून माझ्र नजर फिरत होती:—

"गोव्याला पकडलेल्या दोघां तरुण बंगाली क्रांतिकारकांस जन्मठे पेची शिक्षा !! दोघांचीही अंदमानला रवानगी !!"

नेहमींप्रमाणें शेवंतीच्या प्रश्नाला मी लगेच नकार न दिल्यामुळे तिच्या मनांत आशा उत्पन्न झाली. विशेष उत्सुकतेनें तोच प्रश्न तं पुनः पुनः विचारूं लागली. शेवटीं तिचें तोंड थांबवण्यासाठीं मं बेसावधपणें म्हणालों, "हो." तें ऐकतांच हर्षभरानें तिनें दुसर प्रश्न केला, "कोठून आलें ? ते आतां कोठें आहेत ?" तशाच मनःस्थितींत मी त्रोटक उत्तर दिलें, "अंदमानला !" "अंदमान कुठे आहे ? तिथं काय करतात ? इथं कधीं येणार आहेत ?" इत्यादि तिची प्रश्नमालिका त्या मागोमाग सुरू झाली ! पण वरील मथळ्याखाली प्रसिद्ध झालेला कॉलम दोन कॉलम मजकूर वाचण्यांत गढून जाऊन "हूं ! हूं" करण्यापलीकडे मी तिला उत्तर न दिल्यामुळें व माझ्य चेहऱ्यावर क्षणोक्षणीं अधिकाधिक गंभीर छटा पसरत चाललेली दिस लागल्यामुळें, शेवटीं कळली तेवढीच बातमी घरांतील इतर मंडळीमध्ये



“ सुरेशमामा !............या, हो घरीं या !” [ पृ. २७३ ]

जाहीर करण्यासाठीं ती तेथून निघून गेली. लगेच “ वीरेशमामाचं व सुरेशमामाचं पत्र आलं आहे !! ते अंदमानला आहेत !” हें आनंदाचें वर्तमान तिनें प्रत्येकाला सांगून टाकलें !

× × ×

अशा रीतीनें पोळा वर्षांमागील हें चित्र त्यांतील लहानमहान प्रसंगांसुद्धां सबंध पाहून झाल्यावर मी भानावर आलों ! मी पायऱ्यांवरच उभा होतों ! शेवंतीचें अजून गाणें चाललें होतें ! “ नमामि कमलां अमलां अतुलाम्० ” हा चरण ती गात होती. यानंतर अधिक वेळ गमाऊणें शक्य नसल्यामुळें राहिलेल्या पायऱ्या चढून मी तिच्या खोलीकडे गेलों. मला पाहातांच तिचें गाणें थांबलें. आणि गातांना मी ऐकल्याबद्दल ती बरीच खजिल झाली ! प्रथम थोडा वेळ एकमेकांना कुशलप्रश्न विचारून झाल्यावर मी तिला म्हणालों, “ तुझा आवाज इतका गोड असेल व तुला इतकें सुरेख गातां येत असेल, अशी मला कल्पनाही नव्हती ! सध्याशीं गात होतीस तें गाणें तू कुणाजवळ ग शिकलीस ?” आपल्या गायनासंबंधीं मी प्रत्यक्ष अशा रीतीनें चर्चा सुरू केलेली पाहताच ती पुनः लाजली ! माझी थट्टा सुरू होईल या भीतीनें तो विषय टाळण्याचा तिनें प्रयत्न केला. पण मी आग्रह धरतांच व थट्टा न करण्याचें व ती गात असते ही गोष्ट बाहेर न फोडण्याचें आश्वासन देतांच ती म्हणाली, “ तुम्हाला आठवत नाहीं का ? फार वर्षांमागं, मी लहान असतांना पणजीला आमच्या घरीं दोघे परदेशी गृहस्थ राहात होते ! त्यांना त्यानंतर पोलिसांनीं पकडून मुंबईला नेलं ! ते हें गीत नेहमीं गात असत व त्यांना गातांना ऐकून माझंही तें त्यावेळीं पाठ झालं होतं. अजून त्यांतलीं कांहीं कडवीं मला आठवतात ! हें गीत

म्हणजे त्यांच्या कुठल्याशा एका देवीचा मंत्र होता म्हणे ! व खरो-खरच त्यांत कांहींतरी दैवी सामर्थ्य आहे काका ! ”

हें ऐकून तिला मी आश्चर्यानें प्रश्न केला, “ काय ? हें गीत म्हणजे एक मंत्र आहे, व त्यांत दैवी सामर्थ्य आहे, असं अजून तुला वाटतं ? त्यांतील एखाद्या दुसऱ्या शब्दाचा तरी तुला अर्थ माहीत आहे का ?”

“ नाहीं ! मंत्रांचा अर्थ जाणण्याची काय जरूरी आहे ? त्यांचा अर्थ कोणाला कळो वा न कळो, त्यांच्यापासून होणारा सुपरिणाम केव्हांही घडून येणारच ! लग्नमुंजीसारख्या मंगल प्रसंगीं म्हटल्या जाणाऱ्या कठीण मंत्रांचा अर्थ फारच थोड्यांना कळत असतो. पण त्यांपासून सर्वांचेंच शुभ घडतें, हें तरी तुम्ही कबूल करतां ना ? विशेषतः या ‘देवीच्या मंत्रां’त केवढं मोठं सामर्थ्य आहे, हें मी प्रत्यक्ष माझ्या डोळ्यांनीं लहानपणीं पाहिलेलं मला अजून आठवतं ! आमच्या घरीं राहणाऱ्या त्या दोघां तरुणांची या मंत्रावर पूर्ण श्रद्धा होती ! कोणतेही मानसिक किंवा शारीरिक क्लेश त्यांस झाले, कीं या मंत्राचा उच्चार करतांच त्यांचें सर्व दुःख पार नाहींसे होई ! इतकेंच काय पण तुम्ही मला आपल्याबरोबर एकदां त्यांच्या तुरुंगांत घेऊन गेलां होतां, तेव्हां पोलिसांनीं मारल्यामुळें त्यांच्यापैकीं एकाच्या हाताला कशा जखमा झाल्या होत्या ! बोटेंही केवढीं सुजलीं होतीं ! व रक्ताच्या तर धारा गळत होत्या ! पण हें सर्व दुःख हाच ‘देवीचा मंत्र’ गात ते किती शांतपणानें सहन करीत होते ! तुम्ही ही गोष्ट त्यावेळीं पाहि-लेलीच असेल. मला स्वतःलाही या मंत्राचा प्रत्यय असाच वारंवार येत असतो ! जेव्हां जेव्हां कोणत्याही मानसिक किंवा शारीरिक उपा-धीपासून मला त्रास होतो, तेव्हां तेव्हां हें गीत गातांच त्याचा माग-मूसही राहत नाहीं ! ”

तिचें हें भाषण व त्यांतील कोटिक्रम ऐकून "अज्ञान हेंच सुख!" या वचनाची मला आठवण झाली व अशा प्रकारचें तिचें हें सौख्य-दायी अज्ञान तिजपासून हिरावून घेणें इष्ट कीं अनिष्ट, यासंबंधींच्या विचारांत मी गुंग होऊन गेलों!

इतक्यांत शेवंती बऱ्याच उत्सुकतेनें पुढं म्हणाली, "आमच्या घरीं राहिलेल्या त्या बंगाली पाहुण्यांच्या मला कितीतरी गोष्टी आठवतात! पण खरंच विसुकाका, त्यांना तुरुंगांत नेल्यावर मग पुढ त्यांचं काय झालं असावं हो?"

अजून विचारांच्याच तंद्रींत असल्यामुळें मी त्रोटक उत्तर दिलें, "त्यांना नंतर काळ्या पाण्याची शिक्षा झाली!"

"काळ्या पाण्याची शिक्षा म्हणजे कसली शिक्षा?" आश्चर्यानें तिनें पुनः प्रश्न केला!

"ज्याप्रमाणें इकडचं पोर्तुगीज सरकार विशेष मोठ्या गुन्हेगारांना आफ्रिकेंत मसमेला पाठवतं, त्याचप्रमाणें इंग्रजसरकार तशा गुन्हे-गारांना दूर समुद्रांत असलेल्या अंदमान नांवाच्या बेटांत पाठवतं! मात्र मसमीला गेलेले बरेचसे गुन्हेगार शेती किंवा उदेम-धंदा करून व कित्येक नवीन संसार थाटून तेथें सुखानं राहातात व पंधरावीस वर्षांनीं शिक्षा संपल्यावर सोन्याच्या गिन्या घेऊन स्वदेशीं परत येतात, तर अंदमानच्या बहुतेक गुन्हेगारांच्या आयुष्याचा शेवट तेथें ते खडी फोडीत असतांना किंवा तेलाच्या घाण्याला जुंपलेले अस-तांनाच व्हावयाचा! विशेषतः त्या बंगाली तरुणांच्या वर्गांतील जे गुन्हे-गार असतात, त्यांपैकीं क्वचितच एखाद्याच्या नशिबीं स्वदेशाला पुनः पाय लावण्याचं भाग्य असतं! कित्येकांचीं मेल्यानंतर हाड तेवढीं

समुद्राच्या लाटा त्यांच्या मायदेशाला नेऊन पोंहोचवीत असतील तेथढींच ! ''

बऱ्याच उद्वेगानें मी दिलेलें हें उत्तर ऐकतांच शेवंतीनें त्यांच्या-संबंधीं आणखी कांहीही विचारलें नाहीं !

" अरेरे ! तीं खरोखरच देवमाणसं होतीं ! !'' एवढेच शब्द करुणार्द्र स्वरानें तिनें उच्चारले व तत्क्षणीं तिच्या डोळ्यांत पाणी आलें !

इतक्यांत खालून मला कोणी हांका मारीत असल्याचें माझ्या कानीं आलें. तो आवाज माझ्या ओळखीचाच होता. "विमुबाबा ! विमु-बाबा !'' व्यंकू तांडेलानें सप्तम सुरांत एकसारखा हांकांचा सपाटा चालवला होता ! घाईघाईनें शेवंतीचा निरोप घेऊन मी खालीं आलों व व्यंकूबरोबर झपाझप नदीतीराकडे चालायाला सुरवात केली.

माझ्या आजच्या दिरंगाईमुळें होडी इष्ट स्थळीं पोहोंचण्यापूर्वीं आतां किती संकटांची परंपरा आपल्यावर कोसळेल, हें भरतीआहोटीच्या व वाऱ्याच्या उलट्यासुलट्या गतीच्या शास्त्राचे आधार देऊन सिद्ध कर-ण्याचें काम व्यंकूनें सर्व रस्तभर चालवलें होतें ! होडीच्या ठरलेल्या भाड्याहून चार आणे जास्ती देण्याचें मी त्याच वेळीं त्यास आश्वासन दिलें असतें, तर त्या सर्व संकटांस धैर्यानें तोंड देण्यास त्यास उत्साह आला असता व त्याची टकळी बंद पडली असती ! पण ही साधी गोष्ट सुचण्याइतकेंही प्रसंगावधान असायाला, माझें चित्त त्याच्या शब्दांकडे थोडेंच होतें !

थोड्या वेळानें आम्ही किनाऱ्यावर जाऊन पोहोंचलों व होडींत बसलों. व्यंकूनें झटपट आपलें शीड उभारलें. वारा जोरानें अनुकूल दिशेला वाहात होता त्याचें पाठबळ मिळतांच नदीचें पाणी सहज लालेनें तोडीत होडीनें वेगानें धांव घेण्यास सुरवात केला !

शिडाच्या एका कांठाच्या फाटलेल्या झरोक्यांत जबरदस्तीनें घुसून वारा त्वेषानें किंचाळत गाऊं लागला! सुकाणू धरून बसलेला व्यंकूही आपल्या कर्कश आवाजानें 'तांडेलगीत' गात त्याला साथ करूं लागला! निसर्ग व मानव यांनीं एकजूट होऊन निर्माण केलेल्या त्या कमालीच्या कर्णकठोर संगीतामधूनही कांही वेळापूर्वीचे शेवंताचे मधुर व कोमल आलापच मला ऐकूं येत होते! तो 'देवाचा मंत्र'च माझ्या कानांशीं घुमत होता!—



# टीपा

—०—

[ या पुस्तकांत आलेले प्रादेशिक शब्द व वाक्प्रचार यांचें स्पष्टी-करण पुढें दिलें आहे. जशाचे तसे मूळ स्वरूपांत, अपभ्रंश पावून किंवा उच्चारान्तर होऊन जे पोर्तुगीज शब्द कोंकणीत वापरले जातात, ते दाखवण्यासाठीं ' पो. ' हें संक्षेपचिन्ह वापरलें आहे. या अशा शब्दांपैकीं ज्यांना तत्सदृश इंग्रजी प्रतिशब्द आहेत, तेही कंसांत ' इं. ' या संक्षेपचिन्हासह त्यापुढें दिलेले आहेत. ]

## अ

**अघनाशिनी**—गोव्यांतील एक नदी. या नदीचें प्रचलित नांव आगशी हें आहे. बोलीमध्यें रूढ असलेल्या स्थलवाचक नांवां-ऐवजीं त्याचे खरेखुरे किंवा गृहीत धरलेले संस्कृत पर्याय भाषा-गौरवाच्या हेतूनें लेखनांत योजण्याच्या पद्धतीमुळें उपयोगांत येऊं लागलेलीं अशाप्रकारचीं आणखीही बरींच नांवें गोमंतकविषयक पुस्तकांमधून आढळतील. उदा० केळोशी, कुडाळ, लोटली यांच्या ऐवजीं **कर्दली, कुशस्थळी, लोष्टावली** इ०

## आ

**आग्नस दे '**—( पो. ) या लॅटिन शब्दांचा अर्थ ' ईश्वराचें कोंकरूं' असा आहे. ख्रिस्तानें एखाद्या कोंकराप्रमाणें निमूटपणें ईश्वराच्या कार्यासाठी आपला बळी दिला, या अर्थानें पूज्यबुद्धीनें हें विशेषण ख्रिस्तानुयायांकडून त्याला लावलें जातें, व त्या शुभ प्रसंगाचें दर्शक

म्हणून कोंकरूं व क्रॉस हीं दोन्ही एके ठिकाणीं असलेलीं तांबड्या मेणाचीं चित्रें केलीं जातात, त्यांस ही संज्ञा आहे.

**आझींज्यु, सोब्रैरु**—( पो. ) ओक वृक्षाच्या दोन जाती.

**आडसर**—शहाळें, कोंवळा नारळ.

**आद्मिनिस्त्रादोर**—( पो. ) [ इं. Administrator ] गोवा प्रांताचा अकरा **महालांमध्यें** किंवा **कौंसेल्यांमध्यें** ( पो० ) विभागणी करण्यांत आलेली आहे. त्या प्रत्येकावरील मुख्याधिकाऱ्याचा हा हुद्दा. या महालांचें क्षेत्रफळ ब्रिटिश हिंदुस्थानांतील तालुक्यांएवढें असलें, तरी त्यावरील या मुख्याधिकाऱ्याचा दर्जा कलेक्टराच्या तोडीचा आहे. मात्र ब्रिटिशहिंदुस्थानांत कलेक्टराच्या हातीं अंमलबजावणीचें खातें, जमीनमहसुलाचें खातें व न्यायखातें या तिहींची सत्ता केंद्रित झालेली असते, पण गोवाप्रांतांत या ' आदमिनिस्त्रादोरा 'कडे फक्त अंमलबजावणीचेच अधिकार दिलेले असून दुसरीं दोन खातीं स्वतंत्र असतात.

**आद्व्होगाद्**—( पो. ) [ इं. Advocate ] वकील.

**आदांव्ईव्ह**—( पो. ) ईश्वरानें पहिल्या प्रथम ' आदांव ' हा पुरुष व ' ईव्ह ' ही स्त्री निर्माण केली व या जोडप्यापासून पुढें सबंध मनुष्यजात अस्तित्वांत आली, अशी बायबलांत कथा आहे.

**आंतिफोन, लादाइंज्य**—(पो.) [ इं० Antifona, Littany ] ख्रिस्तमाता मेरीस उद्देशून करण्यांत येणाऱ्या प्रार्थनांचे हे दोन प्रकार.

**आमच्या बापा, नमन मोरिये—मोरिये**—हे मारी ( मेरी ). ' Padre Noso ' व ' Ave Maria ' या दोन पोर्तुगीज प्रार्थनावरून बनवलेल्या व एखाद्या संकटाच्या प्रसंगीं ख्रिस्ती लोकांमध्यें म्हणण्यांत येणाऱ्या दोन कोंकणी प्रार्थनांचीं हीं नांवें. मूळ पोर्तुगीज त्याचप्रमाणें या कोंकणी प्रार्थनांमधील सुरवातीच्या दोन शब्दांचाच त्यांच्या नांवांसारखा उपयोग करण्यांत येत

असतो. यांपैकीं '**आव्हेमारीय**' हें पोर्तुगीज प्रार्थनेचें नांव दुसऱ्याही एका अर्थानें कोंकणींत जशाचें तसें रूढ झालें आहे. पहांटेस, माध्यान्हीं, व संध्याकाळीं प्रत्येक चर्चमधून घंटानाद होत असतो, त्यास 'आव्हेमारीयची' घंटा असें म्हणतात. ही घंटा कानीं पडतांच कपाळावर, तोंडावर, छातीवर व संबंध धडावर 'खुरसाची खूण' (क्रॉसचिन्ह) करण्याचा ख्रिस्त्यांमध्यें एक तांत्रिक विधी असून त्यावेळीं मंत्रांदाखल कांहीं ठरींव शब्दसमूह उच्चारावयाचे असतात. 'सांत खुरसाची काढ्रंक' या शब्दांनीं कोंकणी मध्यें बोध होणाऱ्या या विधीस '**खुरिसणें**' हा पर्याय मराठींत योग्य दिसेल. 'ईश्वरा, या पवित्र खुरसाच्या चिन्हाच्या द्वारें आत्म्याच्या शत्रूंपासून आमचें रक्षण कर!' असा या प्रसंगीं म्हणण्यांत येणाऱ्या मंत्रांचा आशय असून आत्म्याचे हे शत्रू वाईट शब्द, विचार व कृती यांच्या रूपानें त्याचा नाश करतात, या समजुतीमुळें शब्द, विचार व कृती जेथून उद्‌भवतात त्या तोंड, हृदय, हात इ० शरीराच्या भागांवर हीं चिन्हें करण्याचा प्रघात पडला आहे. या 'आव्हेमारीयच्या' वेळेशिवाय इतर कित्येक प्रसंगींही बहुधा स्तोत्रपाठापूर्वीं ही 'खुरिसण्याची' क्रिया केली जाते.

**आम्नेश्ती**—(पो.) [इं० Amnesty] राजकीय गुन्ह्याबाबत भोगाव्या लागणाऱ्या शिक्षेची माफी.

**आर्सेबिश्पु**—(पो.) आर्चबिशप.

**ऑश्तिया**—(पो.) [इं. Host] लॅटिनमधून आलेल्या या शब्दाचा मूळ अर्थ बलिदान किंवा आहुती असा आहे. शूलारोहणापूर्वी ख्रिस्तानें आपल्या बारा प्रेषितशिष्यांसमवेत केलेल्या ज्या भोजन-प्रसंगानें ख्रिस्तीधर्माच्या अस्तित्वास आरंभ झाला, असें मानण्यांत येतें, त्याचें प्रतीक म्हणून रोमन कॅथोलिकचर्चमध्यें उपासनेच्या

वेळीं एक धार्मिक विधी करतात, त्यास उद्देशून हा शब्द रूढ झाला आहे. सदहू 'अंतिम भोजना'च्या वेळीं रोटी व मद्य यांचा निर्देश करून "हें माझें शरीर ! हें माझें रक्त ! यांच्या योगेंकरून माझी स्मृती कायम राखा !" असें ख्रिस्तानें आपल्या प्रेषित शिष्यांस सांगितल्याचा बायबलांत उल्लेख आहे, त्यावरून हा ऑश्तियाचा विधी अस्तित्वांत आला आहे. धर्मोपदेशक या विधीच्या वेळीं ख्रिस्ताचे वरील शब्द व आणखी कांहीं मंत्र उच्चारून रोटी व मद्य यांवर संस्करण करतो व नंतर त्या दोहोंमध्यें ख्रिस्ताच्या देहाचा संचार झाला, असें मानण्यांत येतें.

**आव्हमारीय**—( आमच्या बापा, पाहा. )

**इ.**

**इगर्ज**—( पो. ) चर्च. इगर्ज लहान असल्यास त्यास **कपेल** ( पो. ) [ इं० Chapel ] असें म्हणतात. पण इगर्ज न कपेल यामधील मुख्य भेद हा कीं, इगर्जेवर धर्मोपदेशकाचें नियंत्रण असतें, तसें कपेलावर असत नाहीं. याशिवाय एखाद्या व्यक्तीच्या खासगी उपासना, प्रार्थना यांसाठीं उपयोगांत येणारें जें लहान कपेल असतें, त्यास '**ओरातोर्यु**' ( पो. ) [इ. Oratory] असे नांव आहे. इगर्जेवर नियंत्रण ठेवणाऱ्या मुख्य पाद्र्यास '**व्हिगार**' असें म्हणतात.

**इंग्लेझ**— ( पो ) इंग्लिश

**इंदिया**—(पो.) [इं० India] हिंदुस्थान. मात्र या 'इंदिया' शब्दामध्यें पोर्तुगीजांचीं हिंदुस्थानांतील गोवा, दीव व दमण हीं तीन ठाणीं, एवढाच अर्थ अभिप्रेत असून त्यांतील मूळव्यापक अर्थानें तो पोर्तुगीजमध्यें क्वचितच वापरला जातो.

**इंपळ, त्रीप, कांदळ**—खारवट जमिनीवर वाढणाऱ्या निरुपयोगी झाडाच्या जाती.

**इप्रित**—नवल, विपरीत.

**इंफांत**—( पो. ) इंग्रजींतील 'प्रिन्स' या शब्दाप्रमाणें राजवंशांतील व्यक्तींच्या नांवांमागे पोर्तुगीजमध्यें हें उपपद लावण्यांत येतें.

**इर्मांव**—( पो. ) भाऊ.

## उ

**उमज, दुरो, ताम्म**—पेरणीपूर्वी जमिनीच्या ज्या उभ्या आडव्या टराविक नांगरण्या व्हाव्या लागतात, त्यांस त्यांच्या क्रमानुसार अशीं हीं नांवें दिलेलीं आहेत.

## ए

**एतिकेत**—( पो. ) [ इं. Etiquette ] शिष्टाचार.

## ओ

**ओपणी**—पेरणी.

**ओरातेर्रु**—[ इगर्ज, पाद्री. ]

**ओफस्याल**—( पो. ) [ इं. Official ] सरकारी कामगार.

## औ

**औरिक**—( पो. ) पोर्तुगालमधील एक इतिहासप्रसिद्ध युद्धभूमी. बाराव्या शतकांत पोर्तुगाल देश अरब लोकांनीं पादाक्रांत केला होता. या अरब जेत्यांबरोबर सन ११३९ सालीं आरिक येथें झालेल्या लढाईंत **दों. आफोंसु-द-येंन्रिक** राजानें एक संस्मरणीय विजय मिळवला. या विजयानें पोर्तुगीजराष्ट्राचा पाया घातला गेल्यामुळें या राजास पोर्तुगालचा आद्यसंस्थापक राजा मानण्यांत येतें. ओरिकच्या रणभूमीवर युद्धाच्या सुरवातीआधीं ख्रिस्ताचें व क्रॉस चिन्हाचें दर्शन घडून ख्रिस्ताकडून या दों. आफोंसु राजास विजयाचें आश्वासन मिळालें, अशी दंतकथा प्रचलित आहे.

## क

**कट्टी**—नारळाची करंटी. गोव्यांत गरीब लोक या कट्टयांचा उपयोग भांड्यांप्रमाणें पाणी, दारू किंवा पेज पिण्यासाठीं करतात.

**कमांदांत**—( पो. ) [ इं. Commandant ] सैन्यावरील मुख्याधिकारी.

**कपीत**—पलटणीवरील मुख्याधिकारी. 'कापितांव' [इं. Captain] या पोर्तुगीज शब्दाचें हें कोंकणींतील कुणबाऊ रूप आहे.

**कपेल**—( इगर्ज, पाद्रा )

**कलवंतीण**—गोव्यांत बऱ्याच मोठ्या प्रमाणांत अस्तित्वांत असलेल्या 'देवदासी' वर्गापैकीं 'कलावंत' हा एक पोटभेद असून त्यांतील स्त्रियांना 'कलावंतिणी' या नांवानें ओळखलें जातें. या कलावंतिणीचें इतर देवदासींहून वैशिष्टय हें कीं, वेश्याव्यवसाय व देवळांतील सेवावृत्ती या दोन मार्गांनीं द्रव्यार्जन करण्याचा जरी इतर देवदासींप्रमाणेंच यांच्यांतही प्रघात असला, तरी गायन, वादन व नर्तन या कला, हेंच यांचें चरितार्थाचें महत्वाचें साधन बनलेलें असतें, तसें तें इतर पोटभेदांमध्यें आढळून येत नाहीं. हा कलाव्यवसाय अर्थात् या 'कलावंत' वर्गाचा बौद्धिक दर्जा वाढवण्यास, त्याचप्रमाणें समाजांतील वरच्या व श्रीमंत वर्गाचा आश्रय मिळून त्यायोगें आर्थिक सुस्थिती व पांढरपेशी राहणी यांच्यामध्यें येण्यास कारण झाला आहे. तथापि एक सामाजिक अनिष्ट या दृष्टीनें 'देवदासी'प्रश्नाचा विचार करतांना हा 'कलावंत' वर्ग गोव्यांतील सर्वसाधारण 'देवदासी' वर्गाचा प्रातिनिधिक मानण्यास हरकत नाहीं. या कलावंतिणी व गोव्यांतील इतर देवदासी यांच्यामध्यें मुलगी वयांत आल्यावर '**शेंस घालण्या**' चा एक

विधी करण्यांत येतो. हा लग्नविधीसारखाच असतो व याला भटांभिक्षुकांची व त्यांच्या मंत्रांचीही जरूर लागते. फक्त फरक एवढाच कीं, वराच्या जागीं दुसऱ्या एखाद्या मुलीची योजना केलेली असते. एखाद्या मुलीचा हा शेंसविधी म्हणजे तिच्या वेश्याव्यवसायाचा आरंभ असें मानण्यांत येतें व तो झाल्याशिवाय त्यांना देवळांतल्या कामालाही योग्य मानण्यांत येत नाहीं. हा शेंसविधी म्हणजे एक धार्मिक कर्तव्य अशी भावना या देवदासीवर्गामध्यें आज अनेक शतकें चालू असल्यामुळें गेलीं कित्येक वर्षे त्यांच्या नैतिक सुधारणेच्या आड येणारी ती एक मोठीच धोंड बनून राहिली होती. पण यंदां ना० बांदोडकर यांनीं गोव्याच्या कायदेकौन्सिलांत आणलेलें शेंस-प्रतिबंधक बिल पास होऊन व त्याच्या अंमलबजावणीसही सुरवात होऊन ती कांहीं अंशीं दूर झाली आहे. (गोव्यांतील या देवदासीवर्गाची व त्यांच्यांमध्यें नैतिक सुधारणा घडवून आणण्यासाठीं अलीकडे चालू झालेल्या प्रयत्नांची विशेष माहिती ' Bombay Vigilance Association ' चे सेक्रेटरी श्री. पु. गो. नाईक यांनीं प्रसिद्ध केलेला एतद्विषयक अहवाल व 'गोमांतकमराठासमाजा'तर्फे मुंबईला निघणाऱ्या ' समाजसुधारक ' या मासिकामध्यें मिळूं शकेल. )

**काज**—काजूचें झाड.

**कांड**—गोफाप्रमाणें विणलेला रुप्याचा करगोटा. गोव्यांत बहुधा शेतकरी, मजूर वर्गांतील लोक हा दागिना वापरतात.

**कातली**—ओल्या खोबऱ्याचा तुकडा.

**कांदळ**—( इंपळ, पाहा. )

**कामोंइश**—लुईझ-द-कामोंइश. हा पोर्तुगीज महाकवि सोळाव्या शतकांत होऊन गेला. यानें लिहिलेल्या '**लुझीयदश**' या राष्ट्रीय

महाकाव्यामुळें शेक्सपियर, डॉंटे, मिल्टनसारख्या जगांतील कवि-श्रेष्ठांमध्ये यास स्थान मिळालें आहे. वास्कोदगामानें हिंदुस्थानचा जलमार्ग शोधून काढण्यासाठीं केलेल्या सफरीचें वर्णन हा या महाकाव्याचा विषय असला, तरी त्यांत सोळाव्या शतकापर्यंतच्या पोर्तुगालच्या इतिहासांतील बहुतेक सर्व महत्वाचा भाग गुंफला गेला असल्यामुळें, त्यास 'लुझीयदश्' म्हणजे लूझोच्या (पोर्तुगीजांचा हा मूळ पुरुष) वंशजांचीं कृत्यें, असें नांव दिलेलें आहे. (यासंबंधीं विशेष माहिती प्रस्तुत लेखकानें 'विद्यासेवक' च्या १९२७ च्या जुलैच्या अंकांत लिहिलेल्या 'पोर्तुगीझ महाकवि लुईझ्-द-कामोंइश्' या चरित्रलेखांत मिळेल.)

**किरण**—सूर्य.

**क्रिस्तांव, क्रिरिस्तांव**—(पो.) ख्रिस्ती. पण गोव्यांमध्यें हे शब्द बहुधा देशी ख्रिस्त्यांच्या वर्गाला उद्देशून वापरण्यांत येत असून युरोपियन किंवा युरेजियन लोकांचा उल्लेख '**फिरंगी**' या वेगळ्या संज्ञेनें करण्यांत येतो.

**कुडव**—धान्य मोजण्याचें एक माप. गोव्यांत **कुंभ, भरा, खंडो, कुडव, पायली** अशीं धान्य मोजण्याचीं मापें प्रचलित असून त्यांतील परस्परप्रमाण अनुक्रमें १ : ४ : २० : ४०० : ८०० असें आहे. गोव्यांत सध्या तांदळांची धारण सर्वसाधारणपणें ४०-४५ रु. भरा अशी आहे. तीस पस्तीस वर्षांमागे तो ३०-३२ रु. भरा होती.

**कुंपजी**—(पो.) [इं. Company] सैन्यांतील तुकडी.

**कुंभ**—(कुडव, पाहा)

**कुडवाळी** } **कुळवाडी** } शेतकाम्या जातींतील लोक.

**कुळागर**—पोफळी, पानवेली, केळी यांची विशेषेंकरून जेथें लागवड केली आहे, असा बागायती उत्पन्नाचा मळा.

**कूर्स**—(पो.) [इं. Course] शिक्षणक्रम.

**कोंकणो**—प्राचीनकाळीं वसईपासून कन्याकुमारीपर्यंत पसरलेला हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावरील प्रदेश सप्तकोंकणांत विभागला असल्यामुळें त्यांतील सर्वच लोकांना 'कोंकणे' ही संज्ञा लागू होत असली, तरी एका कोंकणांतील लोकांनीं दुसऱ्या कोंकणांतील लोकांना तेवढाच, त्यांची स्वतःपासून भिन्नता दाखवण्यासाठीं 'कोंकणे' या नांवानें उल्लेख करावा अशी पद्धत चालत आलेली दिसून येते. पोर्तुगीजांच्या बाटवणुकीमुळें मूळ हिंदुसमाजापासून गोव्यांतील बाटलेल्या लोकांचा वर्ग अलग झाल्यावर तेही याच कारणानें हिंदूंना 'कोंकणे' या नांवानें संबोधूं लागले. अलीकडे ख्रिस्ती लोकांकडून हा शब्द वापरला जातो त्यांत भिन्नत्वदर्शक अर्थाच्या जोडीलाच तुच्छतेचा ध्वनीही बहुधा मिसळलेला असतो.

**कोमुनिदाद**—(पो.) [इं. Community] ग्रामपंचायतसंस्था. हिंदुस्थानांतील इतर भागांप्रमाणेंच गोव्यांतही जुन्याकाळीं ग्रामपंचायत संस्थेवरच लोकांच्या सामाजिक जीवनाची सर्वस्वी उभारणी केली गेली होती. पोर्तुगीज लोकांनीं गोवा प्रांतांत आपला अंमल स्थापन करतेवेळीं लोकांचे या ग्रामपंचायतीचे हक्क मान्य केले. पण पुढें ही संस्था खच्ची करण्याचे सरकारकडून वारंवार प्रयत्न करण्यांत आले. तरीही अवशेष स्वरूपांत ती या प्रांतांत अजून अस्तित्वांत आहे. या ग्रामपंचायतींच्या मालकीच्या जमिनी असतात, त्या जमिनींच्या उत्पन्नांतील कांहीं ठराविक अंश पिढिजाद हक्कानें ज्यांस मिळत आला आहे, त्यांस या विशिष्टार्थानें **गांवकरी** ही संज्ञा आहे. याचाच सदृश असा **गाउनगे** हा दुसरा एक

शब्द रूढ असून तो सत्तर महालासारख्या गोव्यांतल्या ज्या भागांत ग्रामपंचायत संस्था अस्तित्वांत नाहीं, पण तेथील गांवांमधून वंशपरंपरा राहात आल्यामुळें ज्यांस कांहीं बाबतींत वहिवाटीचा हक्क सांगतां येतो, त्यांस उद्देशून वापरतात.

**कोट**—या शब्दाचा मूळ अर्थ तट, तटबंदी. पण गढी किंवा किल्ला या अर्थानें हा कोंकणींत प्रचलित आहे.

**कोंसेल्य**—[ आदमिनिस्त्रादोर, पाहा. ]

**कोंव्हेंत**—( पो. ) [ इं० Convent ] ख्रिस्ती महंतांचा किंवा जोगिणींचा मठ. पोर्तुगीजांनीं गोवा प्रांत जिंकल्यावर धर्मप्रसाराच्या कार्यासाठीं आलेल्या रोमन कॅथोलिक पंथाच्या निरनिराळ्या शाखांच्या महंतांचे व जोगिणींचे मठ एकामागून एक येथें स्थापन झाले. त्यांतील कांहीं अजून जुनें गोवें येथें अस्तित्वांत असून त्यांची भव्यता व सौंदर्य यांमुळें स्थापत्याचा एक प्रेक्षणीय नमुना म्हणून या कोंव्हेंतांची ख्याति आहे. त्यांपैकीं कोंव्हेंन-द-बोंझेजूस् नांवाच्या मठांत चार शतकांमागें होऊन गेलेल्या **सांफ्रांसिश्कु-शाविंयर** या जगप्रसिद्ध झेजुईट साधूचें शव जतन करून ठेवलें असल्यामुळें त्यास विशेष महत्व आलें आहे. दर दहावर्षांनीं या शवाचा उद्‌घाटनमहोत्सव होत असतो, त्याप्रसंगीं दूरदूरच्या देशांतून आलेल्या हजारों ख्रिस्ती यात्रेकरूंची येथें गर्दी लोटते.

## ख

**खंडी**—[ कुडव, पाहा. ]

**खरचाणी, मुड्डशी, बुरांटो, वेल्ली, शेंवटा**—हीं माशांच्या निरनिराळ्या जातींचीं नांवें. **बुरांटो, वेल्ली** हे मासे अगदीं लहान म्हणजे बोटभर आकाराचे असल्यामुळें त्यांचा प्रकार

अगदीं क्षुल्लक मानला जातो. **शेंवड्याची** जात आकारानें हात सव्वाहात एवढी मोठी व रुचकर असते व फार महाग विकली जाते. **खरचाणी, मुड्डोशी** या जाती लहान असल्या तरी रुचकर असतात.

**खाजन**—खाऱ्या पाण्याच्या कांठची शेतजमीन. कुलाबा व रत्नागिरी जिल्ह्यामध्येंही हा शब्द प्रचारांत आहे. पण या भागांत खाऱ्या पाण्याच्या संसर्गामुळें निकृष्ट प्रतीच्या किंवा अगदीच निरुपयोगी बनलेल्या जमिनीस 'खाजण' म्हणतात, तर याच्या उलट गोव्यांतील 'खाजनें' हीं इतर सर्वसाधारण जमिनींहून अधिक पीक देणारीं असून त्यांच्या लागवडीची एक विशिष्ट पद्धतही ठरलेली आहे. नदीच्या खाऱ्या पाण्याचा एक चिंचोळा फाटा या खाजनापर्यंत नेलेला असतो. पण खाजनाच्या तोंडाशीं दहाबारा फूट रुंद व तितकाच उंच असा एक लांकडी दरवाजा असून भरतीच्या वेळीं नदीचें पाणी खाजनांत शिरतेवेळीं त्याचीं दारें आपोआप बंद व्हावींत व ठरींव प्रमाणांत त्यामधून झिरपणाऱ्या पाण्याहून जास्ती पाणी शेतांत येऊं नये, त्याचप्रमाणें ओहोटीच्या वेळीं तीं दारें आपोआप उघडीं होऊन आंतील पाण्यास बाहेर जाण्यास वाव मिळावा, अशी त्याची रचना केलेली असते व तीस '**मानस**' असें नांव आहे. अशा या खाजनांत '**सर्द**' ( रबी ) व '**वांयगण**' ( खरीप ) अशीं वर्षातून दोन पिकें निघतात. सर्द पीक पावसाच्या पाण्यावर निघतें व आजूबाजूच्या सांठवणीच्या पाण्याचे पाट खाजनांत खेळवून त्यावर वांयगण पिकवतात. या पाण्याचा फालतु भाग नदींत सोडून देण्यासही मानसेचा उपयोग होतो. कारण ओहोटीच्या वेळीं मानसेचीं दारें आपोआप उघडतात व एका ठराविक प्रमाणाबाहेर सांचलेलें खाजनांतील पाणी बाहेर वाहून जातें. मानसेमधून भर-

तीच्या वेळीं थोडेंसें खारें पाणी खाजनांत झिरपत राहावें, अशी मुद्दाम रचना केलेली असते, याचें कारण या पाण्यामुळें शेताला जरूर असलेल्या क्षाररूपी खताचा पुरवठा होतो.

**खाप्री**—( पो. ) [ इं. Kaffir ] 'काफ्र' या पोर्तुगीज शब्दाचा हा अपभ्रंश. आफ्रिकेंतील मुसलमान व इतर लोक यांना उद्देशून हा मूळ पोर्तुगीज शब्द वापरण्यांत येई. पण गोव्यांत 'निग्रो' या शब्दाचा पर्याय म्हणून हा शब्द रूढ झाला आहे.

**खुनमान्या**—खुनशी.

**खुरीस**—( पो. ) क्रॉस चिन्ह. 'क्रूझ' या पोर्तुगीज शब्दाचें हें विकृत स्वरूप. कोंकणी बोलींत यास कायमचें स्थान मिळालें आहे.

## ग

**गाउन्गे**—[ कोमुनिदाद, पाहा. ]

**गाऱ्हाणें**—संकटनिवेदन व तन्निवारणार्थ देवाची प्रार्थना. या अर्थानें '**गाऱ्हाणें घालणें**' हा वाक्प्रचार कोंकणींत रूढ आहे.

**गांवकरी**—[ कोमुनिदाद, पाहा. ]

**गावडा**—कुणब्यांमधील एका जातीचें नांव.

**ग्रांवमोगोल, गुंगान्यामा**—( पो. ) पोर्तुगीज इतिहासकार दिल्लीच्या बादशहांना '**ग्रांवमोगोल**' म्हणजे 'महान मोंगल' (Mogul the Great ) या नांवानें ओळखतात. '**गुंगान्यामा**' हें आफ्रिकेंतील एका रानटी जातींतील राजाचें नांव. आफ्रिकेंत वसाहत करणाऱ्या पोर्तुगीज लोकांना यानें बराच त्रास दिला होता. शेवटीं याचा पाडाव झाला व याला कैद करून पोर्तुगालला नेण्यांत आलें. एखाद्या इसमाची अस्मानी सुलतानी सुचवण्यासाठीं या दोन्ही विशेषणांचा पोर्तुगीजमध्यें उपयोग करतात.

**गुन्यांव भोगोस्मा**—गुन्हा पोटांत घाला. **गुन्यांव**—गुन्हा. **भोगोस्मा**—भक्षा.

**गोव्हर्नादोर**—( पो. ) गव्हर्नर.

## घ

**घरावर कुत्रें चढवणें**—गोव्यांत घरावर कुत्रें चढणें हें अशुभ मानतात व या अशुभनिवारणार्थ कांहीं काळ तें घर सोडून त्या घरांतील माणसें दुसरीकडे राहायाला जातात. अर्थात् एखाद्याला मुद्दाम अडचणींत पाडावयाचें झाल्यास, त्याच्या घरावर कुत्रें चढवणें हा येथें सोपा उपाय आहे म्हणून कोणाही व्यक्तीचा कमालीचा दुष्टपणा वर्णन करण्यासाठीं या वाक्प्रचाराचा लाक्षणिक अर्थानें उपयोग करतात.

**घांटी**—लहान घांट ( रस्ता ).

**घुमट**—देवळाच्या घुमटाच्या आकाराचें एक प्रकारचें चर्मवाद्य. हें कुंभाराच्या मातीचें बनवलेलें असून याचें पेल्याच्या आकाराचें एका बाजूचें लहान तोंड उघडें व दुसऱ्या बाजूच्या रुंद तोंडावर घोरपडीचें कातडें बसविलेलें असतें. पन्नास साठ लोकांच्या जमावाकडून म्हटल्याजाणाऱ्या मर्दानी थाटाच्या जानपद संघगायनांत गोव्यामध्यें याचा उपयोग करतात. हें वाद्य वाजवण्याचें कसब म्हणजे एक महत्वाचें शास्त्रच बनलेलें असून त्याची उभारणी सर्वतः तालावर करण्यांत आलेली आहे. आधुनिक वाद्यप्रकारांमुळें अलीकडे या वाद्याचें महत्त्व कमी होत चाललें असलें, तरी अजून गोव्यांतील खेड्यापाड्यांमध्यें या घुमटवादनाचें फार प्रस्थ असून, त्यांत प्राविण्य मिळविण्यासाठीं खालच्या वर्गांतीलच नव्हे, तर ब्राह्मणादि जातींतील लोकांमध्येंही स्पर्धा चाललेली असते. शिमग्यांत व अशाच कांहीं विशेष प्रसंगीं या वाद्याला तबला, मृदंग, झांज इ० इतर वाद्यें

व कलावंतिणींचें नृत्यगायन यांचीही जोड देण्यांत येते. खास या वाद्याबरोबर म्हणण्याचे गांवटी चालींवरील कांहीं लोकगीतांचे प्रकारही ठरलेले आहेत, त्यांपैकीं **जात** हा प्रकार विशेष लोकप्रिय आहे.

## च

**चाड्डा**—गोव्यांतील बाटलेल्या ख्रिस्ती समाजामध्यें बेटीव्यवहारापुरता तरी लवचिक स्वरूपांत जातीभेद अजून कायम आहे. त्यांतील क्षत्रिय जातीचे लोक आपणास 'चाड्ड' म्हणवतात. ('गोंयकारांची गोंयाभायली वसणूक' या आपल्या पुस्तकांत (पृ. २०) शेणै वा. र. वर्दे वालावलीकार यांनीं या शब्दाची ऐतिहासिक व्युत्पत्ति देण्याचा प्रयत्न केला आहे.)

**चाळा**—पिशाचगण.

**चुट्टी, चुडतें, चुड्या**—नारळीच्या सांवळ्यांना '**चुडतें**' व सांवळ्यांच्या पातीस '**चुट्टी**' म्हणतात. वाळलेल्या चुट्या एकत्र बांधून रात्रींच्या वेळीं त्यांचा मशालींप्रमाणें उजेडासाठीं उपयोग करण्यांत येतो, त्या '**चुड्या.**'

## ज

**जागर**—रात्रीं जागून पार पाडण्याचे धार्मिक स्वरूपाचे किंवा इतर करमणुकीचे गायनसमारंभ. हल्लीं गोव्यांत खालच्या जातींमध्येंच तेवढे हे जागर केले जातात.

**जुवीज**—(पो.) [इं. Judge] न्यायाधीश.

**जेजू, झेजू**—(पा.) येशू.

**जात**—[घुमट, पाहा.]

**जोरगत**—शुद्ध पक्षांत एकादशीपासून पौर्णिमेपर्यंत समुद्राचें पाणी एकसारखें वाढत असतें व वद्य प्रतिपदेपासून तें उतरत जाऊन

नेहमींच्या स्थितीला येतें. या चढउताराला ही संज्ञा आहे. गोव्यांत सर्वत्र पसरलेल्या नद्यांमुळें वाहतुकीचा जो बराचसा व्यवहार होड्यांच्या द्वारें करण्यांत येतो, तो या जोरगतीवर अवलंबून असतो.

**ज्युदिसियाल**—( पो. ) [ इं. Judicial ] न्यायखात्यासंबंधींचा.

## झ

**झिलगा, झिल**—मुलगा. हा शब्द कुडवाळयांमध्यें वापरतात.

**झेजू**—( पो. ) येशू.

**झ्यँतीय**—( पो. ) [इं. gentile ] ख्रिस्तेतर. गोव्यामध्यें हा शब्द ख्रिस्ती लोकांकडून हिंदूंना उद्देशून वापरण्यांत येतो, व त्यांत तुच्छतेची छटा असते.

## त

**तड**—थड. **अलतड**—ऐलथड. **पलतड**—पैलथड.

**तरंग**—गोव्यांतील कित्येक भागांत कांहीं विवक्षित धार्मिक समारंभांच्या प्रसंगीं देवळांमधून वापरलें जाणारें हें एक उपकरण. हें मुसळाच्या आकाराचें व लांकडाचें केलेलें असतें. याची उंची साधारणतः दहा फूट व व्यास मुसळाहून किंचित् जास्ती असून याच्या बुडाला भोंवऱ्याप्रमाणें एक निमुळता खिळा व शेंड्यावर रुप्याचा हात बसवलेला असतो. मधल्या सबंध लांकडी भागावर दशावताराचीं व इतर पौराणिक चित्रें रंगवलेलीं असतात. रवळनाथाचें तरंग, भैरवाचें तरंग अशीं निरनिराळया देवतांवरून यांना नांवें दिलेलीं आहेत. दसऱ्यासारख्या कांहीं विशिष्ट सणाच्या दिवशीं या तरंगाच्या शेंड्याच्या बाजूला पन्नास पंचावन लुगडीं नेसवून कांहीं इसम तीं हातीं घेतात व नाचवतात व नंतर त्या इसमांवर अवसर येतो. हीं तरंग घेण्याचा मान गांवांतील राऊळ,

सुनार, गुरव इ. कांहीं जातींतील ठराविक कुटुंबांकडे वंशपरंपरा चालत आलेला आहे.

**तार**—तरी, उतार.

## थ

**थारवणें**—स्थिरावणें.

## द

**दवरणें**—गोव्यांत डोक्यावरून ओझें वाहाणाऱ्या प्रवाशांच्या उपयोगासाठीं निर्जन भागांतील सडकांच्या बाजूला टप्प्याटप्प्यावर चार-पांच फूट उंचीचे दगडी चबुतरे बांधलेले असतात. त्यांवर थकलेल्या एकाकी प्रवाशांना दुसऱ्या मनुष्याच्या सहाय्याशिवाय आपलीं ओझीं उतरवतां येतात. दवरणें हा ठेवणें या क्रियापदाचा कोंकणी पर्याय. पण अशा या चबुतऱ्यांचा उल्लेख करण्यासाठीं नामाप्रमाणें या शब्दाचा उपयोग करतात.

**दांस**—( पो. ) [ इं० Dance ] युरोपियन पद्धतीचा स्त्रीपुरुषांचा एकत्र नाच किंवा अशा नाचाचा समारंभ.

**दुभाव**—संशय, दुजाभाव.

**देमांद**—( पो. ) कोर्टांतील दावा व तदनुषंगिक एकंदर व्यवहार, यांचा या शब्दानें बोध होतो. हा पोर्तुगीज शब्द कोंकणी बोलीमध्यें इतक्या आपुलकीनें वावरतो, कीं गोव्यांत कांहीं वर्षांमागें निघत असलेल्या 'स्वयंसेवक' मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या एका सुप्रसिद्ध खंडकाव्याचें नांवच 'देमांदमाहात्म्य' हें होतें.

**देलेगाद**—( पो० ) [ इ० Delegate ] 'देलेगाद-द रेपुब्लिक' ( रिपब्लिक सरकारचा न्यायखात्यावरील प्रतिनिधी म्हणजेच सरकारी वकील ), 'देलेगाद-द-साऊद' ( आरोग्य खात्यावरील प्रतिनिधी ) 'देलेगाद लोकाल' ( शाळाखात्याचा प्रतिनिधी )

अशीं कांहीं सरकारी अधिकाऱ्यांचीं पोर्तुगीजमध्यें नांवें ठरलेलीं असून सर्वसाधारण बोलीमध्यें नुसत्या ' देलेगाद ' या शब्दानेंच त्या सर्वांचा उल्लेख करण्यांत येतो. तरी पण 'देलेगाद' म्हटला कीं, ज्याचा अधिकार व संबंध वारंवार व विशेषेकरून लोकांना जाणवणारा असतो, तो सरकारी वकील, असाच अर्थ बहुधा गृहीत धरण्याचा प्रघात पडला आहे.

**देवपण**—देवकर्म, देवजकी. ब्राह्मण पुजाऱ्याच्या मध्यस्थीशिवाय व शास्त्रोक्त संस्कृत मंत्रांशिवाय कुडवाळी लोक आपल्या रूढ बोलीं-तील प्रार्थनांच्या वगैरे द्वारें एक विशिष्ट स्वरूपाचें देवकार्य कर-तात, त्यासच गोव्यांत ही संज्ञा लावण्यांत येते.

**देस्सेदेंत**—( पो. ) [ इं० Descendant ] वंशज. पोर्तुगीज व देशी ख्रिस्ती यांच्यामधील मिश्रविवाहापासून निर्माण झालेल्या गोव्यांतील युरेजियन वर्गास 'पोर्तुगीजांचे वंशज' या अर्थानें हें नांव मिळालें आहे.

**दो०** }
**दोतोर** } ( पो. ) [ इं० Doctor ] गोव्यांत ' दोतोर ' हें उपपद केवळ पाश्चात्यवैद्यकशास्त्र्याच्या नांवांमागें तेवढेंच लावण्यांत येत नसून तें वकील, ब्यारिष्टर यांना उद्देशूनही वापरतात. अर्थात् या ब्यारिष्टर, वकील, डॉक्टर वर्गाचा रुबाब व ऐट ज्याच्यामध्यें दिसेल अशा कोणाही व्यक्तीशीं बोलतांना खेडवळ लोकांकडून बहुमा-नाच्या अर्थानें या शब्दाचा उपयोग केला जातो.

**दो. आल्मैद, मानुयेल–द्–आर्रेयाग**—रिपब्लिकन चळवळ सुरू करून १९१० सालची राज्यक्रांती घडवून आणण्याऱ्या पोर्तुगाल-मधील लोकपक्षाचा **दो० आल्मैद** हा एक प्रमुख पुढारी. **मानु–येल–द्–आर्रेयाग** यास पोर्तुगीज रिपब्लिकचा पहिला अध्यक्ष निवडण्यांत आलें होतें.

**दों**—( पो. ) राजकुलोत्पन्न व सरदार घराण्यांतील व्यक्तींच्या नांवां-मागें पोर्तुगीजमध्यें लावण्यांत येणारें हें सन्मानदर्शक उपपद. **'दोना'** हें या शब्दाचें स्त्रीलिंगी रूप.

**दों. आफोंसु-द-यें-हीक**—[ औरिक, पाहा. ]

**दों. कार्लुश्** } ( पो. ) १८८२ पासून १९०८ पर्यंत दों॰
**दों. मानुयेल** } कार्लुश् हा राजा पोर्तुगालच्या गादीवर होता. याच्या कारकीर्दींत पोर्तुगीज जनतेमध्यें राजकीय असंतोषाची वाढ व त्याबरोबरच रिपब्लिकन चळवळ यांस सुरवात होऊन त्याचें पर्यवसान लोकपक्षांतील दोघां इसमांकडून १९०८ सालीं या राजाचा खून करण्यांत झालें. नंतर याचा मुलगा दों. मानुयेल हा गादीवर आला. पण १९१० सालीं क्रांतिकारकांनीं उठाव करून राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतल्यामुळें त्यालाही राज्यत्याग करून इंग्लंडला पळून जाणें भाग पडलें.

## न

**नासियोनालिश्त**—( पो. ) [ इं. Nationalist ] राष्ट्रीय बाण्याची व्यक्ती.

**नेव्होंझ**—( पो. ) [ इं. Nervous ] घाबरा.

**नेणतेपणा**—अज्ञानदशा. अज्ञानदशा ज्या वयांत असते, तें वय या अर्थानें बहुधा हा शब्द वापरतात.

## प

**पणजी**—मांडवी नदीच्या मुखाशीं असलेलें गोवाप्रांताच्या राजधानीचें शहर.

**पनेळ**—एका माणसाला वल्हवून नेतां येईल, एवढी लहान चिंचोळ्या आकाराची होडी. एखाद्या वृक्षाचा सबंध बुंधा खोदून हा पनेळ तयार केलेला असतो.

**पाकेत**—( पो. ) डांक आगबोटीची फेरी.

**पाच्छा**—पादशाहा. पोर्तुगालच्या राजांना उद्देशून हा शब्द गोव्यांत वापरण्यांत येई.

**पाड**—पडीत. '**पाड पडो**' हा वाक्प्रचार 'तळपट होवो' या अर्थानें रूढ आहे.

**पाडा**—फळें पाडण्याची पाळी. नारळींच्या बाबतींत हा शब्द प्रचारांत असून गोव्यांत नारळींचा प्रत्येक पाडा बहुधा दर तीन महिन्यांनीं येत असतो.

**पाद्री पडला बोवाळांत, इगर्ज लुटली गेला**—एखाद्या गोष्टीची ज्यांनीं विशेष काळजी घेणें भाग आहे, त्यांचेंच त्याकडे दुर्लक्ष झाल्यामुळें त्या गोष्टीचें झालेलें नुकसान, या अर्थानें ही कोंकणी म्हण वापरतात. **बोवाळ**—गोंधळ.

**इगर्ज**—चर्च.

**पाखला**—पोर्तुगीज सोजीर.

**पेगू**—गोव्यांतील जुगाऱ्यांच्या एका प्रख्यात म्होरक्याचें हें नांव.

**पाप**—( पो. ) पोप.

**पापा**—( पो. ) बाबा.

**पालासियु**—( पो. ) [ इं. Palace ] राजवाडा.

**पेर्दांव**—( पो. ) [ इं. Pardon ] क्षमा, क्षमा करणें.

**पोर्तु**—( पो. ) द्राक्षांच्या दारूचो एक उंची जात. पोर्तु नांवाच्या पोर्तुगालमधील एका प्रॉव्हिन्समध्यें ही तयार होत असल्यामुळें तेंच नांव या दारूला देण्यांत आलें आहे.

**पोळा**—आदले दिवशीं पाण्यांत भिजत ठेवून वांटलेल्या तांदळांच्या पिठाची पोळी.

**प्रोप्रियोतार्यु**—( पो. ) [ इं. Proprietor ] या शब्दाचा अर्थ 'मालक,' एवढाच असला, तरी 'जमिनाचा मालक, जमीनदार' या अर्थानें हा शब्द प्रचारात आहे.

**प्रोसेसक्रीम**—( पो. ) [ इं. Ciminal process ] फौजदारी खटला.

## फ

**फिदाल्ग**—( पो. ) या शब्दानें एखाद्याचा उदार व दिलदार स्वभाव सुचवला जातो. उच्च कुलीन व खानदानी घराण्यांतील व्यक्ति अशा स्वभावाच्या असतात, या समजुतीनें या वर्गातील लोकांचा बोध होण्यासाठींच आतां हा शब्द वापरतात.

**फिरंगी**—( क्रिस्तांव, पाहा. )

**फिलोझोफी**—( पो. ) [ इं. Philosophy ] तत्वज्ञान.

**फेणी**—माडाची दारू.

**फेश्त**—ख्रिस्ती सण.

**फेलिसितार**—( पो. ) [ इं. Felicitate ] अभिनंदन करणें.

**फोडणीशी**—फोड.

**फोर्से**—( पो. ) सैन्य.

## ब

**बाब**—'पंत,' 'राव' या अर्थानें किंवा बंगाली 'बाबू' या शब्दाप्रमाणें कोंकणींत हा शब्द वापरतात.

**बंदे**—गोव्यांत व सावंतवाडी वेंगुर्लें वगैरे आसपासच्या टापूंत 'बंदे' या नांवानें ओळखला जाणारा एक विशिष्ट वर्ग हिंदुसमाजामध्यें दिसून येतो. या वर्गांतील स्त्रियांना '**कुळंबिणी**' म्हणतात, पण 'कुळंबी' ही संज्ञा ज्या शेतकरी वर्गाला सर्वसाधारणपणें लावण्यांत येते, त्यांहून हे 'बंदे' व 'कुळंबिणी' अगदींच भिन्न आहेत. या

वर्गाच्या पूर्वेतिहासासंबंधीं कोणतीच विश्वसनीय माहिती उपलब्ध नाहीं. कांहीं वतनदार व खानदानीच्या कुटुंबांत हे बंदे व कुळं-बिणी वंशपरंपरा आपुलकीच्या भावनेनें राबत आलेले आहेत. बंदे बहुधा धन्याच्या तैनातींतील व त्याच्या शेतीचीं वगैरे कावाड-कष्टाचीं कामें करतात व घरांतील मोलकरणीचीं कामें कुळंबिणीकडे सोंपविलेलीं असतात. याबद्दल त्यांपैकीं प्रत्येकास त्यांच्या उदर-निर्वाहार्थ धन्याचे घरांतून रोज 'शेर' (एका माणसास एका दिवसास पुरेल एवढी अन्नसामुग्री) मिळत असतो. मात्र कुळंबि-णींपैकीं एखादी मुलगी वयांत आली, म्हणजे तिचा 'शेर' बंद होतो. कारण या कुळंबिणींमध्यें वंशपरंपरा वेश्यावृत्ति चालत आली असल्यामुळें वयांत आलेली मुलगी मिळवती झाली, असें गृहीत धरण्यात येतें. तिचा तारुण्याचा भर गेल्यावर पुनः धन्याच्या घरीं मोलमजुरीवर ती रुजू होतांच तिचा तो 'शेर' पुनः सुरू होतो. जुन्या काळीं गर्भश्रीमंत घराण्यांतील इसमांची खानदानीचें लक्षण म्हणून रखेल्या बाळगण्याकडे जी प्रवृत्ती होती, तीस अनुसरून ठेवल्या गेलेल्या व धन्याशीं निष्ठेनें राहणाऱ्या रखेल्यांपासून जी संतती झाली, त्यापासून हा वर्ग अस्तित्वांत आला असावा, असें या कुळंबिणींमध्यें चालू असलेल्या वेश्यावृत्तीवरून दिसून येतें. आतां त्यांचा संबंध धन्याशीं असतोच असें नसून, तो कोणाशींही असूं शकतो. शिवाय इतर कलावंतिणी, भाविणी वगैरे वर्गांतील स्त्रियां-प्रमाणें अनन्यगतिकत्वानें वेश्यावृत्तीच स्वीकारण्याची यांच्यांत रूढी नाहीं. लग्न करून घेऊन कुटुंबव्यवस्था पाळण्याचा प्रघातही यांच्यामध्यें जुन्या काळापासून चालत आलेला आहे. कावाडकष्ट करण्याची अंगवळणीं पडलेली संवय व तद्वारें उपजीविका कर-ण्याची शक्यता हें त्याचें कारण असावें. अशा प्रकारच्या सेवावृत्तीनें

या बंद्यांचा व कुणबिणींचा वर्ग कांहीं वतनदार घराण्यांशीं कायमचा बांधला गेलेला असला व त्यांच्या पोषणाची ज़बाबदारीही त्यांच्या धन्यांवर कायमची पडलेली असली, तरी हा परस्परसंबंध उभय-पक्षीं केवळ नैतिक स्वरूपाचाच असून आपुलकीच्या भावनेनेंच तो इतका दीर्घकाळ टिकून राहिला आहे, ही गोष्ट या बाबतींत कायद्याचें कोणतेंही बंधन अस्तित्वांत नाहीं, यावरून स्पष्ट होते. मर्जीस येईल तेव्हां या बंद्यांस व कुळंबिणींस ही सेवावृत्ती सोडून देण्यास, त्याचप्रमाणें त्यांच्या धन्यांस त्यांच्या पोषणाची जबाब-दारी नाकारण्यास मोकळीक आहे. अशा प्रकारचीं उदाहरणेंही जुन्या काळीं क्वचित व वतनदार घराण्यांची सध्याची खालावलेली आर्थिक स्थिती व स्वतंत्र आयुष्क्रमाकडे बंद्यांची होत असलेली वाढती प्रवृत्ती, यांमुळें अलीकडे बरींचशीं घडलेलीं दिसून येतात.

**बरेंपण**—कल्याण.

**बरें मागणें**—एखाद्याचें कल्याण करण्याबद्दल ईश्वराला प्रार्थिणें.

**बलाय**—पीडा.

**बल्कांव**—( पो. ) [ इं. Balcony ] ओटा. मात्र या बल्कांवांची रचना गोवाप्रांताबाहेर दिसणाऱ्या घरांच्या ओट्यांप्रमाणें लहान व साधी नसते. बाहेरील जमिनीपासून तीन चार फुटांच्या उंची-वरील दहाबारा फूट लांबीरुंदीची जागा यानें व्यापलेली असून दोन प्रशस्त सोपे, त्याच्या जोडीला दोन चार खुर्च्यांच्या आका-राचीं आसनें, अशी याची दगडी बांधणी व त्यावर गुळगुळीत सिमेंट केलेलें असतें व पंधरावीस मंडळीस आराम बसतां येईल, एवढी ऐसपैस जागा या बल्कांवांवर असूं शकते. गोव्यांतील हा स्थापत्यविशेष म्हणजे येथील लोकांमध्यें मुरलेल्या सुखासीनतेच्या संवयीचें एक बाह्य चिन्हच म्हणतां येईल.

**बारदेश**—गोव्यांतला एक महाल.

**बिब्ल्योतेक नासियोनाल**—( पो. ) गोव्यामध्यें पणजी शहरांत असलेल्या सरकारी ग्रंथसंग्रहालयाचें व वाचनालयाचें हें नांव.

**बिब्ल्योतेक**—लायब्ररी.

**बुडती**—पूर.

**बुद्ध**—बुद्धि. **बुद्ध देणें**—सल्लामसलत देणें.

**बोलेती**—( पो. ) गोवासरकारचें गव्हर्नमेंट गॅझेट; '**बोलेतीं ओफस्याल**' या नांवानें निघत असतें, त्याचा लोकांच्या तोंडीं असलेला हा संक्षेप.

## भ

**भरडकुमेर**—डोंगराच्या उतरणीवरील रान तोडून व तेथील जमीन जाळून त्या जागीं नाचणे, पाकड इत्यादि वरकस धान्यें पिकवण्याची अल्पश्रमाची गोव्यांतील डोंगराळ भागांत आढळून येणारी शेतीची पद्धत. सरकारपट्टी न भरतां ही 'भरडकुमेर' करण्याचा सत्तरींतील रयतेचा जुन्या काळापासून चालत आलेला हक्क अलीकडे सरकारनें काढून घेतला आहे.

**भरा**— [ कुडव पाहा. ]

**भरिभार**—हवाला.

**भागेली, मुणकारी**—' जमिनदाराचीं कुळें ' या अर्थानें सामान्यतः हे दोन्ही शब्द वापरले जातात. पण 'भागेला' व 'मुणकारी' यांमधील फरक हा कीं, भागेल्यास शेतजमिनी किंवा बागायतीमळे जमिनदारानें खंडानें दिलेले असतात, तर मुणकाऱ्यांचें काम बागायती मळ्यांमध्यें राहून त्यांची राखण करावी, एवढेंच असतें व त्याबद्दल उत्पन्नाचा कांहीं अंश त्यांस सोडलेला असतो.

**मुण, मुंड**—झाडाचा बुंधा.

**भाट**—नारळींची बाग.

**भाटकार**—भाटांचे मालक, जमीनदार. पण बरेचदां हा शब्द त्यांच्या या वाच्य अर्थानें वापरण्याऐवजीं सन्मानदर्शक संबोधन म्हणून वापरतात.

**भावार्थ**—भाव, श्रद्धा.

**भिरें**—पक्ष्यांचा कळप.

**भोगोसण**—भक्षण करणें, (अपराध) पोटांत घालणें.

**भौंवडी**—रान घेरणें, रान उठवणें, सावजांची टेहेळणी करणें व शेवटीं त्यांची पारध करणें, अशा या शिकार हातीं येईपर्यंत पार पाडण्याच्या ज्या निरनिराळया कृतीं शिकारीमंडळीतील वेगवेगळे कंपू आपसांत वांटून घेतात त्या सर्वांचा सूचक असो ही संज्ञा आहे.

**भौंवार**—गोव्यांत नद्यांच्या लगत राहाणारा शुभ्र पांढऱ्या रंगाचा एक पक्षी.

## म

**मथरावणी**—प्रस्थानसमयीं एखाद्या व्यक्तीच्या रेंगाळणें, थबकणें, परत फिरणें, अशा ज्या निरनिराळया दिरंगाईच्या हालचाली बरोबर जाणाऱ्या इतर मंडळीस ताटकळत ठेवण्यास कारण होतात, त्यांचा या शब्दानें बोध होतो.

**मनजात**—मोनी किंवा मुकी जात. पाळींव जनावरांना उद्देशून कोंकणीत हा शब्द वापरतात. मनोगत व्यक्त करण्यास समर्थ नसल्यामुळें आलेली अशा जनावराची अनुकंपनीयता, त्याचप्रमाणें त्यांची अजाणता हीं सुचवण्यासाठीं कळवळयाच्या भावनेनें त्याना हें विशेषण लावण्यांत येतें.

**ममम**—पूर्व आफ्रिकेंतला पोर्तुगीज कॉलनीमधलें मुख्य ठाणें मोझांबिक, त्याचा असा हा संक्षेप गोव्यांत रूढ आहे. पोर्तुगीज सरकार-

करून काळया पाण्याची शिक्षा झालेल्या गुन्हेगारांना पाठवण्याची जागा व गोव्यांतील क्रिस्तांवांचें नोकरी, व्यापार व इतर व्यवसायांच्या द्वारें पैसे कमावण्याचें एक महत्वाचें स्थान म्हणून या शहराचें नांव गोव्यांतील लोकांस जुन्या काळापासून परिचित असल्यामुळें 'मसम' हा एक येथें घरगुती शब्द होऊन बसला आहे.

**माचील**—एक प्रकारचा मेणा. गरिबांचें ज्याप्रमाणें बैलगाडया, त्याचप्रमाणें गोव्यांतील श्रीमंतांचें मागील कांहीं वर्षांपर्यंत माचिल हें सर्वसामान्य वाहन असे. हीं माचिलें ज्याच्या त्याच्या मालकीचीं असत व जमीनदार लोक जादा मुशाहिरा देऊन आपल्या कुळांनाच जरुरीच्या वेळीं भोयांचें काम करावयाला लावीत. गेल्या दहा-पंधरा वर्षांपासून वाढत्या प्रमाणांत होऊं लागलेल्या मोटारींच्या आयातीमुळें गोव्यांत माचिलें आतां क्वचितच पाहाण्यांत येतात.

**मानस**—[ खाजन, पाहा. ]

**मार**—गोव्यामध्यें खेड्यापाड्यांतून मोठमोठ्या वाडयांच्या भिंती, दरवाजे किंवा माड्यांच्या तक्तपोशा यांस बंदुकीच्या गोळया जाऊं शकतील, एवढया आकाराचीं आरपार भोंकें ठेवलेलीं असतात, त्यास हें नांव आहे. चोर दरवडेखोरांचा हल्ला झाल्यास आत्मसंरक्षणासाठीं घरांतल्या मंडळीस आंतून गोळया झाडण्यास यांचा उपयोग होतो. बाहेरच्या माणसांनीं या भोंकातून आंत गोळया सोडल्यास त्या घरांतल्या माणसांस लागूं नयेत, पण आतून सोडलेल्या गोळया बाहेरच्या इसमांस लागाव्या, अशी या मारांची तिरपी रचना असते.

**मारीय**—( पो० ) ख्रिस्तमाता मेरी.

**मिलितारीय**—( पो० ) मिलिटरी.

**'मिष्टर'**—मिस्टर. गोव्यांतील लोकांस इंग्रजी भाषा अगदींच अपरिचित. अर्थात् सर्वसाधारण उपयोगाचे जे कित्येक इंग्रजी शब्द येथील लोकांच्या ओझरते कानांवरून जातात, ते अशा प्रकारचें हें चमत्कारिक उच्चारांतर पावून येथील बोलींत वापरलेले कधींमधीं आढळून येतात.

**मीस**—( पो० ) [ इं. Mass ] चर्चमधली उपासना.

**मुड्डोशी**—[ खरचाणी, पाहा. ]

**मुणकारी**—[ भागेली, पाहा. ]

**मुरगांव**—गोव्याबाहेरील लोकांस 'मार्मागोवा' या नांवानें माहित असलेल्या बंदराचें हें नांव. हिंदुस्थानांतील पहिल्या प्रतीच्या बंदरांत याची गणना होते.

**मेत्रोपोलि**—( पो० ) [ इं. Metropolis] मातृनगर, राजधानी. पोर्तुगीजमध्यें लिस्बन शहराला उद्देशून हा शब्द वापरतात.

**मेरु**—हरणाची एक जात.

**मैंडोळें**—केळयांच्या एका उंची जातीचें हें नांव. गोव्यांतील मैंडें नांवाच्या गांवीं याची लागवड होत असल्यामुळें त्यावरून हें नांव प्रचारांत आलें आहे. हीं केळीं इतर सर्व साधारण केळयांहून आकारानें बरींच मोठीं व जास्ती रुचकर असतात व रुपयाला डझन अशा महाग भावानें विकलीं जातात.

## य

**येलेमेंतार, कॉम्प्लेमेंतार**—(पो.) [ इं. Elementary, Complimentary ] पोर्तुगीज प्राथमिक शिक्षणक्रमाचे दोन भाग केलेले असतात, त्यांचीं हीं नांवें.

## र

**राखणा**—गुरें, मेंढरें, शेळया यांना वळवणारा या अर्थाचा, 'गुराखी' या मराठी शब्दाहून जास्ती समर्पक असा हा कोंकणी शब्द आहे.

**रांच**—( पो. ) सैन्यांतील सर्व शिपायांनीं एकत्र जेवण घेण्याची पद्धत.

**रान काढणें**—रान उठवणें.

**राणे**—गोव्यांतील कांहीं वतनदार मराठा घराण्याचें हें उपनांव गेल्या दोन शतकांतील गोव्याच्या इतिहासाशीं कायमचें निगडित झालेलें आहे. दाट जगलांनीं व डोंगराळ भागानें व्यापलेला व वाडीसंस्थानाला लागून असलेला गोव्यांतला सत्तर महाल, हें यांचें स्थान. बऱ्याच शतकांमागे राजपुतान्यांतून दक्षिणेंत आलेला सत्रोजी राणे नांवाचा कोणी क्षत्रिय यांचा मूळपुरुष असल्याचें व त्यानें या भागांतील तत्कालीन रानटी रहिवाशांपासून हा महाल जिंकून येथें वसाहत केल्याचें जुन्या आख्यायिका सांगतात. ऐतिहासिक काळांत नजर फेकतां दिल्ली व विजापूर येथील बादशाहा, कोल्हापुरकर, वाडीचे सांवत, कुडाळचे देशमुख इ० सत्ताधाऱ्यांच्या वेगवेगळया काळीं झालेल्या हिसकाहिसकीत प्रसंग येईल त्याप्रमाणें त्यांपैकीं एक ना दुसऱ्याचें नांवाचें वर्चस्व मान्य करून पाळेगारांच्या पेशानें या महालावर यांनीं आपली मालकी कायम ठेवली होती, असें दिसून येतें. १७४० त वाडीसंस्थानचे सांखळी, डिचोली व सत्तर हे महाल पोर्तुगीजांनीं काबिज केल्यावेळीं वाडीसरकाराकडून मिळालेले सर्व हक्क पूर्ववत चालवण्यांत यावे, या करारावर या राण्यांनीं गोवासरकारची सत्ता मान्य केली. पुढें हळुहळू यांचे हे हक्क पोर्तुगीजसरकाराकडून संपुष्टांत आणले गेले. त्याविरुद्ध या राण्यांनीं व त्यांच्या हुकमतीखालील सत्तरींतील कुडवाळी रयतेनें वेळोवेळ केलेला सशस्त्र प्रतिकार हा अनेक पिढया गोव्यांत घरो-

घर दगारा, अभिमान व कौतुक यांचा एक विषय होऊन बसला आहे. विशेषतः १८५१ सालचें दिपाराण्याचें बंड, त्यानंतरचें १८७१ सालचें कुष्ठोबाचें बंड, १८९५ सालचें दादा राण्याचें बंड व अगदीं अलीकडचें १९१२ सालीं झालेलें बंड, यासंबंधींच्या आठवणी लोकांमध्यें अजून ताज्या आहेत. स्वतःच्या व आपल्या आश्रयाखालील सत्तर महालांतील रयतेच्या विशिष्ट हक्कांच्या रक्षणासाठीं यांच्याकडून हीं बंडें उभारलीं गेलीं असलीं, तरी एका काळीं ख्रिस्ती सरकारच्या धार्मिक दडपणातून गोव्यांतील सर्व हिंदु प्रजेची कांहीं अंशीं मुक्तता करण्यासही यांचें हें शस्त्रधारण कारण झालें आहे. सत्तरींतील हीं बंडें 'राण्यांचीं बंडें' या नांवानें प्रसिद्ध असली, तरी त्यांत देसाई, सावंत, इ० त्या महालांतील इतर मराठा वतनदारही पुढाकार घेत. एकंदरींत ब्रिटिश हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील भागांत वायव्यसरहद्दीवर जें स्थान, तेंच या सत्तरी महालास, तेथील राणे व रयत यांचा लढाऊ पणा व त्यांच्यामध्यें आढळून येणारा स्वाभिमान व कडवेपणा यामुळें मिळालेलें आहे, निदान १९१२ सालच्या शेवटच्या अपेशी बंडापर्यंत तरी तशी स्थिती होती.

## ल

लाव्हाईज्य—[ आंतिफोन, पाहा. ]

लिसेव—(पो.) गोव्यांतील पोर्तुगीज कॉलेज.

लुझितानु, लुझीयदश्, लूझो, लुझोफोबिया—(पो.) 'लूझुश्' हें पोर्तुगालच्या मूळ पुरुषाचें नांव असें मानण्यांत येतें. त्यावरून लुझितानु (लुझितानिया देशांतला रहिवासी) लुझीयदश् (लूझोच्या वंशजांचीं कृत्यें) लुझोफोबिया (लूझोवंशीयांचा द्वेष) इ० शब्द बनले आहेत.

**लुवणी**—कापणी.

## व

**वरंडा**—कोणत्याही उच्च कार्यासाठीं देह गमावणाऱ्या एखाद्या थोर पुरुषास मृत्यू आलेल्या जागीं, तेथून येणाऱ्या जाणाऱ्या वाटसरूंपैकीं प्रत्येकानें आपल्या पूज्यबुद्धीचें चिन्ह म्हणून टाकलेल्या दगडांच्या ढिगाचें आपोआप तयार झालेलें त्या व्यक्तीचें स्मारक. कर्नाटकांत अशाच प्रकारच्या मृतवीरांसंबंधींच्या वर चित्रें कोरलेल्या शिळा ठिकठिकाणीं आढळतात, व त्यांस '**वीरकल्लु**' 'वीराचा दगड' असें नांव आहे, त्यावरून हा शब्द आला असावा.

**वशाड**—ओसाड.

**वांयगण**—खरिपाचें पीक.

**वेळ**—समुद्रकिनारा.

**व्हाल्सा**—( पो. ) रोमँटिक वृत्तीच्या स्त्रीपुरुषांचा विशेष आवडता असा एक पाश्चात्य नृत्यप्रकार.

**व्हिगार**—( पो. ) [ इं० Vicar ] चर्चवर नियंत्रण ठेवणारा मुख्य पाद्री.

**व्हिसिरै**—( पो. ) व्हाइसराय.

## श

**शंत**—केळीच्या सुकलेल्या पानाचा तुकडा. याचा उपयोग जुन्या पिढींतील लोक विड्या करण्याकडे करतात.

**शिककार**—शिंकेचा वेळप्रसंग पाहून तिचें शुभाशुभ सांगणें, ही गोव्यांतील खेडवळ वर्गामध्यें एक उपयुक्त विद्या मानली जाते. त्यांत पारंगत असलेल्यांस या शब्दानें संबोधतात.

**शेंस**—( कलावंतीण, पाहा )

## स

**सडा**—डोंगरपठार.

**सत्तर**—गोव्यांतील एक महाल.

**सनदी शिपाई**—पोर्तुगीजसरकारकडून वंशपरंपरा शिपाईगिरीची सनद मिळालेल्या लोकांच्या दोन पलटणी सत्तर व पेडणें या महालांमध्यें आहेत. या पलटणींतील शिपायापासून कॅप्टनपर्यंतचे सर्व हुद्दे वंशपरंपरा कांहीं ठरींव कुटुंबामध्यें चालत आलेले असून त्याबद्दल त्यांस सरकारकडून अल्प वेतनही मिळत असतें. मात्र सैन्यांतील इतर सर्वसाधारण पलटणींप्रमाणें नियमितपणें व कायम रीत्या सरकारी नोकरींत राहाण्याचें त्यांच्यावर बंधन नाहीं. परचक्र, बंड अशा कांहीं विशेष प्रसंगीं तेवढें सरकारचा हुकूम येतांच त्यांस सैन्यांत हजर व्हावें लागतें. या दोन पलटणींपैकीं सत्तरींतल्या पलटणीच्या कॅप्टनचा हुद्दा मावळींगकर देसायांच्या व पेडणें महालांतील पलटणीचा बंदिरकर देसायांच्या घराण्याकडे चालत आलेला आहे. मध्यंतरीं १८९५च्या सुमारास पेडण्याच्या पलटणीचा कॅप्टनचा अधिकार बंदिरकर देसायांकडून काढून जुंव्यांवरील राणे घराण्याकडे दिलेला होता. सत्तर महालांतील राणे व इतर रयत यांच्या शिरजोरपणास आळा घालणें सोपें जावें म्हणून त्यांच्यापैकींच कांहीं-जणांस या सनदेच्या द्वारें आपल्या कह्यांत ठेवण्याच्या पोर्तुगीज सरकारच्या धोरणामुळें या सनदी शिपायांच्या पलटणी जुन्या-काळीं अस्तित्वांत आल्या असाव्यात.

**सभागी**—या शब्दाचा वाच्यार्थ ‘ भाग्यवान् ’ असा असला, तरी एखाद्याची कानउघाडणी व कींव हीं दोन्ही एकाच वेळीं करायचीं असल्यास ‘ अभागी ’ या गर्भितार्थानें हा वापरला जातो. अशुभ

मानले गेलेले शब्द वापरण्याचा ज्या ज्या वेळीं प्रसंग येतो, त्या त्या वेळीं अभद्र वाणी तोंडांतून येऊं देऊं नये, अशा भावनेनें ते टाळण्याचा लोकाचार चालत आल्यामुळें, ज्यांचा गर्भितार्थ एक पण वाच्यार्थ अगदीं उलट अशा स्वरूपाचे कांहीं वाक्प्रचार कोंकणींत रूढ झालेले आहेत, त्यांपैकीं हा एक आहे. **'हळद लागो'** हें अशा प्रकारचें दुसरें उदाहरण. वास्तविक 'आग लागो' या अर्थानें हे शब्द वापरतात. पण विवाहविधींतील 'हळद लावण्या'-च्या शुभ विधीसंबंधींच्या या शब्दांचा वरकरणी उपयोग करून खरा आशय व्यक्त केला जातो.

**साग्वाद्**—( पो० ) भेट, नजर. 'स्वागत' या संस्कृत शब्दावरून 'साग्वाति' असा बदल होऊन 'स्वागत करतांना नजर करण्याची वस्तू' या अर्थानें हा शब्द पोर्तुगीजमध्यें शिरला व पोर्तुगीजच्या द्वारें पुनः कोंकणींत रूढ झाला आहे.

**सां, सांतु**—( पो० ) [ इं० saint ] साधु. **सांता**—साध्वी.

**सान्न**—वाफेवर शिजविलेलें मद्रासी 'इडली' सारखें तांदळाचें केलेलें एक प्रकारचें पक्वान्न. सणांच्या दिवशीं गोव्यांतील ख्रिस्ती लोकांच्या घरीं तयार होणाऱ्या मिष्टान्नांपैकीं हा एक ठराविक प्रकार आहे.

**सायबा भोगोस**—**सायबा**—ईश्वरा. **भोगोस**—( अपराध ) पोटांत घाल. दुसऱ्याच्या हातून एखादी वाईट कृती घडतांना दिसली कीं, 'ईश्वरा, त्याला क्षमा कर!' या अर्थानें हे शब्द वापरतात. मात्र या शब्दांमागें बायबलांतील शिकवणीमुळें तयार झालेली विशिष्ट मनोरचना असल्यामुळें, हे फक्त ख्रिस्ती लोकांच्याच तोंडीं आहेत.

**सायला**—सागवानाचें झाड.

**साल**—( पो० ) घरांतील मंडळीच्या व आल्यागेलेल्यांच्या एकत्र बसण्याउठण्याच्या सोयीसाठीं घराचा राखून ठेवलेला दिवाणखान्या-सारखा भाग. गोव्याबाहेर दिवाणखाना हा मोठ्या घरांनाच तेवढा असूं शकतो, पण गोव्यांत लहानमोठ्या सर्वच घरांस हें साल असतें. त्याचप्रमाणें श्रीमंत लोकांच्या विशेष मोठ्या घरांस एका-हून जास्तीही सालें असतात.

**सार्जेंत**—( पो० ) सार्जंट.

**सार्दिंज्य, सालोमांव**—( पो० ) हीं माशांच्या दोन जातींचीं नांवें. या वाळलेल्या माशांचे डबे पोर्तुगालहून गोव्यांत आयात होतात, व ते विशेष पौष्टिक असतात, अशी लोकांची समजूत आहे.

**साष्टी**—गोव्यांतला एक महाल.

**सिंज्योर**—( पो० ) [ इं० Sir ] महाराज. नम्रपणें एखाद्या बड्या खिस्ती व्यक्तीला संबोधायचें झाल्यास कोंकणीमध्यें या शब्दाचा उपयोग करतात.

**सिव्हिलिझाद्**—( पो. ) [ इं० Civilized ] सुधारलेला.

**सुओरे**—( पो. ) पाश्चात्य पद्धतीचा स्त्रीपुरुषांचा मिश्रनृत्यसमारंभ. पोर्तुगीजच्याद्वारें आलेला हा मूळ फ्रेंच शब्द कोंकणीमध्यें कायमचा समाविष्ट झाला आहे.

**सुकती**—ओहोटी.

**सेंतेंस**—( पो. ) [ इं. Sentence ] न्यायाधीशानें दिलेली शिक्षा.

**सेमिनारी**—( पो. ) खिस्ती उपाध्याय तयार करण्याचें कॉलेज.

**सेर्मांव**—( पो. ) [ इं. Sermon ] पाद्र्याचें प्रवचन.

**सोडण**—नारळाबाहेरचें काथ्याचें आवरण. जळाऊ उपयोगासाठीं गोव्यांत घरोघर यांचा सांठा करून ठेवलेला असतो.

**सोल्दाद्**—( पो. ) [ इं. Soldier ] सैन्यांतला शिपाई. पण 'हिंदु शिपाई' असा याचा गोव्यांत रूढार्थ बनला आहे.

### ह

**हत्ती वाळला म्हणून त्यास गोठ्यांत बांधूं नये**—एखाद्या थोर व्यक्तीला वाईट दिवस येऊन तिचें महत्व कमी झालें, तरी तिला अगदींच कःपदार्थ मानणें योग्य नाहीं, या अर्थाची ही म्हण आहे.

**हळद्लागो**— ( सभागी पाहा )

**हळसाणे**—अळमुंदे. एक रुचकर व मोठ्या आकाराची चंवळीची जात.

---

Marquês de Pombal—सेबास्तियांव–झुजे–द–कार्व्हाल्यु–इ–मेलु, हा अठराव्या शतकांत होऊन गेलेला पोर्तुगालमधील राजकारणी मुत्सद्दी मार्केझ–द–पोंबाल या त्याच्या किताबी नांवानें इतिहासांत प्रसिद्ध आहे. सन १७५० पासून १७७७ पर्यंत हा पोर्तुगालचा मुख्य प्रधान होता. पोर्तुगालच्या सर्वांगीण उन्नतीस कारण झालेली त्याची कारकीर्द हा एक त्या देशाच्या इतिहासाचा महत्वाचा भाग गणला जातो. त्याच्या प्रधानपदाच्या अमदानींत घडलेल्या गोवा प्रांताला उपकारक अशा गोष्टी म्हणजे, राजकारणांत ढवळाढवळ करण्याच्या आरोपावरून एकूण एक झेजुइटांना पोर्तुगीज साम्राज्याबाहेर हद्दपार करण्याचें यानें फर्मान काढल्यामुळें, हिंदु प्रजेचें धार्मिक पारतंत्र्य बऱ्याच प्रमाणांत कमी होण्यास त्याचा अप्रत्यक्षपणें उपयोग झाला व ‘ Reinois ’ ( पोर्तुगाल देशांतील प्रजा ’ ) व ‘ Coloniais ’ ( ‘ पोर्तुगीज कॉलनींतील प्रजा ) यांमध्ये चालत आलेली राजकीय हक्कांसंबंधींची विषमता यानें काढून टाकल्यामुळें गोव्याची राजकीय स्थिती सुधारली, या होत.

Tantum Ergo—( पो. ) ‘ Tantum Ergo Sacramentum ’ ( ‘ शुभसंस्करणाला वंदन करूं या ! ’ )’ या

शब्दांनीं आरंभ होणारें एक लॅटिन स्तोत्र. हें चर्चमधील उपासनेच्या वेळीं ऑफ़िशियाच्या विधीनंतर गायलें जातें.

Te Deum'—( पो. ) 'Te Deum Laudamus' (ईश्वरा, तुझें आम्ही स्तवन करतों !') या शब्दांनीं आरंभ होणारें हें लॅटिन स्तोत्र ईश्वराचे आभार मानण्यासाठीं चर्चमध्यें करण्यांत येणाऱ्या धार्मिक समारंभाचे प्रसंगीं गायलें जातें.

---

# प्रस्तावना

—०—

वाङ्मयक्षेत्रांत अलीकडे लघुकथा या वाङ्मयप्रकाराला विशेष महत्वाचें स्थान प्राप्त होऊं लागलें आहे. किंबहुना हलक्या हातानें कोरलेल्या एखाद्या नाजूक घडणीच्या संगमरवरी मूर्तीप्रमाणें लघुकथेला ललित-कलाकृतीचें स्वरूप येत आहे, असें म्हटलें तरी अवास्तव होणार नाहीं. या वाङ्मयशाखेचें स्वरूप सवृत्तांग असल्यामुळें तिची लेखनशैली स्वाभाविकच संक्षोभक व ओजस्वी असते. कलाकाराचें वैशिष्टय तो आपल्या कृतींतून काय वगळतो यावरून दिसून येतें, असें शिलरचें म्हणणें आहे. त्याचाच अनुवाद करून पेटर म्हणतो " वाङ्मयांत खरा कलाकार कोण हें त्याच्या वगळण्याच्या हातोटीवरून ओळखतां येतें. कारण अनावश्यक फालतू गोष्टींचा निरास करणें, हीच खरी कला आहे." यावरून लघुकथा हा एक कसा अत्यंत परिणत वाङ्मयप्रकार आहे, हें स्पष्ट होतें. अनेक दिवसपर्यंत लघुकथा हा विशेष प्रचारांतला आणि लोकांच्या आवडीचा वाङ्मयप्रकार होऊन बसल्यामुळें त्याला बाजार-भाव येऊन ज्याला ' रोमहर्षक ' असें म्हणतां येईल, अशा तऱ्हेचें व नकली लिखाण निर्माण करण्याचा मोह लेखकांना पडूं लागला. प्रत्येक कथालेखकाला सांगण्यांत येई कीं, तो जनतेचा सेवक असून जनतेला रुचतील अशीं असत्यें सांगणें व त्यांचें मनोरंजन करणें एवढेंच त्याचें कर्तव्य आहे.

पण या जुन्या कल्पनेंत हळुहळू बदल होऊन तिची जागा आतां नवीन विचारसरणीनें घेतली आहे. आज लघुकथेला जोमदार व जिवंत प्रवाहाचें स्वरूप आलेलें असून त्यातून मानवी जीवनाचे भोंवरे भिरभिरताना दिसून येतात. एखाद्या लघुकथेत जर घटकसत्त्व नसेल, म्हणजे तिच्यात चैतन्यगर्भ जिवंतपणाचा अभाव असेल, तर तिला आज कांहींच महत्त्व देण्यात येत नाहीं. या 'घटकसत्त्वाचा' मीमांसा करताना आपल्या आधुनिक लघुकथांच्या प्रस्तावनेंत एडवर्ड जे. ओब्रायन म्हणतो कीं, "तें मूलतः अस्तित्वांत नसतें, तर आपल्या प्रत्येक कलानिर्मितीतील योजकतेच्या द्वारें कलाकार तें साध्य करून घेतो. अर्थात एक किंवा अनेक कथाप्रसंग घेऊन लेखक जेव्हां त्यांना आपल्या चोदक व परिणामक्षम कल्पकतेनें सत्यसृष्टींत रूपांतरित करतो, तेव्हांच त्यांना संघटित आकार प्राप्त होतो." म्हणजे कथाप्रसंग आणि घटना यांची निवड करण्यांत दिसून येणारें लेखकाचें कौशल्य हीच लघुकथेची उत्कृष्ट कसोटी आहे.

तसेंच गोष्ट आकर्षक आणि मनोरंजक करण्यासाठीं सुंदर घडण व कलाकुसरीची सफाईदार रचना हीं दोन महत्वाचीं अंगें आहेत. यासाठीं शब्दांची निवड करण्याचें कौशल्य आणि योग्य पार्श्वभूमी उत्पन्न करण्याची कला एवढ्यानेंच भागणार नाहीं. तर त्याच्या जोडीला वाचकांच्या अंतःकरणांतील सवादी तारांना आंदोलन मिळून त्यांनी आपल्या आयुष्यांत अनुभवलेल्या जिव्हाळ्याच्या प्रसंगांना जागृती येईल, अशा प्रकारची कथाप्रसंगाची अकृत्रिमता व जीवनाचें यथार्थ प्रतिबिंब दर्शविणारी सुस्पष्ट अशी पात्राच्या स्वभावाची रेखाटणी यांचीही आवश्यकता आहे.

पाश्चात्य देशांतून लघुकथावाङ्मय परिणतीच्या परमावधीला पोंचलेलें असलें, तरी हिंदुस्थानात अजून तें बाल्यावस्थेतच आहे. अलीक-

डील नवचैतन्याच्या काळांत मात्र साहित्यक्षेत्रांत अनेक स्वतंत्र व मनोवेधक प्रयत्न होत असल्याचें सर्व देशभर आढळून येतें. आपले तरुण लेखक श्री० सुखठणकर यांची ही प्रस्तुत कृतीही अशा प्रयत्नांपैकींच एक आहे. प्रगतीच्या दुर्दमनीय उत्साहामुळें हिंदी जनतेचीं अंतःकरणें सामाजिक दुःखें व अन्याय या बाबतींत अत्यंत हळुवार बनलीं असून त्याचें प्रतिबिंब अशा या नवोन्मेषी वाङ्मयप्रकारांमधून प्रकट होणाऱ्या नमतें न घेण्याच्या उत्कट प्रवृत्तींत व सडेतोड मांडणींत दिसून येतें. आपल्या राष्ट्रीय वैभवाला काळिमा आणणारे हिडिस प्रकार उजेडांत आणण्याच्या दृष्टीनें साहित्यांतील लघुकथा हें निःस्संशय उत्कृष्ट व जोरदार साधन आहे. अशाप्रकारें लघुकथासाधनाचा उपयोग करणाऱ्यांपैकीं श्रीयुत सुखठणकर हे एक बरेच यशस्वी लघुकथालेखक आहेत. ते केवळ 'प्रचारक' लेखक आहेत, असा मात्र कोणालाही आक्षेप घेतां येणार नाहीं. त्यांच्या लिखाणांत कलाप्राचुर्य इतकें आहे कीं, केवळ विशिष्ट प्रागतिक कल्पनांच्या प्रचाराचे ते निर्जीव साधन बनलेले दिसणार नाहीं. त्यांची भूमिका केवळ आत्मसंतुष्टतेसाठींच रसिकांच्या सेवनार्थ रितें होणाऱ्या सौंदर्यकुंभाची आहे. अंतःकरणाची खळबळ शब्दांत व्यक्त करण्यासाठीं त्यांना फार तळमळ लागलेली दिसते. त्यांच्या कृतींत अदूरदर्शी डोळ्यांत भरण्यासारखें नाविन्य आणि टवटवी आहे. नवयुगाच्या एखाद्या सच्च्या पाइकाप्रमाणें त्यांनीं स्वतःसाठीं स्वतंत्र मार्ग पाडला असून एक नूतन ध्येय गांठण्यासाठीं किंबहुना स्वतःसाठीं एक नूतन ध्येय निर्माण करण्यासाठीं धीटपणें तो ते चोखाळीत आहेत.

श्रीयुत सुखठणकर हे गोमंतकीय असल्यामुळें त्यांच्या गोष्टींत साहजिकच त्या सौंदर्यभूमीचें वर्णवैचित्र्य व तेथील जीवन हीं प्रतिबिंबित झालेली दिसून येतात. वनस्पतिसमृद्ध, वनस्वरूप व बहुतेक

ग्रामीय असा हा प्रदेश असल्यामुळें तद्देशीय प्रसंगांवर आधारलेल्या या लघुकथांना एक प्रकारचा नैसर्गिक साधेपणा व मनोरम सौंदर्य आलेलें आहे. गोमंतकीय लोकांची वृत्ति लहान मुलांप्रमाणें साधी व सरळ असते व त्यांचा परस्परांवर दृढ व गाढ विश्वास असतो. थोड्या दिवसांपूर्वींपर्यंत त्या प्रांतांत चोरीचा गुन्हा देखील जवळ जवळ अज्ञातच होता. सभोंवारच्या जगांत भयंकर खून, धंदेवाईक दरोडे, अट्टल सोदेगिरीचे प्रकार यांची धामधूम चालू असतां गोमंतकीय आयुष्यक्रम बाहेरील सुधारलेल्या जगांतील या नागवणुकीच्या व्यवहारांचा आपल्यावर बिलकूल परिणाम होऊं न देतां आपल्या परंपरागत मार्गानें निर्वेध व अखंडित चाललेला आहे.

श्रीयुत सुखठणकर यांनीं हें प्रादेशिक वैशिष्टय सफाईदार रीतीनें व यथार्थ स्वरूपांत व्यक्त केलें आहे. गोमंतकीय लोकांच्या तोंडीं असलेल्या वाक्प्रचारांच्या उपयोगामुळें या गोष्टींना विशेष सौंदर्य प्राप्त झालेलें असून त्यामुळें तत्प्रांतीय वातावरणाचा आभास उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं.

‘ ताम्रपट ’ ही गोष्ट साध्या व शुद्ध सौंदर्यानें युक्त असून तिची रचना मोहक आहे व तिच्यांत जीवनाची सळसळ प्रतीत होते. ती वाचतांना कोणालाही चटकन् रशियन लघुकथांची आठवण होईल. हिंदुस्थानांतील नवोदित वाङ्मयावर एका नवीन शक्तीची छाप पडत असून त्यामुळें अशा इष्ट व नवनवीन विशेषांची आपल्या साहित्यांत भर पडूं लागलेली आहे. ‘ ताम्रपट ’ व ‘ वरंडा ’ या दोन्ही गोष्टी भारतीय जीवनक्रमांतील जिव्हाळ्याच्या तारांना आंदोलन देणाऱ्या असून राजकीय व आर्थिक चक्कींतून पिसून निघणाऱ्या जनतेची भीषण वस्तुस्थिति त्यांमध्यें उघड केली असल्यामुळें त्या परिणामकारक व

हृदयस्पर्शी वाटतात. या वर्गांतील अमर्यादा, सहनशीलता व कष्ट सोसण्याची तयारी यांचा सत्ताधाऱ्यांनीं वारंवार अपरिमित फायदा घेतलेला आहे. सत्ता कमावण्याच्या व गाजवण्याच्या या बलिष्ठांच्या आपसांतील जुग्वेबाजीमुळें नाडलीं गेलेलीं हीं भूमातेचीं कष्टाळु लेंकरें अधिकाधिक कष्टतर अवस्थेंत गाडलीं जात आहेत. भारत-मातेच्या या आर्त लेंकरांच्या मनांचे मुके कढ व रात्रींच्या प्रशांत एकांतांत त्यांनीं गाळलेले दुःखाश्रु यांची करुण कहाणी अजून जगाच्या कानांवर गेलेली नाहीं. पण अजून त्यांच्यामध्यें जीवनाची ज्योत जागृत आहे. दुबळेपणाला रुबाब आणणारें, दैन्यावस्थेस स्वाभिमानी बनवणारें, हिडीसपणाचें सौंदर्यात रूपांतर करणारें प्रेरक चैतन्य अजून त्यांच्या ठायीं वास करीत आहे. भारताचा अभिमान व प्रतिष्ठा यांची राखण त्यांजकडूनच होत आहे. त्यांच्या साधेपणांत आणि सरळ वृत्तींत अप्रतिष्ठा व लाज यांना अवसर नाहीं. अपमान सहन करणें त्यांस ठाऊक नाहीं. त्यांचा बालसदृश प्रामाणिकपणा व अभिमान मानवतेविरुद्ध करण्यांत येणाऱ्या अन्यायांविरुद्ध बंड पुकारल्या-वांचून राहात नाहींत. सुशिक्षित लोकांनीं पैदा केलेल्या गुलामी मनो-वृत्तीच्या बिनमोल मिळकतीचा या भूमातेच्या साध्याभोळ्या लेंक-रांना जवळ जवळ स्पर्शही झालेला नाहीं. कारण गुलामगिरी निर्माण करण्यासाठीं तयार करण्यांत आलेल्या शिक्षणपद्धतीच्या संसर्गापासून सुदैवानें ते अलिप्त राहिले आहेत. अशा प्रकारें जुलूम व मानहानी यांविरुद्ध प्रतिक्रिया करण्याची वृत्ती मग ती कितीही अप्रौढ व रांगड्या स्वरूपांत कां व्यक्त झालेली असेना, ' वरंडा ' व ' दुबळी श्रीमंती ' यांमध्यें आपल्याला आढळून येते. त्यांच्यामध्यें स्वाभिमानाचें मूळ किती खोल गेलेलें असतें आणि त्यासाठीं ते केवढाले स्वार्थत्याग करा-याला तयार होतात व उदात्ततेची उच्च पायरी गांठूं शकतात, हें नुक-

त्याच घडलेल्या प्रसंगांवरूनही आपल्याला आज दिसून येत आहे. १९३० मध्यें गुजराथेंत करबंदीची चळवळ चालू असतांना तेथें गेलेल्या एका इंग्रज गृहस्थाला एका शेतकऱ्याच्या झोंपडींत "नामर्दांला गुजराथमध्यें स्थान नाहीं !" हें वाक्य लिहिलेलें पाहून'अचंबा वाटला. त्यानें पुनः पुनः त्याच्या तत्कालीन दुःस्थितीबद्दल प्रश्न विचारले, पण त्याला एकच उत्तर मिळालें, "राष्ट्राच्या इभ्रतीपुढें असल्या हालअपेष्टा म्हणजे कांहींच नव्हत !" इतकेंच नव्हे, तर त्यांचा स्वाभिमान इतका दुर्दम्य असतो, कीं 'वरंडा' गोष्टींतील उद्गारांप्रमाणें, "सर्वभक्षक काळालाही त्यांच्यापुढें मान वांकवावी लागते !"

या संग्रहांतील अग्रकथा मनुष्याच्या अंतःकरणाचा ठाव घेणारी, विचारप्रवर्तक आणि मननीय अशी वठली आहे. गोमंतकांत आधिक्यानें प्रचलित असलेल्या आणि हिंदुस्थानांत इतरत्रही अपरिचित नसलेल्या अघोर सामाजिक अनिष्टाची तिला गुरुकिल्लीच म्हणतां येईल. आज कितीतरी वर्षें समाजसुधारकांची दृष्टी या प्रकाराकडे वेधलेली आहे. या चालीचें मूळ कशांत आहे, हें सुप्रसिद्ध असल्यामुळें त्याची येथें पुनरुक्ति करण्याचें प्रयोजन नाहीं. ग्रीस व रोम सारख्या इतर देशांतही ही चाल एकाकाळीं प्रचलित होती. प्रत्येक ठिकाणीं आरंभीं ही चाल कुमारिकांना देवाच्या सेवेला वाहाण्याच्या धार्मिक बुद्धीमुळेंच अस्तित्वांत आली. पावित्र्य व शुद्ध चारित्र्य हें त्यांचें वैशिष्ट्य असे व डोळ्यांत तेल घालून त्यांची राखण करण्यांत येई. परंतु पुढें त्या चालीचें वेश्यावृत्तींत रूपांतर झालें, त्याचें कारण प्रत्यक्ष या चालीलाच वाईट स्वरूप आलें हें नसून पुजारी वर्गाचा नैतिक अधःपात व त्यामुळें धार्मिक आचरणांत उत्पन्न झालेलें शैथिल्य या गोष्टी त्याला जबाबदार आहेत. पण या हतभागी वर्गाच्या दारुण भवितव्याच्या गाढ अंधारांत सच्छीलत्वाची परंपरागत ज्योत अजून तेवत असलेली

दिसून येते. कारण देवदासी इतर वेश्यांप्रमाणें न वागतां बहुधा एकाच पुरुषाशी निष्ठापूर्वक संबंध ठेवतात. याविरुद्ध आजकाल त्या जर सर्वसामान्य वेश्यावर्गात रुळूं लागल्या असतील, तर आपली मूळची खेडी सोडून जेथे केवळ व्यापारी दृष्टीनेंच सौंदर्याचा बाजार मांडला जातो, अशा मोठमोठ्या शहरांतील जीवनक्रम त्यांनी स्वीकाऱ्याचा तो परिणाम आहे. त्याबद्दल ती मुलगी क्वचितच दोषास्पद ठरेल. ज्या परिस्थितींत ती वाढते, जें शिक्षण तिला देण्यांत येतें, ज्या महत्वाकांक्षा तिच्यापुढें ठेवण्यात येतात, त्या सर्वांचें उद्दिष्ट तिच्यावर अवलंबून असलेल्या कुटुंबांतील इतर ऐतखाऊ मंडळींच्या उदरंभरणासाठीं आपल्या देहविक्रयानें द्रव्यार्जन करण्यास तिनें तयार व्हावें, अशा प्रकारची तिची मनोरचना बनवण्याचेंच असतें.

वेश्यावृत्तीकडे सध्या सबंध जगाचें लक्ष्य वेधलें असून आंतर्राष्ट्रीय चर्चेचा प्रश्न होण्याइतकें या विषयाला महत्व आलें आहे. हा 'गोऱ्या गुलामां'च्या व्यापाराचा प्रश्न निकालांत काढण्यासाठीं राष्ट्रसंघालासुद्धां वेश्याव्यवसायविषयक चौकशीकरतां एक खास कमिटी नेमणें भाग पडलें. या कमिटीनें याबाबत एक अत्यंत कटु सत्य आपल्या निदर्शनास आणलेलें आहे, तें हें कीं, या अनिष्टाचा उद्भव नीतिविषयक कल्पनेच्या अभावांत नसून सध्यांच्या आर्थिक परिस्थितीमुळें उत्पन्न झालेल्या लाखों लोकांच्या बेकारींत, मजुरवर्गाच्या कष्टप्रद स्थितींत व त्यांना अपुरी मजुरी देऊन दारिद्र्याच्या प्रसारानें वेश्यावृत्तीसारख्या संस्था जगवणाऱ्या एका विशिष्ट वर्गाच्या अस्तित्वांत आहे. कांहीं पाश्चिमात्य देशांत प्रामाणिक द्रव्यार्जनाच्या कित्येक धंद्यांमधून इतकें तुटपुंजें वेतन मिळतें कीं, त्या व्यवसायांत असणाऱ्या स्त्रियांना आपल्या अपुऱ्या उत्पन्नांत भर टाकण्यासाठीं इतर साधनांचा अवलंब करणें भाग पडतें. व सबंध दिवसभर आठ तासपर्यंत कष्ट केल्यावर त्यांच्या

थकलेल्या गात्रांना व सत्त्वहीन शरीरांना वेश्याव्यवसाय हाच अर्थोर्जनाचा सर्वात सोपा उपाय वाटतो. ज्यांच्या खिशांतून नाण्यांचे नाद निघत आहेत, अशा रंगेल पुरुषांना आपल्याकडे आकर्षून घेणाऱ्या खिडक्यांच्या गुलावी पडद्यांमागे ही केवढी करुणघटना दडलेली आहे, याची जाणीव फारच थोड्या जणांना असेल ! अशा प्रकारें हें ढळढळित सामाजिक अनिष्ट बऱ्हंशीं शोचनीय आर्थिक आपत्तीचें अपत्य आहे.

आर्थिक परिस्थितीचा सामाजिक दर्जावर कसा परिणाम होतो, याचें प्रत्यंतर देवदासी वर्गातील व कुलीन घराण्यांतील अशा दोन वेगवेगळ्या मुलींच्या स्थितीमधील फरकावरून स्पष्टपणें प्रत्ययास येतें. कुलीन घराण्यांत सामान्यतः कुटुंबांतील सर्व मंडळींचें लक्ष घरांतील मुलावर केंद्रित झालेलें असतें. त्याला सर्व प्रकारच्या सवलती मिळतात, त्याच्यापुढें वेगवेगळ्या महत्त्वाकांक्षा ठेवण्यांत येतात व स्वाभाविकच त्याच्यावर अधिक पैसा खर्च करण्यांत येतो. सामान्यतः कुटुंबांत त्यालाच सर्वांत महत्वाचें स्थान असतें. याच्या उलट देवदासी वर्गामध्यें मुलगी ही सर्वांच्या दृष्टीची ध्येयतारा असते. तिचें लहानपणापासूनच अतिशय काळजीपूर्वक पालनपोषण होतें, तिचे लाड केले जातात, कारण ती कुटुंबाची भावी पोषणकर्त्री असते. तिला नृत्यगायनाचें शिक्षण मिळतें, आणि त्याचा उद्देश तिच्या धंद्याला जोड मिळावी एवढाच असतो. मी पूर्वी म्हटल्याप्रमाणें प्रामाणिकपणें एकाच इसमाच्या आश्रयाला राहण्याची तिची इच्छा असते, पण आर्थिक परिस्थितीमुळें हा उद्देश साध्य होणें क्वचितच शक्य असतें. तिच्या यजमानाला तिला पोसण्याची इच्छा किंवा शक्ति नसेल, तर तिला दुसऱ्या एखाद्याचा आश्रय जोडणें भाग पडतें. कोणी असें विचारील कीं, त्यापेक्षां त्यांनीं दुसरा एखादा धंदाच कां स्वीकारू

नये ? हें जितकें बोलणें सोपें आहे, तितकेंच कृतींत आणणें कठिण आहे. परंपरागत रूढी मरतां मरत नाहींत. शिक्षणाचा प्रसार व प्रचारकार्याचा प्रयत्न झाल्यावांचून त्यांच्या जीवनक्रमांत आमूलाग्र फरक पडणें व त्यांना इतर व्यवसाय करण्यास प्रवृत्त करणें कठिण आहे. देवदासींनीं लग्न करणें हें पाप आहे, अशी खुळी कल्पना समाजांत प्रचलित असल्यामुळें ही चाल बुद्धिपुरःसर प्रयत्न न झाल्यास तशीच चालू राहील. या वर्गाच्या प्रगतींतील मुख्य अडथळा त्यांतील पुरुषांचा आहे. ते ऐतखाऊ व अशिक्षित असतात. कुटुंबांत त्यांना जबाबदारीचें स्थान नसल्यामुळें कुटुंबाला त्यांची परवा नसते. कुटुंबांतील मंडळीच्या दृष्टीनें त्यांची स्थिति न टाळतां येणाऱ्या बांडगुळांसारखी असते व ते पुरुषही आपली ही भूमिका कसोशीनें पार पाडतात. जर ते स्वावलंबी व स्वाभिमानी बनूं शकले, तर या बाबतींत निम्म्याहून अधिक यशाचा पल्ला गांठला असें मानण्यास हरकत नाहीं.

देवदासींच्या पुढें उपयुक्त व उच्च भविष्यकाल आहे. नृत्यगायनादि ललितकलांच्या सेवेची संधी दीर्घकालपर्यंत त्यांना लाभली असल्यामुळें या शाखांमधून त्या उत्कृष्टपणें अध्यापनकार्य करूं शकतील. दुर्दैवानें त्यांना आपल्या दुर्गत जीवनापासून परावृत्त करून पवित्र आचरणाच्या मार्गावर आणण्यासाठीं त्यांचीं मनें वळवण्याचा पुरेसा प्रयत्न व प्रचारकार्य अद्याप या देशांत झालेलें नाहीं. जे कांहीं थोडे प्रयत्न झाले आहेत, ते विसंगत स्वरूपाचे आहेत. अलीकडे या बाबतींत लोकमत जागृत होत असून तें संघटित व प्रबळ बनत चाललें आहे, यांत संशय नाहीं. या वर्गांत कांहीं नमुनेदार विवाह घडून आल्याचेंही ऐकिवांत येतें व शिक्षणाचाही प्रसार त्यांच्यामध्यें झपाट्यानें वाढत आहे. पण या कार्याला जर कशानें खरी मदत व्हावयाची असेल, तर ती या चालीला प्रतिबंधक असा कायदा अस्तित्वांत आल्यानेंच होईल.

म्हणजे शिक्षणप्रसाराचें कार्य व हा कायदा या जोडगोळीनें ही गोष्ट अत्यंत सुकर होईल. म्हैसूर संस्थानानें सुमारें तीस वर्षामागें अशा प्रकारच्या सुधारणांचा उपक्रम करून याबाबत पुढाकार घेतला व १९१० मध्यें देवाला मुली वाहाण्याची चाल अजिबात बंद करण्यांत आली. १९२७ सालीं मद्रासच्या कायदेकौन्सिलांत डॉ. मुथुलक्ष्मी यांनीं देवदासीबद्दल बिल आणलें व तें पसारही झालें. मध्यप्रांताच्या कायद्याच्या नोंदबुकांत 'नाईकमुली' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या वर्गाच्या संरक्षणाचा कायदा अस्तित्वांत आहे. परंतु अखिल हिंदुस्थानाला लागू होणारा असा एकही कायदा अद्याप झालेला नाहीं, म्हणून या प्रकाराला कायमचा आळा घालणारें असें एक बिल लवकरच लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्यें येईल, अशी अपेक्षा आहे. त्याबरोबरच खुद्द या स्त्रियांना या घाणेरड्या व्यवसायाविरुद्ध बंड करण्याला प्रवृत्त करण्यासाठींही जोराची चळवळ करणें आवश्यक आहे. स्त्री व पुरुष, तसेंच चार पैसे फेकून स्त्रीचा देह बेदरकारपणें विकत घेणारे लक्ष्मीपुत्र आणि पोटाची खळगी भरण्यासाठीं आपल्या शरीराचा चोळामोळा करणारे गरीब, या दोन भिन्न वर्गाच्या बाबतींत नीतीमत्तेचीं वेगवेगळीं मापें अस्तित्वांत आल्याकारणानें सामाजिक विषमतेला बळी पडलेलें असणें, हाच काय तो ज्यांचा अपराध, अशीं 'जाईजुई' सारखीं उमलत्या नवाळींत कुस्करलीं जाणारीं फुलें कोमेजून जाण्याचें अजिबाद थांबेल अशा रीतीनें या चालीचें समूळ निर्मूलन् होईपर्यंत, अंतःकरणाचा कळवळा असलेल्या प्रत्येक समाजसुधारकापुढें हें एक उपयुक्त व उदात्त कार्यक्षेत्र आहे. आपल्या लाखों भगिनी त्यांना अत्यंत मौल्यवान असलेली अब्रू टीचभर पोटाची खळगी भरण्यासाठीं प्रत्यहीं विकीत असतांना अधःपात व अखंड जीवन्मृतावस्था यांपासून 'जाईजुई' सारख्या उमलत्या गोड कळ्यांना मुक्त करून स्त्रीवर्गाच्या अब्रूचें रक्षण

करण्याच्या दिशेनें जोंपर्यंत आपण प्रत्यक्ष प्रयत्न करीत नाहीं, तोंपर्यंत एका दृष्टीनें आपण या हिडीस रूढीचा पुरस्कारच करीत आहोंत, हें आपल्या केव्हां ध्यानांत येईल तेव्हां खरें !

'वंदेमातरम्' ही हृदय हलवून सोडणारी एक काव्यमय करुण-कथा आहे. स्वातंत्र्यप्राप्ती बाळगणें म्हणजेच आत्माहुति देणें अशी जेथें स्थिति आहे, अशा एका दुर्दैवी देशाची ती शोकमधुर कहाणी आहे. जुलमी सत्ताधारी हे नेहमी भेकड असतात व त्यामुळें सहज त्यांच्या मार्गाआड येणाऱ्या एखाद्या क्षुद्र छायेचीही भीती बाळगणें त्यांना भागच असतें, व म्हणून अन्यायानें प्राप्त करून घेतलेलें आपलें स्थान सुरक्षित व स्थिर राखण्यासाठीं कोणत्याही प्रकारचे उपाय— मग ते कितीही क्रूर व हिडीस कां असेनात —तो आचरीत असतो. कच्च्या कैदेंतील आरोपींवर करण्यांत येणारे सर्व प्रकारचे नैतिक व शारीरिक अत्याचार आतां नुसत्या सांगोवांगीच्या गोष्टी राहिलेल्या नाहींत. अशा प्रकारच्या अत्याचारांना बळी पडलेल्या निर्भय वृत्तीच्या व्यक्तींनीं न्यायालयांतून न्यायदानाचें काम करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या समोर रोखठोकपणें मांडलेले लाजिरवाणे प्रकार, अशा कैद्यांना वाग-वण्याची पद्धत, सक्तीनें त्यांजकडून तयार करून घेतलेलीं माफीपत्रें, जबरदस्तीनें वाटेल त्या कागदावर करून घेतलेल्या सह्या, माफीच्या साक्षीदारांच्या जबान्या म्हणून तयार केलेल्या कल्पित नवलकथा, इतकेंच नव्हे, तर माफीचे साक्षीदार तयार करण्याचे क्षोभजनक उपाय, या सर्व गोष्टी अलीकडे नित्यक्रमांतल्याच होऊन बसल्या आहेत. मालकाची सत्ता धोक्यांत असलेली दिसली व तिच्याविरुद्ध विचार, उच्चार किंवा आचार यांपैकीं कोणत्याही मार्गानें एकाद्यानें प्रतिक्रिया दाखवली कीं, आंतरराष्ट्रीय कायदाही धाब्यावर बसवण्यांत येत असतो.

## परिशिष्ट

साम्राज्यशाहीच्या राज्यव्यवस्थेंत न्यायदान व न्यायप्रतिपालन
ा नुसता पोकळ डोलारा आहे, हें आतां अधिकाधिक स्पष्टपणें सिद्ध
ोऊं व लोकांना पटूं लागलेलें आहे. अशा परिस्थितींत न्यायाची
ल्पना कोट्यावधी श्रमोपजीवि मजुरांच्या पिळणुकीवर जगणाऱ्या
हानशा निरुद्योगी उच्चवर्गीयांचा जास्तींत जास्ती फायदा कसा
ोईल, या एकाच तत्त्वावर योजलेली व अधिष्ठित झालेली असणें
मप्राप्त आहे. त्याचप्रमाणें जेव्हां एक देश दुसऱ्या देशावर सत्ता
ालवतो, तेव्हां शासितांविरुद्ध शास्त्यांचा फायदा करून देणें, एवढ्यां-
ाच न्यायदानाचें तत्त्व सामावलेलें असतें. सध्या साम्राज्यसत्तेच्या
ाकावर सूत धरलेलें आहे. पण असें असतांही ती आपल्या सत्तेला
िफामपणें चिकटून राहून कमालीच्या नीच साधनांच्या अवलंबनानें
ुद्धां आपलें क्षीण श्वसन चालू ठेवण्यासाठीं धडपडतच आहे.

कथौघामधील जणूं धृतिशक्तीरूपी अढळ खडकच असें ज्यांना
हणतां येईल, अशा त्या दोघां बंगाली क्रांतिकारक तरुणांच्या योगानें
वंदेमातरम्' या भाव-कोमल गोष्टीस एक प्रकारचें उग्रगंभीर स्वरूप
ालेलें आहे. सर्वच अन्यायप्रतिकारकांप्रमाणें तेही त्यांच्या व्यक्तिम-
वापेक्षां मूर्ततत्त्वरूपानेंच आपल्या डोळ्यांपुढें राहातात. त्यांचे देह
ांसावर लटकतील, पण त्यांचीं ध्येयें या गोष्टींतील लहान मुलीच्या
ंतःकरणांत कायमचीं अधिष्ठित झालीं, त्या रीतीनें चिरकाल जिवंत
ाहातात व द्राक्षासवानें परिपूर्ण अशा घटाप्रमाणें आपलें जीवनही अशा
ा उदात्त ध्येयांनीं व्यापून जाऊन कालगतीबरोबर त्यांतील माधुर्य व
क्तता हीं वाढत जातात. त्या दोघां देशभक्तांच्या कणखर साम-
र्याचें चिमुकली बालिका हें एक प्रतिबिंबच आहे. त्यांच्या प्रचंड
क्तीचें तिला यथायोग्य आकलन होत नाहीं, पण त्या शक्तीच्या
स्तित्वाची तिला जाणीव असते व त्याचा तिजवर रोमहर्षक परि-

णाम होत असतां, तिच्या हृदयांतील सारें प्रेम व भक्ति हीं त्यांच्या कोमल स्निग्धवृत्तीकडे आकर्षलीं जातात. अशा प्रकारच्या अनुपम ओजस्वितेला हालअपेष्टा व कठोरता हीं ग्रासून टाकतील, अशी तिला कधीं कल्पनाही शिवलेली नसते, व यावर तिचा विश्वासही बसणें शक्य नसतें. आपल्या अद्भुत 'वंदेमातरम्' मंत्रानिशीं गंधर्वलोकांतून आलेले कोणी दिव्यात्मे अशीच त्यांच्याविषयीं तिच्या मनाची भावना झालेली असते. तिच्या वयाची व अनुभवाची वाढसुद्धां तिच्या बाल्यांतील हा आभास नष्ट करूं शकत नाहीं. कारण तिचें मन केवळ मूलतत्त्वालाच चिकटलेलें असतें व सारतः ते दोघे देशभक्त म्हणजे जणूं प्रेरक अशीं मूर्ततत्त्वें असून त्यांत देशांतील तेज व वीर्य हीं प्रकट झालेलीं असतात. अकालीं खुडलेल्या त्यांच्या आयुष्यासंबंधींची त्यांची वृत्ती सॅको आणि व्हँझेटीप्रमाणेंच असते, व तिचें यथार्थ स्वरूप व्हँझेटीनें आपल्या देहान्तापूर्वी काढलेले शेवटचे उद्गार येथें उद्धृत करून दाखवितां येईल—

"हा प्रसंग घडला नसता, तर रस्त्यांवरील कोनाकोंपऱ्यांमधून तुच्छ वृत्तीनें पाहाणाऱ्या श्रोत्यांपुढें भाषणें करण्यांत माझें आयुष्य घालवीत मी राहिलों असतों—अप्रसिद्ध, अज्ञात व अपेशी मृत्यू मला प्राप्त झाला असता—पण आतां अपेश आमच्या वांट्याला आलेलें नाहीं—हें आमचें जीवितकार्य व जीवितसाफल्य! यदृच्छेनें जें आमच्याकडून घडत आहे, तशा प्रकारचें सहिष्णुता, न्याय, मानवाची मानवाबद्दल सहानुभूति यांविषयींचें कार्य सबंध आयुष्यांत हातून घडेल अशी आम्हाला आशा नव्हती—आमची वाणी—आमचें आयुष्य—आमच्या हालअपेष्टा—छे! त्यांची काय एवढी पर्वा! आमच्या आयुष्याचा अंत—केवळ एका चांभाराच्या व बिचाऱ्या एका मासेविक्याच्या आयुष्याचा शेवट—एवढेंच! पण हा शेवटचा

क्षण कायमचा आमचा आहे—या शेवटच्या यातना हा आमचा विजय होय !

माझ्या हातून घडलेली कृती योग्य असल्याबद्दल माझी एवढी खात्री आहे कीं, माझे प्राण हिरावून घेणें तुम्हाला एकदांच शक्य असलें, तरीही जर माझा दोनदां वध करणें तुम्हाला शक्य असतें, व मी पुनः पुनः दोनदां नवीन जन्म घेतला असता, तर यापूर्वी मी जें केलें आहे, तेच पुनरपि करण्यात मी माझें आयुष्य खर्च केलें असतें. ”

स्वातंत्र्याच्या ध्येयासाठीं जगणाऱ्या, खपणाऱ्या व देहार्पण करणाऱ्या व ‘ वंदे मातरम् ’ हेंच आपलें ब्रीदवाक्य, सुख व प्रकाश मानणाऱ्या सर्व देशभक्तांचा संदेश हाच असतो !

पुणें, 
२१ जुलै १९३१

कमलादेवी चट्टोपाध्याय.

— —